सत्पद्यहारः

सुरस्त्रोतस्विन्याः पुलिनमधितिष्ठन् नयनयोः
विधायांतर्मुद्रामथ सपदि विद्राव्य विषयान् ॥
विधौतांतर्ध्वांतो मधुर-मधुरायां चितिं कदा
निमग्नः स्यां कस्यांचन नवनभस्यांबुदरुचि॥ ५४ ॥

अनुष्टुप्.

इमां वै विष्णुलहरीं जगन्नाथेन निर्मिताम् ॥
यः पठेत् तस्य सर्वत्र जायंते जय संपदः ॥५५॥

इति श्रीमत्पंडितराज-जगन्नाथ कवि- विरचिता विष्णुलहरी समाप्ता.
श्री गोविंदार्पणमस्तु.

---

शिखरिणी.

तटीं स्वर्गंगेच्या बसुनि भगवंता स्वनयनीं ॥
करूनी मुद्रा ते सकळ विषयांतें पळवुनी ॥
त्यजूनी हृन्मोहा अति सरवद नीलांबुदसमीं ॥
बुडें त्या चिद्रूपामधिं अजि कधीं सांग तरि मी ५४॥

आर्या.

सुकवि-जगन्नाथकृता ही विष्णु सुधाब्धिची कृपालहरी ॥
पढतां अघ सकल हरी दे जय संपत्ति विश्वपाल हरी ॥५५॥

स्रग्धरा.

आधीं नोहेचि साधी नवरस-भरिता ती जगन्नाथवाणी
आणि श्रुत्यादि वाणी- विषयहि न असा श्रीजगन्नाथ वाणी ॥
तीमाजी एकनाथात्मज जडमति जो रीघ त्या वामनाचा
नोहे आहे खरें हें परि हरि पुरवी सत्य हेवा मनाचा ५६

शालिनी.

लाहूनीयां पंडिताच्या कृतीतें ॥ ह्याया लोकां लभ्यही प्राकृती ते ॥
तुल्यश्लोकीं निर्मुनी आजि टीका ॥ पुण्यश्लोकीं अर्पिली ही विलोका ५७

इतिश्रीमद्योगानंदपदारविंदमिलिंदायमानमानस वामनविरचिता विष्णुलहरी टीका समश्लोकी समाप्तिमगमत् ॥ शकाब्दाः १८०६ तारणः का॰ शु॰ ५ शुक्रवासरे समा॰

---

१ भागीरथीच्या- २ हृदयांतील अज्ञानास- ३ मेघतुल्य- ४ विष्णु हाच सुधाब्धि (अमृतसमुद्र) त्याची ५ विष्णूनें-

# अथसिद्धांतत्रयोदशी

(महाराष्ट्रव्याख्यासहिता)

ओं परमात्मने नमः

रथोद्धता.

॥ विश्वनाथमभिवंद्य सादरं स्वानुभूतिविशदां त्विमामहम् ॥
॥ विश्वनाथकरुणार्पितां धियं विश्वभीतिहरणाय योजये ॥ १ ॥

महाराष्ट्रव्याख्या.

श्रीगणेशसरस्वतीगुरुभ्योनमः ॥ श्रीमदुपनिषत्प्रतिपाद्यपरात्मा विजयतेतराम् ॥

ओंव्या.

ज्याचे कृपाकटाक्षपात ॥ करिती मूलाविद्या निवृत्त ॥
अहमात्मा जो स्वकाशीत ॥ अद्वयत्वें प्रगट होय. ॥ १

एवं जयाचें करणें ॥ विश्वनाथनामधारणें ॥
शोभे, तो मी नमनें ॥ अद्वयभावा आणिला ॥ २ ॥

कोणी एक कवि हा तापत्रयसंतप्त होऊन साधनचतुष्टयसंपन्न होत्सातां विधिवत् गुरूस शरण गेला. त्यास कृपावंत श्रीश्वनाथगुरु याणीं ब्रह्मात्मतत्वाचा महावाक्यद्वारा उपदेश केला तेव्हां उपदिष्टवाक्यापासून झालेल्या, असंभावनाविपरीतभावनारहित बोधें करून त्याचे हृदयांत जो सिद्धांत अपरोक्षत्वें प्रकाशित झाला तोच त्याणें सिद्धांत त्रयोदशीनामक संस्कृत पद्यात्मक ग्रंथरूपानें प्रकट केला. त्यांत सच्चिदानंद अनंत, अद्वय, व असंग परात्मा च मी आहें असें प्रदर्शित केलें आहे. त्या ग्रंथातें महाराष्ट्रभाषेत व्याख्यान असावें असें श्रीविश्वनाथगुरूचे मनांत येऊन त्याणीं मला आज्ञा केली.

माझ्या ही मनांत श्रीगुरूची आज्ञा व्हावी ह्मणज मीं केलेलें व्याख्यान पावनरूप होईल असें होतें त्याचें पूर्णत्व श्रीगुर्वाज्ञेनें होऊन मी या व्याख्यानास प्रवृत्त झालों आहें. आतां यांत न्यूनाधिक कांहीं झाल्यास विद्वज्जनानीं मजवर कृपापूर्वक क्षमा करावी या प्रकारें सज्जनांची प्रार्थना करून व्याख्येस आरंभ करितों.

प्रथम करण्यास इच्छिलेल्या ग्रंथाची निर्विघ्न परिसमाप्ति व्हावी, आणि शिष्टाचार आहे म्हणून शिष्यांनीं ही असेंच वागावें याकरितां ग्रंथकार 'विश्वनाथमभिवंद्य' इत्यादि दोन श्लोकें करून इष्टदेवतावंदनलक्षण मंगलाचरण करित होत्सातां अर्थात् विषयादिकांचें निरूपण करित आहे.—विश्वनाथ ह्मणजे चराचर जगताचा नियंता जो परमात्मा त्यास तसेंच विश्वनाथनामक श्रीगुरूस प्रेमपूर्वक वंदन करून,

( मंदाक्रांता )

**वत्सस्नेहात् सहजमुदितं कर्म चुल्ल्यां निरूढं**
**तप्तं ज्ञानज्वलनशिखया निर्गुणोपास्तिपात्रे**

---

स्वरूपाच्या अपरोक्ष अनुभवेंकरून स्पष्ट अशी विश्वनाथगुरूच्या कृपेनें दिलेली बुद्धि ( ज्ञान ) मी विश्व म्हणजे सर्व अर्थात् अविद्या आणि तिचें कार्य —ईश, जीव, व जगत्—एतन्मूलक भीतीचा नाश व्हावया करितां योजितों. येथें 'या ग्रंथामध्यें' असा अध्याहार करावा. ह्मणजे श्रीगुरूंस शरण जाऊन त्यांच्या उपदेशानें झालेली समजूत मुमुक्षूंची द्वैतभीति निवारण होण्या करितां या ग्रंथामध्यें मी सांगतों असा अर्थ. येथें स्वानुभूति या पदानें जीवब्रह्मैक्यरूप स्वानुभूति हा या ग्रंथांतील विषय सूचविला आहे. विषय आणि ग्रंथ यांचा प्रतिपाद्यप्रतिपादकभाव संबंध होय. 'अर्पितां धियं' (दिलेलें ज्ञान) आणि 'विश्वभीतिहरणाय' (द्वैतभयनिवारणार्थ) या पदानीं क्रमें करून वस्तुज्ञानद्वारा स्वानंदप्राप्ति, आणि अनर्थनिवृत्ति हें प्रयोजन द्वय सूचित होतें, व ह्याविषयीं ज्यास तीव्र इच्छा आहे तो अधिकारी होय. असें अनुबंध चतुष्टय प्रथम श्लोकीं सूचित केलें आहे.

शंका—गुरूनें केलेल्या उपदेशापासून अपरोक्ष अनुभव होऊन विश्वभीति कशी निवृत्त होईल ? भोजनाविषयीं उपदेश केल्यानें तृप्ति होऊन क्षुधानिवारण कसें होईल, या शंकेवर उत्तर सांगतों.—पदार्थ दोन प्रकारचे, एक सत्य रज्जु शुक्त्यादि, आणि दुसरे आरोपित सर्परजतादि. त्यांत रज्जूवर सर्प किंवा शुक्तीवर रौप्य हें भ्रमानें आरोपित असल्यामुळें, हा सर्प किंवा रौप्य नव्हे तर रज्जु अथवा शिंप आहे असा आप्तानें उपदेश केला असतां त्यास रज्जुशुक्तिबोध होऊन अध्यस्त सर्परजतादिकांचा बाध होतो. त्या प्रमाणें ईश, जीव, जगत् इत्यादिक भयकारण द्वैत अविद्याकल्पित आहे ती अविद्या आपल्या असंग सच्चिदानंदस्वरूपाविषयीं जो अविवेक तत्स्वरूप आहे ह्मणून तो अविवेक श्रीगुरूपदेशानें निवृत्त होतांच आत्मस्वरूपाचा अपरोक्ष अनुभव होऊन विश्वभीतिहरण होतें. शंका—अविवेकरूप अविद्या सद्गुरूपदिष्ट ज्ञानानें निवृत्त होवो; परंतु ईश, जीव, जगत् इत्यादि सत्यत्वानें अनुभूयमान द्वैताची निवृत्ति श्रीगुरूपदेशानें कशी होईल ? या शंकेवर उत्तर सांगतों.—ईश, जीव इत्यादि द्वैत सत्य कांहीं नाहीं. जसें निद्रादोषानें स्वप्न भासतें तद्वत् अविद्यादोषानें ईशजीवजगदादि द्वैत प्रतीतीस येतें. द्वैत हें पूर्वी नव्हतें व पुढें नाहीं. मध्यें मात्र प्रतिभासित होतें. जसें-निद्राकाळीं स्वप्नाभास होतो तद्वत्.

द्वैतास उपादान अविद्या नाहीं म्हणणारास विचारावें कीं—द्वैतास उपादान काय परमाणु म्हणतोस, कीं ईश म्हणतोस किंवा उपादान नाहींच म्हणतोस. प्रथम पक्षीं द्वैतास उपादान परमाणु म्हणतोस, तर परमाणु द्वैतांतच अंतर्भाव पावतात तेव्हां त्यांस उपादान कोण ? परमाणूच म्हणावें तर परमाणूंस उपादान परमाणूच

॥ पीत्वा ऽ तृप्यं सुखमिह पयो यत्कृपाकामधेनोः ॥
॥ योगानंदं तमहमतुलानंदसिंधुं नमामि ॥ २ ॥

हें म्हणणें संभवत नाहीं, आणि तसें मानिलें तरी पूर्व दोष सिद्ध आहेच. द्वितीय विकल्पीं द्वैतास उपादान ईश म्हणशील तर ईश्वर निराकार किंवा साकार ह्मणतोस? निराकार ह्मणशील तर तो साकार द्वैतास उपादान होणें नाहीं. साकार म्हणशील तर तो द्वैतांतच अंतर्भूत झाला मग तो द्वैतास उपादान संभवत नाहीं तृतीय विकल्पीं द्वैतास उपादान नाहींच म्हणशील तर प्रतिकल्पीं उत्पन्न होणारी सृष्टि निरुपादान ह्मणावी लागेल. तसें म्हणावें तर शून्यापासून सृष्टि होते असा पक्ष सिद्ध होतो तो युक्तीस असंमत आहे तेव्हां उपादानकारणावांचून द्वैत संभवत नाहीं. तें उपादान अविद्याच होय, कारण अविद्याऽन्वयानें द्वैतान्वय आणि अविद्याव्यतिरेकानें द्वैताचा व्यतिरेक आहे. तस्मात् या अविद्येचा नाश गुरूपदिष्ट ज्ञानानें होउन विश्वभीति हरण होणें सयुक्तिक असल्यामुळें ग्रंथकारानें केलेली योजना निर्दोष आहे. १ ॥

शिष्यरूपी वत्साच्या स्नेहामुळें सहज पान्हा येउन स्रवलेलें; तसेंच निर्गुणोपासना ह्मणजे अहंप्रत्यय — एतल्लक्षण पात्राचे ठायीं स्थित झालेलें; संचित, प्रारब्ध, व क्रियमाण या तीन कर्मरूपी विटांच्या कल्पिलेल्या चुलीवर ठेविलेलें, आणि आत्मानात्मविवेकापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानरूपी अग्नीच्या ज्वालेनें कढलेलें; ज्याच्या कृपारूपी कामधेनूचें आनंद स्वरूपदुग्ध प्राशन करून मी तृप्तझालोंआहें त्या अमर्यादनिरतिशयानंदसमुद्र योगानंदसद्गुरूस मी नमस्कार करितों. योगानंदसरस्वती हें या कवीच्या दीक्षाऽध्ययनगुरूचें नांव आहे.

शंका—निर्गुणोपास्तिपात्राचे ठायीं ठेविलेलें आनंदरूप दुग्धास कर्मरूपी चुलीची कल्पना निरर्थक होय कारण उपासनेंत आणि ज्ञानांत कर्माचा अभाव शास्त्रानें वर्णिला आहे या शंकेचें उत्तर सांगतों. उपासना आणि ज्ञान हें सिद्ध होण्यास कर्मोपलक्षित स्थूल शरीर आश्रय आहे, त्यावांचून उपासना व ज्ञान सिद्ध होत नाहीं म्हणून शरीरांत तीन कर्मांचा अंतर्भाव धरून चुलीची कल्पना केली ती सार्थ आहे. तें शरीर ज्ञानोत्तर बाधानुवृत्तीनें राहतें.

शंका—'निर्गुणोपास्ति'पदाचा अर्थ अहंप्रत्यय असा तुह्मीं स्वकपोलकल्पित काढला, या शंकेवर उत्तर सांगतों.हा अर्थ स्वकपोलकल्पित नाहीं. तर निर्गुणोपासनेचेठायीं अस्थूलादि अभावगुण तसेच सत्यज्ञानादि भावगुण यांना आश्रय अहं ( मी ) एतद्रूप प्रत्ययच आहे असें प्राचीन ग्रंथांत सांगितलें आहे.

शंका—अभावगुण आणि भावगुण यांना आश्रय अहं प्रत्यय आहे येणेंकरून निर्गुणोपासना होत नाहीं. तर गुणाश्रय तें सगुण अशा प्रकारें सगुणोपासनाच सिद्ध होते, तीस निर्गुणोपासना कसें म्हणतां?या शंकेवर उत्तर सांगतों. गुणाश्रय तें सगुणच असा

॥ नाहं देहः सहजमलिनो नश्वरो दृश्यरूपो ॥
॥ नानारोगायतनमचलो यः परोक्षो विकारी ॥

नियम नाहीं. जसें देवदत्ताचें किंवा देवदत्ताश्रय आसन आण या वाक्यांत देवदत्ताचा त्याग करून आसन आणणें होतें म्हणजे देवदत्ताश्रय आसन असून तें देवदत्तरहित असतें तद्वत् अभावगुण आणि भावगुण यांचा त्याग करून अहंप्रत्यय निर्गुणच आहे असा अर्थ घेतला असतां विशिष्ट बोधाचा म्हणजे सगुणाचा बाध होऊन अहंप्रत्यय निर्गुणोपासनाच होय असें सिद्ध होतें म्हणून हा अर्थ स्वकपोलकल्पित नाहीं तर शास्त्र प्रमाणानेंच सिद्ध आहे.

शंका—आनंदरूप दुग्ध ज्ञानाग्नीनें कढलेलें या सांगण्यांत विशेष काय? अशी शंका जाहल्यास त्याचें उत्तर सांगतों.—अहंप्रत्यय या पात्रांत आनंदरूप दुग्ध जरी सिद्धच आहे तरी तें *'मामहं न जानामि' अशा लक्षणाची जी अविद्या तिनें मिश्र असल्यामुळें सदोष आहे. तें ज्ञानाग्नीनें म्हणजे निषेधमुख आणि विधिमुख अशा उपदेशाचे द्वारानें झालेल्या विचारजन्य ज्ञानेंकरून कढलें म्हणजे पक्व झालें असतां ती अविद्या नष्ट होऊन निर्दोष होतें अर्थात् तें प्राशन केलें असतां निरंकुश तृप्तीचें अव्यभिचरित साधन होय. एवढें या सांगण्यांत विशेष आहे २

एवंच या पूर्वोक्त श्लोकेंकरून श्रीसद्गुरुवंदनाच्या रूपानें परमात्म्याचें परोक्ष ज्ञान सिद्ध केलें. तें अपरोक्षत्वानें प्रगट करण्याकरतां पुढील ग्रंथाची प्रवृत्ति आहे. आरंभीं देहासच आत्मा म्हणणारे जे लोकायतवादी त्यांचें खंडन करावयाचें आहे या स्तव त्यांचें मत आणि रसायनशास्त्रवादी म्हणून जे सांप्रतचे लोकायत त्यांचें मत संक्षेपानें अनुक्रमेंकरून दाखवितों.

लोकायताचे मतीं पृथ्वी, आप, तेज, व वायु: असे चार पदार्थ आहेत. यांचें परमाणूपर्यंत सूक्ष्मत्व आहे. पृथिव्यादि गोल हे, परमाणूंचे पुंज होत. आकाशाचे परमाणू नाहींत, तर ते शशशृंगवत् शून्य आहे, पदार्थ नव्हे. प्रमाण एक प्रत्यक्षच. जगत्कर्ता ईश्वर नाहीं, तर पृथिव्यादिकांचे परमाणूंचें मेलन झालें म्हणजे चेतन अचेतन सृष्टि होते. कात, चुना, सुपारी व नागवेलीचें पान या चार पदार्थांत जरी तांबडेपणा नाहीं तरी त्यांचे मेलनापासून तांबडेपणा उत्पन्न होतो तसे शरीराचे अर्थी या चार भूतांचे परमाणूंचे योग्य मेलनानें चेतनपणा येतो. जेथें योग्य मेलन नाहीं तेथें अचेतन होतें. आपला प्रत्यय शरीरा वांचून नाहीं. उपजणें, मरणें इत्यादि षड्विकार ते शरीरींच आहेत, तेव्हां त्या शरीराचे उत्पत्तीनें आपणास उत्पत्ति व तद्विनाशानें आपला नाश होतो. वास्तव आत्म्याचा अनुभव

* मी आपणास जाणत नाहीं.

**नित्यस्वच्छो ऽव्ययविरहितः सर्वदा द्रष्टृरूपः**
**सौख्यांभोधिः सततमजडो निर्विकारोऽपरोक्षः ॥ ३**

शरीरावांचून नाहीं. तस्मात् शरीरच आत्मा होय. अर्थ आणि काम हे दोनच पुरुषार्थ आणि मरण तीच मुक्ति होय. स्वर्ग, नरक, जन्म, मरण पुन्हा होतें इत्यादि प्रतिपादन करणारा वेद तो वंचकानीं पोट भरण्याकरतां केला आहे, तो प्रमाण नाहीं इत्यादि बोलणारे पूर्वीचे लोकायत होत यांसच चार्वाक असें म्हणतात.

आतां रसायनशास्त्रवादी सांप्रतचे लोकायत यांत इतकाच फरक आहे कीं हे लोक चार भूतांचें यंत्रानें पृथक्करण करून त्रेसष्ट ६३ तत्वें सांप्रत शोधावरून मानतात. त्यां तत्वांचा नाश नाहीं. कांहीं कांहीं तत्वें मिश्रण पावल्यानें कांहीं एक कार्य उत्पन्न होतें. चुना, हळद यांचें मिश्रण तांबडें होतें हे जसें गुणरूप कार्य होय त्या प्रमाणें चेतन अचेतन सृष्टि तत्वांच्या मेलनापासून उत्पन्न होते. बाकी सर्व सारखेंच आहे. या दोहीं मतांत शरीरच आत्मा आहे असें मानतात त्याचें खंडण करून शरीराहून वेगळा आत्मा आहे असें सिद्ध करण्यास आरंभ करतातः—सहजमलिन ह्मणजे आस्थि, मांस, रक्त, मेद इत्यादि स्वाभाविक दोषरूपी पदार्थ ज्यांत आहेत व ज्याचें अवलोकन झालें असतां कंटाळा उत्पन्न होतो त्यास सहजमलिन ह्मणतात, नश्वर ह्मणजे अस्थिर, आपला श्वास बाहेर गेला तो आंत येईल इतका नियम नाहीं. दृश्यरूप ह्मणजे जाणिवे पुढें असणारा व जाणिवेनें भासणारा, नानारोग यांचें आयतन (स्थान) म्हणजे ज्याच्या आश्रयानें अनेक रोग उत्पन्न होतात अचल ह्मणजे जड अर्थात् स्वभानपरभानरहित; परोक्ष ह्मणजे अहंवृत्ति जशी प्रत्यक्ष आहे तसा प्रत्यक्ष नाहीं अथवा इंद्रियांच्या पुढें घटासारखा स्पष्ट होणारा; विकारी म्हणजे उत्पन्न होणें, सत्ता पावणें, वाढणें, ज्वरादि विकार होणें, क्षीण होणें व नाश पावणें अशा षड् विकारांनीं युक्त अशा सात विशेषणानीं युक्त जो देह तो मी नव्हे; कारण माझे ठायीं हीं विशेषणें नाहींत. एवंच या सात विशेषणानीं जे प्राचीन आणि अर्वाचीन लोकायत देहास आत्मा म्हणतात त्यांचें खंडण येथें सिद्ध आहे तेंच प्रकट दाखवितों. कात, चुना सुपारी, पान या चार पदार्थांत जरी तांबडेपणा नाहीं तरी त्यांचे मेलनापासून तांबडेपणा उत्पन्न होतो हा दृष्टांत लोकायतानीं दिलेला संभवत नाहीं; कारण ते चार पदार्थांत तांबडेपणा नाहीं हें कबूल करतात आणि मेलनानें तांबडेपणा उत्पन्न होतो असें म्हणतात तेव्हां तांबडेपणा गुण सिद्ध झाला. तसें चार पदार्थांत चैतन्य नाहीं परंतु मेलनांत उत्पन्न होतें तेव्हां चैतन्य गुण असें लोकायतांचे ह्मणणें आहे

हें संभवत नाहीं; कारण सुषुप्ति, मूर्छा, मरण या अवस्थांत मेलनरूपी देह प्रत्यक्ष असतां त्याचे ठायीं चैतन्य अनुभवास येत नाहीं तेव्हां देहाचा गुण चैतन्य होत नाहीं, कारण मेलन हें सुषुप्तींत, मूर्छेंत आणि मरणावस्थेंत विघडत नाहीं असें असतां चैतन्य मात्र कां अनुभवास येऊं नये ?

शंका.—मेलन जरी विघडलें नाहीं, तरी मेलनरूप प्रकृत्यंश ते खालीं वर होतात म्हणून चैतन्य गुण अनुपलब्ध होतो असें ह्मणतोस तर विचारितों तें सांग. खालीं वर प्रकृत्यंश म्हणजे परमाणू होतात ते स्वतः चलित आहेत ह्मणून होतात किंवा परचलित आहेत म्हणून होतात ऐसें विकल्पद्वय. प्रथम विकल्पीं स्वतः चलित आहेत म्हणतोस तर मेलन विघडतें म्हणावें लागेल आणि चैतन्यगुण खालीं वर नाहीं काय? खालीं वर जर परमाणूंस व्यापून आहे तर चैतन्य गुण सुषुप्त्यादिकाचे ठायीं कां अनुभवास येऊं नये हा दोष सिद्धच आहे. आतां परमाणू स्वतः चलित जे म्हणतोस ते चारी भूतांचे म्हटल्यास पृथ्वी उदक तेज यांचे परमाणू स्वतः चलित अनुभवास येत नाहींत. द्वितीय विकल्पीं परचलित ह्मणतोस तर वायूस परचलित म्हणावें लागेल तो पर कोण, गुणांतील मानतोस किंवा पदार्थांतील मानतोस? उभय प्रकारेंही संभवत नाहीं हें स्पष्टच आहे यावांचून अन्य पदार्थ नाहीं असें तुझें मतीं सिद्ध आहे त्यास दोष येतो.

शंका—परमाणू स्वतः चलित किंवा परचलित नसोत परंतु प्रत्येक परमाणूंत स्नेहाकर्षण व गुरुत्वाकर्षण हीं आहेत त्या योगानें ते चलित होतात असें ह्मणशील तर सांग, दोन आकर्षणें पदार्थांचे धर्म मानितोस किंवा धर्मी मानितोस? (ऐसें विकल्पद्वय) धर्म मानतोस तर पदार्थ भिन्न भिन्न, व धर्म एक असें झालें. तेव्हां धर्म व्यापक पदार्थ व्याप्य हें भाषणच विरुद्ध आहे कारण धर्म हा पदार्थांबरोबर प्रत्येकाचा वेगळा पाहिजे तसें नाहीं तेव्हां विरुद्ध. आकर्षणें धर्मी मानून पदार्थ धर्म मानणें हें ही तुझे मतीं विरुद्ध आहे कारण आकर्षणें म्हणून स्वतंत्र चार पदार्थांवांचून कबूल केलीस तेव्हां धर्मधर्मिभाव न संभवतां परमाणुचलनास तीं आकर्षणें कारण कसें ह्मणतोस?

तसेंच चार पदार्थ किंवा मेलनरूपी देह हे दृश्य होतात ते चैतन्यगुणानें होतात किंवा पदार्थांनीं पदार्थ दृश्य होतात? पहिलेपक्षीं चैतन्यगुणानें दृश्य होतात म्हणावें तर तांबडेपणानें कात, चुना, सुपारी, पान हे चार पदार्थ दिसतात असें कोठेंच दृष्ट नाहीं, आणि मेलनांत गुण प्रगट झाला ह्मणजे चार पदार्थ गुणानें आच्छादित होतात तसे चैतन्य गुण प्रगट झाल्यावर मेलनरूपी देह आच्छादित होत

नाहीं.सूर्यकिरणांत अनेक रंग उत्पन्न होतात त्या रंगानीं सूर्यकिरण दृश्य म्हणणें केवढें विरुद्ध आहे? तसें गुणानें देहादि पदार्थ दृश्य होतात हें म्हणणें विरुद्धच आहे. दुसरे पक्षीं पदार्थानें पदार्थ दृश्य होतात म्हणावें तर पृथ्वीनें उदक दृश्य,उदकानें वायु दृश्य इत्यादि विरुद्ध आहे तेव्हा देहास आणि चार पदार्थांस जें दृश्यत्व होतें यावरून चैतन्य गुण संभवत नाहीं.

चैतन्यास गुण म्हणणाराला हा एक प्रश्न आहे कीं पदार्थ कुजतात किंवा गुण कुजतो? प्रथम पक्षीं,पदार्थ कुजतात म्हणावें तर पदार्थ नित्य असें लोकायतानीं मानिलें आहे तें विरुद्ध आहे.दुसरे पक्षीं गुण कुजतो म्हणावें तर गुणास सत्ता नाहीं,तो पदार्थाश्रित असणार,कुजेल कसा? कुजणें तर प्रत्यक्ष आहे. तेव्हां काय कुजतें? मेलन झालेल्याचें पृथक्करण आपोआप होतेवेळीं कुजणें हा धर्म प्रगट होतो म्हणशील तर सांग जो धर्म प्रगट होतो त्यास आश्रय धर्मी पाहिजे तो धर्मी पदार्थ म्हणतोस किंवा धर्मी वांचून धर्म उत्पन्न झाला म्हणतोस?पहिले पक्षीं धर्मी पदार्थ म्हणशील तर धर्म नष्ट होण्यावरोबर धर्मी नष्ट मानावा लागेल.दुसरे पक्षीं धर्मीवांचून धर्म संभवत नाहीं. तेव्हां पदार्थ सहजमलिन आणि नश्वर आहेत असें म्हटलें पाहिजे. पदार्थ नित्य म्हणणें संभवत नाहीं. आतां पदार्थ परस्परें मेलन पावतात ते एक जातीचे आहेत किंवा भिन्न जातीचे मेलन पावतात? प्रथमपक्षीं एक जातीचे मेलन पावतात असें ह्मणावें तर पृथ्वी, उदक, तेज, वायु या चार पदार्थांची जाति एक आहे असें ह्मणावें लागेल. तसें ह्मटलें तर चार पदार्थ मानणें व्यर्थ होय.दुसरे पक्षीं मेलन भिन्न पदार्थांचें होतें ह्मणावें तर हें असंभवनीय आहे, कारण पृथ्वी व उदक हीं क्षणमात्र मिळालीं असें दिसतें पण पुन्हा वेगळींच.अग्नि,उदक किंवा तेज,उदक कधीं एक होत नाहींत.वायूनें एक होतात ह्मणावें तर वायू प्रवाही ह्मणतोस किंवा अप्रवाही?प्रवाही ह्मणावें तर त्या वायूनें मेलन होणें नाहीं, कारण मेलनांत घनीभाव पाहिजे तो वायू प्रवाही असल्यानें संभवत नाहीं. अप्रवाही मानल्यास वायूनें मेलन होतें हें पूर्ववत् विरुद्ध आलें. तेव्हां जड पदार्थांचें मेलनच संभवत नाहीं, मग त्यापासून चैतन्य गुण उत्पन्न होतो हें ह्मणणें निरर्थक होय. तस्मात् चैतन्य स्वतंत्र पदार्थ आहे असें युक्तीनें कबूल केलें पाहिजे. तोच आत्मा होय आणि तो देहादिकांहून वेगळा सिद्ध आहे. आतां रसायनशास्त्रवादी म्हणतात कीं, जर पदार्थांचें मेलन होत नाहीं म्हणतां, तर यंत्रादिकानें मेलन आणि पृथक्करण हें दाखवितों यावरून मेलन प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध आहे. असो आतां त्याचा परिहार इतकाचकीं पदार्थाचे धर्म,पदार्थाचें स्वरूप व गुण यांचा विचार करण्यांत पदार्थास स्थिति संभवत नाहीं. त्याच प्रमाणें मेलनाची रीति संभवत नाहीं असें असतां प्रत्यक्ष प्रमाणानें मेलन दिसतें तें जसें सूर्य किरणात अनेक रंग दिसतात त्यांत पांढऱ्या रंगास तांबड्यानें खाल्लें किंवा पांढरा तांबड्यांत मिळाला हें प्रत्यक्ष प्रमाणानें जरी दिसलें तरी तो भ्रम. पांढरा तांबडा हे रंग एकमेकांस खात नाहींत, व मिळतही

नाहींत,तर सूर्यकिरण त्याला आश्रय असल्यानें त्यांत रंगाचा संबंध व असंबंध होतो.व तें किरणच त्या त्या भावानें होतें त्याप्रमाणें मेलन पृथक्करण जरी प्रत्यक्ष दिसलें तरी तो भ्रम होय. यास आश्रय अहंप्रत्यय असल्यानें त्या त्या पदार्थरूपानें मेलन, पृथक्करण उत्पत्ति व नाश इत्यादि रूपानें तोच स्फुरला आहे. असा विचार सिद्ध होतो, आणि पुढेंही होईल. येणेंकरून शरीरगत जीं चार भूतें त्यांहून वेगळा आत्मा सिद्ध झाला. आतां आकाश शशशृंगवत् शून्य आहे, पदार्थ नव्हे यास लौकिक अनुभवीं विरोध येतो. तो असा—आकाश आहे असें अस्तित्व सर्व मानतात. कांहीं नाहीं असा अभावपदार्थ नव्हे, पोकळ आहे, सर्व राहण्याचें स्थान होय. तें अभावपदार्थ ह्मणजे शून्य असेल तर शून्य कोणास स्थान झालें असें दृष्टश्रुत नाहीं. तेव्हां आकाश भावपदार्थ आहे. शून्य असें लोकायत ह्मणतात तें संभवत नाहीं.

शंका.—कोणत्याही पदार्थाची सिद्धि केली तर त्यास प्रत्यक्ष प्रमाण पाहिजे,त्यावांचून सिद्धि नव्हे.तुह्मी प्रत्यक्षप्रमाणानें भासणार पदार्थांस व शरीरास मिथ्यात्व देऊन ज्यास प्रत्यक्ष प्रमाण नाहीं तो आत्मा आहे असें सिद्ध केलें. तर त्याप्रमाणें तो आहे. ह्मणणें तुह्मांस कसें इष्ट झालें अशी शंका झाल्यास उत्तर सांगतात.—तो आहे ह्मणण्यास आह्मांस इतकेंच इष्ट झालें कीं सात विशेषणें ज्याजवर आहेत तो आत्मा होय. तीं विशेषणें सांगतों.—हे शरीर सहजमलिन आहे त्याचे साक्षित्वें करून हा आत्मा नित्य स्वच्छ आहे.देह मलिनरूपच.त्याचा मल न स्पर्शतां आणि देहाचे अनित्यतेसही न स्पर्शतां आत्मा नित्य स्वच्छ आहे, कारण जो ज्याचा साक्षी तो तद्धर्मवान् होत नाहीं. जसा घटाचा साक्षी घटधर्मवान् होत नाहीं त्याप्रमाणें देहाचा ह्मणजे सहजमलिन अशा शरीराचा साक्षी आत्मा तो देहधर्मवान् होत नाहीं ह्मणून नित्य स्वच्छ आहे. देह असा नश्वर आहे त्याच्या साक्षित्वानें स्थित आत्मा नाशरहित आहे. देहास दृश्यत्व आहे तेंही एका जागृदवस्थेत मात्र आहे, स्वप्न-सुषुप्तींत नाहीं. त्याचा साक्षी आत्मा सर्वदा ह्मणजे जागृति,स्वप्न,सुषुप्ति या तीन अवस्थेंत आणि देहाचे भावकालीं आणि अभावकालींही द्रष्टृरूपच आहे त्याची स्थिति कदापि बदलत नाहीं ह्मणजे दृश्यसापेक्ष द्रष्टा नव्हे तर द्रष्टा हेंच स्वरूप आहे. देह नाना रोग, दुःखें यांचें स्थान आहे, याचा साक्षी आत्मा परमप्रेमास्पदत्वास्तव आनंदसमुद्र आहे. देह जड आहे, याचा साक्षी आत्मा चैतन्यस्वरूप सार्वकाल आहे. देह विकारी आहे, याचा साक्षी आत्मा निर्विकार आहे. देह इंद्रियप्रत्यक्ष आहे आणि याचा साक्षी आत्मा स्वतःप्रत्यक्ष आहे.एवंच या सात विशेषणानीं युक्त आत्मा तो आहे म्हणण्यास योग्य आहे.तो नसेल तर सहजमलिन १ नश्वर २ दृश्यरूप ३ नानारोगांचें स्थान ४ जड ५ परोक्ष ६ व विकारी ७ या सात विशेषणानीं युक्त जो देह त्याचें साक्षित्व होणार नाहीं.

शंकाः—देहाचा साक्षी आत्मा वेगळा किमर्थ मानतां? असाक्षिक देह कां नाहीं होणार? या शंकेवर उत्तर सांगतोंः—देहाचा साक्षी आत्मा वेगळा आहे या विषयीं अनुभव जागरूक आहे ह्मणून मानतों. घट जसा दृश्य होतो त्याप्रमाणें देह दृश्य आहे, आणि घट माझा तसा देह माझा ह्मणतो यावरून देहाच्या दृश्यत्वममत्वांस्तव तत्साक्षी आत्मा वेगळा आहे. देह असाक्षिक कालत्रयीं होणें नाहीं.

शंकाः—तुह्मीं सात विशेषणांनीं युक्त आत्मा आहे असें जें सित्ध केलें तें प्रमाण नाहीं, कारण त्यास अस्तित्व कसें घडेल? जे दृश्य आकारवंत पदार्थ आहेत त्यांसच अस्तित्व संभवतें तसें येथें नाहीं. या शंकेवर उत्तर सांगतोंः— जे पदार्थ दृश्य आकारवंत आहेत त्यांसच अस्तित्व संभवतें त्यांवांचून अस्तित्व नाहीं तर हे पदार्थ कोणास दृश्यभूत होतात? दृश्याची सिद्धि दृश्यानें नाहीं तर द्रष्ट्यानें आहे. तेंव्हां द्रष्टृमूलक होणारें जें दृश्य त्याचा अस्तित्व हा धर्म आहे, स्वरूप नाहीं. द्रष्टा अस्तित्वधर्मवान् नाहीं तर अस्तित्वस्वरूपच आहे; कारण तो आकारवान् नाहीं. जसें स्वप्नकालीं पदार्थांस अस्तित्व जागृत होईपर्यंत भासतें ते अस्तित्व ह्मणावयास येत नाहीं तसें जागृतकालीं पदार्थांस अवस्थांतर होईपर्यंत अस्तित्व भासतें तें प्रमाण नाहीं. तर मी आहें मी नाहीं असें कालत्रयीं अवस्थात्रयांत होत नाहीं, तर मी आहेंच असें अस्तित्व पदार्थांस न धरतां अनुभवानें आहे तें प्रमाणच आहे अप्रमाण नाहीं.

शंकाः—तुह्मीं सांगितल्या प्रकारांचा जो आत्मा त्यास अस्तित्व असो; परंतु देहावांचून याचा अनुभव नाहीं तेंव्हां आमचे मतांत तुमचा अंतर्भाव असतां एतावत्कालपर्यंत तुह्मीं जें प्रतिपादन केलें तें व्यर्थ होय. अशी शंकाः—इजवर उत्तर सांगतोंः—देह सहज मलिन, आणि आत्मा नित्य स्वच्छ; देह नश्वर, आत्मा नाशरहित; देह दृश्यरूप, आत्मा द्रष्टृरूप; देह रोगांचें स्छान, आत्मा सौख्यसमुद्र; देह जड, आत्मा चैतन्यस्वरूप; देह विकारी, आत्मा निर्विकारी; देह परोक्ष, आत्मा नित्य अपरोक्ष; अशीं देहाचीं आणि आत्म्याचीं सात विशेषणें सांगितलीं त्यांत देहाचा स्पर्श सुद्धां आत्म्यास नाहीं. मग देहावांचून आत्म्याचा अनुभव नाहीं कसा ह्मणतोस? आणि देहानें आत्म्याचा अनुभव होतो किंवा आत्म्यानें देहाचा अनुभव होतो? प्रथमपक्षीं देह जड, यानें आत्म्याचा अनुभव कसा होईल? घटानें चक्षूचा अनुभव होणें नाहीं तद्वत्. द्वितीय पक्षीं आत्म्यानें देहाचा अनुभव जाग्रदवस्थांतःपाती होतो असें ह्मणशील तर इष्ट आहे. चक्षूनें घटाचा अनुभव तसा द्रष्टृरूप आत्म्यानें देहाचा

श्लोक.

नाहं प्राणोप्यविकृतवपुः क्षुत्तृषाद्यैः प्रतप्त
श्चित्तं नाहं यदनुविषयव्यक्तमन्यानपेक्षः ॥

---

अनुभव होतो देहानें होणें नाहीं; कारण तो जड ह्मणून. तस्मात् देहाचा आणि आत्म्याचा देहावर संबंध नाहीं. दृग्दृश्यरूपानें दोघे भिन्नच आहेत.

शंकाः—असें जर आहे तर द्रष्टृत्व देहावर अनुभवास येतें हें कसें ह्मणशील तर उत्तर ऐक. देहाचे ठायीं द्रष्टृत्व अनुभवास येतें ती प्रतिबिंबनिष्ठ भ्रांति आत्म्यावर अविवेकानें आहे (असें पुढें चतुर्थ श्लोकांत सांगणें आहे.) तेणें करून वाटतें. वस्तुतः देहावर द्रष्टृत्व नाहीं तर पृथक् आहे असा सिद्धांत होय. ॥ ३ ॥

या प्रकारें करून तृतीय श्लोकावर देहात्मवादींचें खंडण दाखवून आतां पुढील श्लोकावर प्राणात्मवादी, मनआत्मवादी, बौध्द, आणि नैयायिक अशा चार वादींचें निराकरण करणें आहे तर प्रथमतः प्राणात्मवादींचें मत दाखवितोः—शरीरांचे आंत वायूचा संचार जो प्रत्यक्षत्वानें होतो त्याचे पांच किंवा दहा वर्तनाचे भेद कल्पून त्यास तीं नांवें दिलीं आहेत. तीं अशीं:—नाभीपासून ऱ्हदयापर्यंत जो वायूचा धक्का अनुभवास येतो त्यास प्राण असें ह्मणतात. नाभीपासून पश्चिमद्वारानें जो वायूचा प्रवाह त्यास अपान असें ह्मणतात. ऱ्हदयापासून कंठस्थानीं धक्का देऊन नासाग्रवर्ती येतो जातो जो वायू त्यास उदान असें ह्मणतात. नाभिस्थानाचा जो धक्का त्यास समान ह्मणतात. तो अन्न व पान यांचा रस होण्याचें यंत्र, सर्व शरीराचें समतोलन किंवा मध्यबिंदु असून पुढें सांगावयाचा जो व्यान त्याच्या द्वारें सर्व नाडींत रस पोंचविणें हा व्यापार त्याचाच आहे. सर्व शरीरांतल्या नाड्यांत संचार करून सर्व अवयव हालविणें इत्यादि व्यापार ज्या वायूनें होतात त्यास व्यान असें ह्मणतात. एवंच यांस पंच प्राण ह्मणतात. ढेकर,शिंक या धक्क्याला जो वायू कारण त्यास नाग ह्मणतात. डोळ्यांवरील पापण्या उघडणें, मिटणें या व्यापारांस कारण जो वायू त्यास कूर्म ह्मणतात. क्षुधा किंवा शरीरास हसडे देणाऱ्या वायूस कृकर ह्मणतात. जांभई देणारा जो वायू त्यास देवदत्त ह्मणतात. मूर्छाकालीं प्रेतवत् स्थिति झाली असतां ब्रह्मरंध्रावर नळी ठेवून कानास लाविली असतां ज्याचा घोष ऐकूं येतो त्या वायूस धनंजय असें ह्मणतात, असे दहा वायू होत. या सर्वांस साधारण नाम प्राण असें आहे. हे प्राणच शरीरांत मुख्य आहेत. शरीराचें जीवन होतें तें या प्राणांनींच होतें. शरीरांत जठराग्नि म्हणून कांहीं शेगडी इत्यादि प्रत्य-

क्ष अग्नि नाहीं. तर यांचें घर्षण होऊन जें मध्यबिंदूवर संमेलन होतें त्याचें नांव जठराग्नि. जठराग्नीशीं सह वर्तमान प्राण नाहीं तर जगणें नाहीं, प्राण असतील तर जगणें होतें, तेव्हां तो प्राणच आत्मा होय. क्षुधा आणि तृषा हे प्राणाचे धर्म असल्यानें मी क्षुधावान्, तृषावान् इत्यादि आपलेपणाचा अनुभव प्राणावर आणि त्याचे धर्मावर दिसतो आणि आधुनिक वायु गेला तर आह्मी नाहीं असा सर्व लोक अनुभव पाहतात व बोलतात. तेव्हां प्राणच आत्मा असें प्राचीन लोकायतांतील एकदेशी आणि प्राणोपासक व हैरण्यगर्भोपासक बोलतात.

आतां या प्राणात्मवादींचें खंडण दाखवितों—शरीरविकारानीं युक्त आणि क्षुधातृषादिकांनीं पीडा पावणारा जो प्राण तो मी नाहीं, कारण मला शरीरविकार नाहींत आणि क्षुधातृषादि पीडा नाहीं. येणेंकरून प्राणात्मवादींचें खंडण सुचविलें तें असें:—प्राणास शरीरविकार आहेत ह्मटल्यानें प्राणास जडत्व, दृश्यत्व, नश्वरत्व इत्यादिक स्वाभाविक दोष आहेत. आकाशांत संचार करणारे वायूस जसें स्वज्ञान व परज्ञान नसल्यानें जडत्व आहे त्याप्रमाणें सुषुप्ति, मूर्छा इत्यादि अवस्थांचें ठायीं शरीरास धरून राहणारे प्राणवायूस स्वपरज्ञान नाहीं, तेव्हां तो शरीराप्रमाणें जड आहे. आणि जागृति स्वप्न या दोन अवस्थांत त्यास ज्ञान आहे ह्मणावें तर मी अमुक नाडींत या वेळीं वाहतों, तसेंच डाव्या पुडींत किंवा उजव्या पुडींत वाहतों हें कांहीं त्यास ज्ञान नाहीं. सुषुप्तिकालीं शरीररक्षण हें त्याचें कर्म आहे ह्मणावें तर चोर किंवा जार येऊन आपले शरीरावरील अलंकारवस्त्रादिक घेऊन गेला किंवा संनिध राहणारे स्त्रीशीं उपभोग करून गेला, तरी त्यास ज्ञान होत नाहीं तेव्हां प्राण जड आहे असें निश्चयात्मक झालें.

वायूस गति जी आहे ती स्वतंत्र नाहीं तर परतंत्र आहे. जसें पंखा हालविणारानें हालविला असतां तेथें वायू उत्पन्न होतो व गति येते; अथवा भात्याला प्रेरकानें प्रेरणा केल्यावांचून वायू वाहत नाहीं हें दृष्ट आहे त्याप्रमाणें शरीराचे आंत जाणें बाहेर येणें इत्यादि गति प्राण वायूस अनुभवास येत्ये तेव्हां यास प्रेरक आहे ह्मणून प्राणवायू परतंत्र आहे. प्रेरक नसेल तर प्रेतांत वायू असून गमनागमन टाकून स्थीर असतो, तेव्हां प्राण वायू अत्यंत जड आहे ह्मणून तो आत्मा संभवत नाहीं, आणि प्राणवायूस दृश्यत्व आहे तसेंच नश्वरत्व ही आहे ह्मणजे एखादे वेळीं नाडींत ज्या प्रमाणें गति असावी तसी न होतां विरुद्धच होऊन शरीराची स्थिति बदलून प्राणोत्क्रमणप्रसंग येतो यावरून नश्वरत्व सिद्ध आहे. तस्मात् जड, दृश्य, नश्वर, क्षुधातृषादिकांनीं पीडा पावणारा म्हणून विकारी न्यूनाधिक भावानें सर्व रोगांस कारण होणारा जो प्राण

तो कालत्रयीं आत्मा होत नाहीं. आत्मा (मी) या विकारांनीं रहित आहे. आणि मूर्छाकालीं प्राणस्पंदे नसतां तो देही पुरुष जिवंत असतो यावरून जीवनास प्राण कारण होत नाहीं. एवंच प्राणात्मवादींचें खंडण झालें.

आतां मनआत्मवादींचें खंडण दाखविण्या करितां त्यांचें मत दाखवितों. श्रोत्रानें ऐकणें त्वचेनें स्पर्श घेणें, डोळ्यानें रूप पाहणें, जिव्हेनें कडू गोड रस चाखणें, नासिकेनें गंधग्रहण करणें इत्यादि व्यापार जे होतात ते प्राणानें होत नाहींत कारण मन संकल्पित पदार्थांचें चिंतन करूं लागलें असतां प्राण असून इंद्रियद्वारा विषयांचें ग्रहण किंवा ज्ञान प्राणास होत नाहीं तेव्हां सर्व इंद्रियांचें प्रभू मनच आहे. तें मन स्वतःच प्रकाशित आहे. त्याचे वृत्तिभेद अनंत आहेत. जसा आकाशांत सूर्य एक असून त्याचे रश्मी अनंत आहेत त्या प्रमाणें ल्हदयाकाशाचे ठायीं मन एक असून त्याचे वृत्ति-भेद अंनत असल्यानें सर्व शरीरास व्यापून जेथील तेथें ज्ञान होतें. तेंच प्राणांस प्रेरक आहे. त्याचे योगानें सर्व शरीरेंद्रियज्ञान व सृष्टीचें ज्ञान होतें. मी संकल्पवान्, मी विकल्पवान् असा आपला अभिमान मनावर आहे. मन जिकडे असतें तिकडे आपला अभिमान असतो. तस्मात् मनच आत्मा होय असें लोकायतांतील एकदेशी प्राचीन आणि अर्वाचीन बोलतात त्यांचें खंडण दाखवितां:—विषयाला धरून स्पष्ट होणें अशा स्वरूपाचें चित्त ह्मणजे मन मी आत्मा होत नाहीं, कारण मी (आत्मा) विषयाला धरून स्पष्ट होणारे चित्तासारखा अन्याची अपेक्षा धरून राहणारा नव्हे. तर विषयादिकांला नधरतां स्वतःच स्पष्ट आहे. येणें करून मन आत्मा नव्हे असें जें सिध्द झालें तें च स्पष्ट करतों. मन हें स्वतंत्र आहे किंवा परतंत्र आहे? प्रथम पक्षीं मन स्वतंत्र आहे ह्मणावें तर त्यास क्लेशाची ह्मणजे दुःखाची प्राप्ति होऊंनये कारण दुःख हें कोणास इष्ट नाहीं. कोणीही पुरुष दुःखाचा परिहार शोधितात. दुःख स्वतंत्र आत्म्यास होणें नाहीं. कारण मला दुःख असावं असें मन कधींच चिंतन करीत नाहीं. तेव्हां मनास स्वतंत्रता संभवत नाहीं. दुसरे पक्षीं मन परतंत्र आहे ह्मणावें तर घट परतंत्र असल्यानें तो आत्मा कधींच संभवत नाहीं तसें मन परतंत्र असल्यानें त्यास आत्मत्व संभवणार नाहीं.

शंका:—सर्व इंद्रियांचें अथवा सर्व शरीराचें स्वामी मन आहे, कारण इंद्रियास आपआपलें विषयाचें ग्रहण मना वांचून होत नाहीं तेव्हां मनच आत्मा होय अशी शंका जाहल्यास याजवर विचारतों तें सांग. परतंत्र जें मन तें इंद्रियादिकांस आपआपले विषयाचें ग्रहण करविण्यास कर्तृरूप स्वप्रकाश आत्मा होय किंवा साधनरूप होय. प्रथम पक्षीं स्वप्रकाश आत्मा ह्मणशील तर परतंत्रत्व हा एक दोष आणि अनेकवृत्तिमत्व मनास असल्यानें सद्वयत्व, विकारित्व दोष येतात ह्मणून

स्वप्रकाश आत्मा संभवत नाहीं. द्वितीय पक्षीं मन साधन आहे ह्मणशील तर दीपप्रभेंकरून घटपटादि प्रकाशित होऊन हस्तानें घटपटांचें ग्रहण झालें ह्मणून दीप हस्त हे कांहीं आत्मा होत नाहींत तसें मनाच्या प्रकाशानें इंद्रियें आपआपला विषय ग्रहण करतात ह्मणून मन इंद्रियादि आत्मा होत नाहींत, कारण तीं दीपवत् करणेंच होत.

शंका—मन दीपाप्रमाणें स्वप्रकाशित असल्यानें आत्मा होय असें ह्मणशील तर सूर्य, दीप, अग्नि इत्यादि पदार्थ स्वप्रकाशित आहेत ह्मणून कधीं आत्मा होतात असें नाहीं कारण सूर्य उदयास्तसंबंधानें क्षणिक स्थितीनें युक्त आहे. तसेंच अग्नि उत्पत्तिनाशानीं युक्त आहे. दीप ज्वालांतरानें युक्त आहे ह्मणून विकार सिद्ध होऊन आत्मा होत नाहींत. तसें मन प्रकाशित असलें तरी अनेक वृत्तिभेदानें क्षणिक;उत्पत्ति, नाश इत्यादि विकारानीं युक्त असल्यामुळें आत्मा होत नाहीं.

शंका—प्राणाचें प्रेरक मन आहे ह्मणून आत्मा होतें असी शंकाः—इजबर उत्तर सांगतों. प्राणाचें प्रेरक मन होत नाहीं. सुषुप्तिकालीं मनाचा लय असून प्राणाचें गमनागमन चालतें तेव्हां मन प्राणास प्रेरक होत नाहीं. एतादृश जें मन तें सार्वकाल विषयास धरल्यावांचून अनुभवास येत नाहीं तेव्हां त्यास दृश्यत्व, नश्वरत्व, दुःखालयत्व हें सिद्ध आहे.

शंका—मनावांचून ज्ञानाचा अनुभव नाहीं, तेव्हां चैतन्यत्व मनास आहे ह्मणून तें आत्मा होय असें ह्मणशील तर सांग; मन असतां, वाक्य पाठ केलेलें असतां हें अमुक वाक्य असें न आठवतां स्तब्ध कां राहतो, आणि विस्मरण अवस्था होते ती होऊं नये. संस्कार दृढ नाहीं ह्मणून विसरतो ह्मणशील तर संस्कार दृढ असलेले ही एकाएकीं विसरतो तेव्हां संस्कार कारण नाहीं.

शंका—हा मनाचा धर्म ह्मणशील तर जेथें मनाचा लय होतो अशी सुषुप्ति प्राप्त असतां कोणी अन्य पुरुषानें हाक मारिली तर उत्थान होऊन 'एतावत्पर्यंत मीं कांहीं जाणलें नाहीं' असें अज्ञानाचें स्मरण करतो. तेथें मन नसतां अज्ञानाचें ज्ञान कशानें होतें? जसें सूर्यकांत भिंगाचा आणि सूर्यकिरणांचा संबंध असतां अग्नि प्रकट होतो तो सूर्यकांत भिंगावांचून होत नाहीं ह्मणून सूर्यकांत भिंग सूर्य किंवा अग्नि होणार नाहीं तसें मनाचा आणि आत्म्याचा संबंध होऊन ज्ञान प्रकट झालें ह्मणून तें ज्ञान मनच असें होणार नाहीं. तर ज्ञान स्वतंत्र आहे हें आतांच सुषुप्तीच्या अज्ञानाचें ज्ञान मनावांचून सांगितलें. तस्मात् अन्यसापेक्ष मन आत्मचैतन्य होत नाहीं. तर तें जड आहे. एवंच मन-आत्मवादींवर दोष सांगून बौध्दवादींचें खंडण करण्याकरितां बौद्धांचें मत दाखवितों:—

सर्व वस्तूंचें ज्ञान ज्याला होतें असें जें विज्ञान म्हणजे बुद्धि हीच आत्मा होय. तो आत्मा प्रतिक्षणीं नवा नवा होतो. हें सर्व जगत् बुद्धिगतच आहे जसें स्वप्न बुद्धीवांचून नाहीं; परंतु बाहेर भासतें असा भ्रम होतो तसें सर्व जगत् बुद्धिवांचून भासत नाहीं, आणि बुद्धींतच आहे. बाहेर भासतें असें जें वाटतें तो भ्रम आहे. पृथ्वी, आप्, तेज, वायु या चार भूतांच्या परमाणूंचे पुंज शरीर पंचस्कंधात्मक आहे. स्कंध ह्मणजे वृक्षास जशा फांद्या असतात तसे बुद्धिरूप आत्म्याचे शरीरादि पांच स्कंध ह्मणजे फांद्या होत. ते स्कंध रूप, विज्ञान, संज्ञा, संस्कार आणि वेदन असे पांच होत, रूप ह्मणजे इंद्रियांचा आणि विषयांचा संबंध तो रूप स्कंध ॥ १ ॥ विषयांचें आणि इंद्रियांचे जें ज्ञान तो विज्ञानस्कंध २ गायींचे ठायीं गौ ही संज्ञा, गायीचे ठायीं गोत्व ही जाति, शुक्लादिक गुण, गमनागमन क्रिया, शृंग ज्यास आहे तो शृंगी, चार पाद आहेत तो चतुष्पाद; ज्यास शेपूट आहे तो लांगुली इत्यादि विशिष्ट प्रत्यय एवंच संज्ञा,जाति,गुण,क्रिया,आणि विशिष्ट प्रत्यय या पांच रूपानीं संज्ञास्कंध जाणावा॥३॥ विषयांचे ठायीं प्रीति किंवा द्वेष, पाप किंवा पुण्य यांस संस्कारस्कंध ह्मणतात॥४॥ सुख, दुःख, व मोह यांस वेदनस्कंध ह्मणतात. या पांचाहून वेगळा आत्मा नाहीं. यांस कर्ता ईश्वर नाहीं.सर्व जगत् बुद्धिरूप आत्म्या बाहेर नाहीं.स्कंधांचे जे परमाणु ते ही क्षणिकच आहेत. सर्व क्षणिक असतां पूर्व क्षणांतलें जगत्, आत्मा व शरीर हें कांहीं उत्तर क्षणांत नाहीं.असें असून पूर्व क्षणांतलें ज्ञान उत्तर क्षणांत होतें कसें, असें कोणी ह्मणेल तर दीपाचे ठायीं ज्वाला वारंवार येतात त्यांत ही पूर्व ज्वाला ही उत्तर ज्वाला असें ज्ञान होत नाहीं तर अखंड असे ज्ञान होतें त्या प्रमाणें पूर्व क्षणाचें ज्ञान उत्तर क्षणांमध्यें होतें इत्यादि बोलणारे बौद्ध होत त्यांचें खंडण दाखवितोः—

क्षणांत उत्पन्न होणारे क्षणांत नाश पावणारें असें जें विज्ञान म्हणजे बुद्धि मी आत्मा कांहीं होत नाहीं कारण मी उत्पत्तिनाशरहित उत्पत्ति, नाश यांचा साक्षी सार्वकाल आहें येणें करून बौद्धमताचें खंडन सुचाविलें तें असें:—जें क्षणांत उत्पन्न होऊन नाश पावणारें विद्युल्लता, अभ्र निमेष, उन्मेष इत्यादि ते ही आत्माच होतील, आणि जर आत्मे नवे नवे होतात तर ते पूर्वसदृश होतात किंवा पूर्वविसदृश होतात? प्रथम पक्षीं पूर्वसदृश होतात ह्मणावें तर पूर्व क्षणाचें ज्ञान उत्तर क्षणींच्यास किंवा पूर्व क्षणींच्यास? उत्तर क्षणच्यास पूर्व माहित नाहीं. पूर्व क्षणींच्यास म्हणावें तर त्याच्या पूर्व क्षणास पूर्व क्षण ह्मटलें तेव्हां सर्व उत्तरच होतात तेव्हां पूर्वसदृश आत्मे होतात हें संभवत नाहीं. द्वितीय पक्षीं पूर्व विस-

दृश आत्मे होतात म्हणावें तर कालचा जो मी तोच आज आहें, तसेंच कालचें जें जगत तेंच आज अनुभवास येतें तें येणार नाहीं तर दुसरेंच येईल आणि असें झाल्यानें नित्य क्षणोक्षणीं नामकरण करावें लागेल. क्षणांत गोपाळा तो गोविंदा होईल. गोविंदा तो हरी होईल, तसेंच घट तो पट होईल; पट कुड्य होईल असा घोंटाळा होऊन जाईल तेव्हां पूर्व विसदृश आत्मे संभवत नाहींत.

शंका—जसीं स्वप्नें नवीं नवीं होतात ह्मणून तुह्मीं सांगितल्याप्रमाणें घोंटाळा येत नाहीं त्याप्रमाणें विज्ञान क्षणिक जरी असलें तरी घोंटाळा होत नाहीं. या शंकेवर उत्तर सांगतों:—स्वप्नें नवीं नवीं जरी झालीं तरी स्वप्नें ज्यास पडलीं तो नवा नवा होत नाहीं. जागृत झाल्यानंतर मला अमुक तऱ्हेचें स्वप्न पडलें असें स्मरण करतो तेव्हां तो पुरुष एक आहे. तसें क्षणिक विज्ञान तुमचे मतीं नाहीं प्रतिक्षणीं आत्मा नवा मानतां ह्मणून पूर्वींचा घोंटाळा येतो. आणि प्रतिक्षणीं नवा नवा आत्मा होतो ह्मणतां त्यास उपादान अन्य आहे ह्मणून नवा नवा उत्पन्न होतो किंवा निरुपादान ह्मणतां? प्रथम पक्षीं उपादान आहे ह्मणाल तर तें आत्मा आहे किंवा अनात्मा आहे? आत्मा आहे ह्मणशील तर विज्ञान कार्य झाल्यानें त्यास आत्मत्व संभवत नाहीं तर अनात्मत्व झालें. तेव्हां तुझा अपसिद्धांत झाला. अनात्मा ह्मणशील तर त्यास उपादानत्व संभवणार नाहीं. द्वितीयपक्षीं उपादान नाहीं ह्मणशील तर शून्यापासून विज्ञान उत्पन्न होतें ह्मणावें लागेल. तसें ह्मटलें तर उपादान शून्य आणि कार्य शून्य असा कार्यकारणांच्या अभेदपक्षानें सिद्धांत झाला. तेव्हां घट शून्य पट शून्य जग शून्य मी शून्य असा व्यवहार कोठेंच मूर्ख विद्वान इत्यादि लोकांत दृष्टश्रुत नाहीं. तसेंच सर्व शून्य असतां तुमचे डोक्यावर ओझें दिलें तर त्या भारानें तुह्मी श्रमी कां होतां? कारण भार शून्यच आहे. आणि व्रतादिकाचें आचरण कां करतां तेव्हां हें मत अगदींच असंभावि आहे.

शंका—पूर्व आत्मा नष्ट होऊन दुसरा उत्पन्न होण्यास पूर्व आत्म्याचा संस्कार उपादान आहे ह्मणून दुसरा होतो असें ह्मणशील तर सांग. पूर्व आत्मा नष्ट झाल्यावर त्याचा संस्कार कोठें रहातो? पूर्व आत्म्याचे ठायीं राहातो किंवा उत्तर आत्म्याचे ठायीं राहातो? प्रथम पक्षीं पूर्व आत्म्याचे ठायीं राहातो ह्मणशील तर पूर्व आत्मा नष्ट झाला तेव्हां त्याचे ठायीं राहातो असें संभवत नाहीं. द्वितीय पक्षीं उत्तर आत्म्याचे ठायीं राहातो ह्मणशील तर उत्तर आत्मा व पूर्व आत्मा एककाळीं संभवतील तर त्यांचा संबंध मानतां येईल. तो संबंध जर होत नाहीं तर संस्कार कसा संभवेल?

शंका—जसें–विंचु किंवा खेकडा हें गरोदर असतात तेव्हां गर्भाचा आणि त्यांचा संबंध असल्यानें संस्कार होऊन पूर्व विंचु किंवा खेकडा नष्ट होऊन नवे होतात तसें पूर्व आत्मा आणि उत्तर आत्मा यांचा संबंध असल्यानें संस्कार होऊन पूर्व आत्मा नष्ट होऊन उत्तर आत्मा उत्पन्न होतो. या शंकेवर उत्तर सांगतों. पूर्व आत्म्याचे ठायीं उत्तर होणारा जो आत्मा याचा संबंध असतांना त्या उत्तर आत्म्याचें स्वरूप काय–ह्मणजे उपलब्धविज्ञान आत्मा किंवा अनुपलब्धविज्ञान आत्मा? प्रथम पक्षीं उपलब्धविज्ञान आत्मा म्हणशील तर पूर्व आत्म्याचे ठायीं उत्तर आत्मा उपलब्ध नाहीं. तेव्हां अनुपलब्धास संबंध संस्कार आणि आत्मत्व हे तीन ही संभवत नाहींत. आतां द्वितीय पक्षीं अनुपलब्धविज्ञान आत्मा ह्मणशील तर अनुपलब्धविज्ञान तुझे मतीं अंगीकृत झाल्यास तो क्षणिक संभवणार नाहीं. तेव्हां तुमचे मतास अपसिद्धांत आला. तस्मात् पूर्व आत्मा आणि उत्तर आत्मा यांचा संबंध नाहीं. आणि ह्याचे सुषुप्तिकालीं मूर्छाकालीं व मरणकालीं क्षणिक विज्ञानास स्थिति नसतां अस्तित्वाची प्रतीति मूढापासून विद्वानांपर्यंत होते असें असतां तुह्मी विज्ञानवादी निरात्मत्व प्रतिपादन करतां तेव्हां तुमचें मत अनुभवास विरुद्ध आहे. एवंच विज्ञानाचें खंडन सांगून बाह्य जग नाहींच ह्मणतात त्यांचेंही दाखवितो. मनोमय जगत् आणि इंद्रियांनीं उपलब्ध जगत् हें एकच ह्मणशील तर मनोमय नष्ट झाला कीं बाह्य पुत्र नष्ट व्हावा मनोमय जग ( स्वप्न रूप )निवृत्त झालें कीं जागृतींतील जगत् नष्ट व्हावें. तें होतेंच ह्मणावें तर कालचा तूं, कालचा मी, कालचें जग इत्यादि वर्तमान कालांत झालें असें ह्मणावें लागेल. मग एक नष्ट होण्याबरोबर सर्वनष्टत्व प्रसंग येईल. तेव्हां इंद्रियप्रमाणानें प्रत्यक्ष होणारें जग व मनोमय जग हें एक असें कालत्रयीं संभवत नाहीं. याचें विशेष वर्णन विज्ञानखंडनाचें येथें अनुसंधान करावें म्हणजे त्यांतच होतें; कारण क्षणिक विज्ञान जगदादिस्कंधांस घेऊन आहे असें त्यांचें मतच आहे. एवंच बौद्धवादींस खंडित करून नैयायिकमत खंडन करण्याकरतां दाखवितो:–ज्ञान म्हणून जें उत्पन्न होतें तें आत्मा आणि मन यांचा अदृष्टानें संयोग झाला म्हणजे उत्पन्न होतें. तें ज्ञान, बुद्धि, इच्छा, द्वेषादि आत्म्याचे गुण होत. त्या गुणांला आश्रय तो आत्मा म्हणजे इदंवृत्तीला आश्रय अहं तो नित्य,व प्रतिशरीरीं भिन्न भिन्न आहे, आणि सुषुप्त्यादि अवस्थेंत आत्ममनःसंयोग बिघडला असतां ज्ञानगुण नष्ट होतो तेव्हां तें मन पुरीत नाडींत राहतें; परंतु आत्मा सर्व शरीरास व्यापून आहे इत्यादि बोलतात त्यांचें खंडन दाखवितों. परिणाम ह्मणजे अवस्थात्रयादि विकार, परिच्छेद, देह-

विशिष्टत्व अशा लक्षणांनीं युक्त अहं तो मी नव्हे, कारण परिणाम जे अवस्थात्रयादि विकार व परिच्छेद यां रहित मी आहे. येणें करून नैयायिकमताचें खंडन सुचाविलें. तें असे— जो स्वतः जड आणि परिछेद—परिणामानीं युक्त तो मृपिंडवत् आत्मा नव्हे. सुषुप्तिकालीं ज्ञानादिगुणांवांचून आत्मा आहे. तेव्हां त्या अवस्थेचें अनुभवपूर्वक जागृतींत स्मरण जें होतें तें कोणास? आत्म्यास होतें म्हणावें तर त्यास ज्ञान नाहीं, तो जड आहे.

**शंका**—'मी सुप्त होतों असें ज्ञान जागृतींत अनुमानानें होतें' ह्मणाल तर प्रत्यक्षादि लिंगें असल्यावांचून अनुमान संभवत नाहीं. तर अहं एतल्लक्षण जें पात्र त्यांत आत्मचैतन्याचें प्रतिबिंब आहे ह्मणून त्या अवस्थेचें अनुभवपूर्वक स्मरण होतें. आणि जर बुद्ध्यादि गुण आत्म्याचेठायीं समवाय संबंधानें म्हणावें' तर विचारतों तें सांग. रूपादि गुण जसे द्रव्याचे ठायीं व्यापून असतात तसे बुद्ध्यादि गुण आत्म्याचे ठिकाणीं व्यापून आहेत किंवा संयोगादिकां सारखे एकदेशी आहेत? प्रथम पक्षीं व्यापून आहेत म्हणावें तर घटादिवत् ज्ञाततादि व्यवहार सिध्द होणार नाहीं. द्वितीय पक्षीं संयोगादिकांसारखे एकदेशी म्हणावें तर त्यांस सत्यत्व आहे किंवा असत्यत्व आहे? सत्यत्व ह्मणावें तर घटादिवत् आत्म्यास एकदेशत्वास्तव कार्यत्वप्रसंग आला. असत्य ह्मणावें तर ज्ञानादि गुणानीं आत्मा ज्ञानादिगुणवान् होणार नाहीं. तेव्हां समवाय संबंध नाहीं; आणि स्मृति उपन्न होण्याला कारणभूत जो भावनाख्य संस्कार त्याचा व्यापक आत्म्याचे ठायीं समवाय होत नाहीं. जर आत्म्याचे आणि मनाचे संयोगापासून स्मृति उत्पन्न होते ह्मणावें तर पूर्वजन्मादिकांचें स्मरण व्हावें, अथवा एकसमयावच्छेदें करून सर्व स्मरण व्हावें म्हणजे सर्व जगत् किंवा पूर्वजन्म वर्तमान, व भविष्य या सर्वांचें स्मरण व्हावें असा प्रसंग येतो, आणि आत्म्याची व मनाची जाति भिन्न असून आत्मा अस्पर्श तेथें मनाचा संबंध कसा पोंचेल? तो संबंध पोंचतो म्हणावें तर द्रव्याहून रूपादि गुण, कर्म, सामान्य, विशेष, समवाय हे अभिन्न आहेत किंवा भिन्न आहेत? प्रथम पक्षीं अभिन्न आहेत म्हणावें तर नैयायिकाचें मतास अपसिध्दांत आला; कारण पदार्थषट्क नाहीं असें त्यानींच कबूल केलें. द्वितीय पक्षीं भिन्न आहेत म्हणावें तर द्रव्याचा आणि त्यांचा संबंध संभवत नाहीं.

**शंका**—आत्मा द्रव्य आहे आणि मन द्रव्य आहे, तसेंच इच्छादि गुण आहेत. यांमध्यें एक दुसऱ्याचा आश्रय करून राहतो यास अयुतसिध्द ह्मणतात. तेव्हां अयुतसिध्द आत्मा, मन, व इच्छादि गुण यांचा समवाय संबंध होतो अशीं

श्लोक.

यत्रैवाहंकीतिरुदभवद् यत्र धीजन्मनाशौ
यस्मात् प्रादुर्भवति च मनो मारुतो यत्प्रयुक्तः ॥

---

शंका जाहल्यास त्याचें उत्तर सांगतों. इच्छादिक गुण, मन द्रव्य हें अनित्य ह्मणतोस किंवा नित्य म्हणतोस? प्रथम पक्षीं अनित्य ह्मणशील तर नित्य आत्मा जो पूर्व सिध्द आणि अनित्य मन व इच्छादि यांची अयुतसिध्दि होत नाहीं. कारण तुझे मतीं सप्तपदार्थ नित्य आहेत तसें येथें संभवत नाहीं. द्वितीय पक्षीं मन व गुण नित्य म्हणतोस तर तें फारच अनिष्ट होय. कारण हा समवाय संबंध केव्हांही नष्ट नाहीं असें ह्मणावें लागेल. तसें ह्मटलें तर अनिर्मोक्ष प्रसंग आला; आणि नित्य संबंध मानिला तर पदार्थ पृथक् आहेत याची अनुपपत्ति झाली. अत्यंत पृथक् मानले तर संबंध संभवत नाहीं.

शंका—ज्ञानेच्छादि गुण हे उत्पन्न होतात व त्यांचा नाश होतो. त्या गुणानीं युक्त आत्मा गुणवान् नित्य आहे ह्मणशील तर गुणांच्या संबंधानें गुणवान् होणारा आत्मा आहे. गुण अनित्य मग गुणवान् नित्य कसा होईल? होणें नाहीं. आणि ज्यास ज्ञानेच्छादि गुण आहेत त्यास शरीर आहेच. त्याप्रमाणें इच्छादिगुणवान् आत्मा झाल्यास त्यास सावयवत्व, विकारित्व, शरीरित्व इत्यादि दोष येतात. तेव्हां आत्ममनःसंयोगें करून ज्ञानादि गुण येतात आणि आत्मा त्यांस आश्रय ह्मणून गुणवान् आहे असें जें नैयायिक ह्मणतात तें संभवत नाहीं. आणि सुषुप्तिकालीं मन पुरीतति नाडींत जातें तेथें आत्मा नाहीं कीं काय? जर सर्व शरीरास व्यापून आहे तर ती नाडीच पृथक् राहिली कशी? आणि तेथून त्यास जागृत केलें कोणीं? अदृष्टानें ह्मणावें तर अदृष्ट जड; तें कसें करील. आणि आत्ममनःसंयोगात्मक अदृष्ट किंवा तद्वियोगात्मक? संयोगात्मक अदृष्ट ह्मटलें तर सुषुप्तिकालीं अदृष्टक्षय होतो ह्मणावें लागेल. तसें ह्मटलें तर तें जागृतीला कारण कसें होईल? वियोगात्मक अदृष्ट म्हटलें तर ते आत्ममनःसंयोगरूप जागृतीला कारण होत नाहीं. तेव्हां अदृष्ट एक कल्पून, संयोग, समवाय कल्पून आत्मा ह्मणजे अहं याचे ठायीं ज्ञानादि गुण मानितात. तेव्हां जडत्वादि दोष येतात. एवंच नैयायिकमताचें खंडन दर्शवून चतुर्थ श्लोक संपवून पंचम श्लोकास आरंभ करतों.

या श्लोकांत अहं म्हणजे काय, विज्ञानरूप बुद्धि ह्मणजे काय, मन ह्मणजे काय,

जिव्हाघ्राणश्रुतिदृशिगिरो यत्प्रभाऽनुप्रभाताः
सोऽहंसर्वांतरसुखमयश्चित्तनुः सत्स्वरूपः ॥ ९ ॥

---

वायुरूप प्राणाचें स्वरूप काय, इंद्रियाचें स्वरूप काय, आणि आत्म्याचें स्वरूप काय अशा साहा पदार्थांचें ज्ञान व्हावें म्हणून विचारें करून श्लोकार्थ सविस्तर प्रतिपादन करण्यास आरंभ करतों.

सच्चिदानंद स्वरूप आत्म्याचे ठायीं रज्जुसर्पवत् स्फुरण झालें तें आत्मप्रतिबिंबसहित झालें लहरीबुद्बुदादिकांच्या स्फुरणाचे ठायीं उदकाचें प्रतिबिंब आहे त्याप्रमाणें अस्तित्व, भातित्व हें आत्मलक्षण स्फुरणाचे ठायीं आहे त्याचें नांव प्रतिबिंब त्या प्रतिबिंबासहित स्फुरणास अहं असें नांव आहे. तें सर्वकाळ 'अहमस्मि' या अनुभवानेंच सिद्ध आहे; परंतु हें स्फुरण सामान्य आहे विशेष नाहीं त्या स्फुरणांत इदं ह्म० विशेष स्फुरण भानात्मक, क्रियात्मक आणि विषयात्मक अशा तीन प्रकारचें बीजांत जसा वृक्ष तसें आहे. त्या इदमांचा विचार असाः—भानात्मक इदमांत दोन भेद. एक आपलें भान 'मी आहें' असें जागृतिस्वप्नांस धरून दोन अवस्थांत प्रतीतीस येतें त्याचें नांव विज्ञान किंवा बुद्धि. दुसरें, देहाचे अंतर्गत इंद्रियद्वारा प्रतीतीवांचून वासनामय घटपटादिकांस धरून जें भान त्यास मन असें म्हणतात. स्वभान विज्ञान, आणि परभान मन हीं दोन वाहण्यास टेक ह्मणजे आश्रय जेथें पावतात त्यास इंद्रिय असी कल्पना केली आहे. त्यांत शब्दविषयाश्रय श्रोत्र, स्पर्शविषयाश्रय त्वक्, रूपविषयाश्रय चक्षु, रसविषयाश्रय रसना, आणि गंधविषयाश्रय घ्राण, हीं ज्ञानेंद्रियें पांच कल्पिलीं. तीं मुख्य होऊन शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध पंचविषयात्मक जगतास दृश्यत्वास आणितात. ती विषयात्मक इदंवृत्ति होय. सामान्यस्फुरणरूप अहमांत प्रतिबिंब प्रविष्ट असल्यानें तेथून विज्ञानरूप बुद्धींत आलें, तेथून मनांत आलें, तेथून श्रोत्रादिक इंद्रियांत आलें. तेव्हां त्या प्रतिबिंबास देवता असें नांव प्राप्त झालें. आतां या प्रतिबिंबांत उत्तरोउत्तर इतका भेद होतो. अहमांत सत्, चित्, व आनंद हे सर्व प्रतिबिंबित आहेत. विज्ञानांत ' मी आहें मी भासतों' असें सत् व चित् प्रतिबिंबित होतें, आनंद नाहीं. मनांत भातित्व एवढेंच प्रतिबिंब आहे. तसेंच इंद्रियांतही जाणावें.

शंका—येथें अहमादिकांचे स्वरूपविचारांत प्रतिबिंबविचार निरर्थक होय या शंकेवर उत्तर सांगतोंः—प्रतिबिंब नसेल तर या पदार्थांची सिद्धि नाहीं

अहमादि पदार्थांस स्वरूप येण्यास प्रतिबिंबाची अपेक्षा आहे म्हणून प्रतिबिंबविचार निरर्थक नाहीं. आतां क्रियात्मक इदमाचा विचार करतों. क्रियात्मक इदमांत दोन भेद. एक स्पंदनात्मक आणि दुसरें उद्भूतात्मक. स्पंदनांत दोन भेद. एक सहजस्पंद आणि दुसरा कृतिस्पंद. सहजस्पंद पंचप्राण आणि कृतिस्पंद वचन, आदान, गमन, विसर्ग, आनंद या पांच क्रियांस कारण कर्मेंद्रियपंचक. आतां उद्भूत ह्मणजे लोमकेशादि. यांस उद्भूत इदं असें ह्मणतात. या सर्व इदंवृत्तीच्या भेदांस मूळ सर्वाश्रय सामान्यस्फुरणरूप अहं आहे, तो तीन अवस्थांस धरून आहे.

**शंका**—क्रियात्मक स्फुरणांत प्रतिबिंब आहे किंवा नाहीं; या शंकेवर उत्तर ऐक. क्रियात्मक स्फुरणांत प्रतिबिंब आहे तें अस्ति एवढेंच आहे' चित् व आनंद नाहीं. या प्रमाणें साधारणतः अहमादिकांचीं स्वरूपें सांगून आतां श्लोकार्थ सांगतों:—ज्या सच्चिदानंदस्वरूप आत्म्याचे ठायीं सामान्यस्फुरण अहंकृति उदय पावली आहे; ज्याचे ठायीं विज्ञानस्वरूप बुद्धि उत्पन्न होते व नाश पावते; ज्यापासून मन उत्पन्न झालें आहे; ज्याच्या प्रेरणेनें प्राण वाहतात; जिव्हा ह्मणजे रसनेंद्रिय, घ्राणेंद्रिय, श्रोत्र, दृष्टि, वाणी इत्यादि इंद्रियें ज्याच्या प्रभेनें प्रकाशित होऊन आपआपल्या विषयांस प्रकाशितात. तो मी स्थावरजंगमांचा आंतर ह्मणजे त्या त्या पदार्थांस पदार्थत्व देऊन मध्यबिंदुरूप होऊन त्या त्या पदार्थांत राहणारा सच्चिदानंदस्वरूप अशा लक्षणांचा आहें.

**शंका**—ज्याचे ठायीं अहंकृति, विज्ञान, मन इत्यादि उत्पन्न होतात असें सांगितलें आणि ज्याच्या प्रेरणेनें प्राण वाहतात असें सांगितलें तेव्हां त्यास विकार आहे आणि तो असंगत्वादिस्वरूप नाहीं असें सिद्ध झालें अशी शंका झाल्यास उत्तर सांगतों. प्रथम ज्याचे ठायीं अहंकृति उदय पावली. मग अहंकृतियुक्त परमात्म्याचे ठायीं विज्ञान, मन, इंद्रियें उत्पन्न झालीं असें ह्मटलें पाहिजे; कारण विज्ञानमनइंद्रियादिकांस अहंस्वरूपत्व आहे, त्यावांचून त्यांचें स्वरूप नाहीं. आणि अहंयुक्त परमात्म्याचे प्रेरणेनें प्राण वांचतात असें ध्यावें. केवळ परमात्म्याचे ठायीं प्रेरणा नाहीं. ती असेल तर तो सक्रिय होईल म्हणून अहम् हाच प्राणास प्रेरक होय. तेव्हां विकार, संग इत्यादि दोष येत नाहींत.

**शंका**—प्रथमता आत्म्याचे ठायीं अहं उत्पन्न झालें मग अहमापासून इदमादि सर्व झालें हें असो; पण अहमास कारण परमात्मा तो सविकार आहे. तर असी शंका घेऊं नको, कारण अहं हा अवस्थात्रयांत राहणारा. अवस्थेबाहेर त्याची प्रतीति नाहीं. ताच सविकार आहे. परमात्मा सविकार नाहीं. तर निर्विकार आहे. सविकाराचा साक्षी मी सविकार होत नाहीं निर्विकार आहें.

योऽहंशब्दाधिकरणमयं मय्यसौ ब्रह्मणीशे
विष्णाविंद्राद्यमरनिचये दानवेषूरगेषु ॥
मर्त्येष्वेवं पशुखगगणे किंबहूक्त्या स एव ॥
ब्रह्माण्डानामपि च नियुते नास्ति कश्चिन् मदन्यः ॥ ६ ॥

---

शंका:—निर्विकाराचे ठायीं साविकार अहं याची उत्पत्ति कशी ह्मणशील तर असें न संभवण्यास दृष्ट स्थल नाहीं ह्मणतोस, किंवा युक्ति नाहीं ह्मणतोस? प्रथम पक्षीं दृष्ट स्थल नाहीं ह्मणतोस तर आकाशाचे ठायीं गंधर्वनगर किंवा सूर्यरश्मींचे ठायीं मृगजल आणि नानारंग किंवा रज्जूचे ठायीं सर्प हे सर्व दृष्ट आहेत; कारण आकाश, सूर्यरश्मि व रज्जु यांचे ठायीं गंधर्वनगर, मृगजल व नानारंग, आणि सर्प इत्यादि उत्पन्न होऊन नष्ट झाले तरी त्यांचें म्ह० आकाशादिकांचें स्वरूप बदलत नाहीं तेव्हां ते निर्विकार आहेत. तेथेंच सविकार गंधर्वनगरादिकांचा प्रतिभास होतो हें दृष्ट आहे त्या प्रमाणें निर्विकार आत्म्याचे ठायीं सविकार अहं उत्पन्न झालें. द्वितीय पक्षीं युक्ति नाहीं ह्मणशील तर दुधाचा परिणाम ह्मणजे विकार दही. तसें मानिल्यास दह्याचें दुग्ध होणें नाहीं तसें अहमास आत्मत्व होणें नाहीं; कारण दध्यवस्थेंत दुग्धत्व नष्ट होतें तसें अहमवस्थेंत आत्मत्व नष्ट होतें असा अनुभव नाहीं. ह्मणून आत्मा साविकार संभवत नाहीं. तर अहमादि अवस्था प्रतिभासित झाल्या तरी आत्मस्थिति पूर्वसिद्ध जशी आहे तशीच आहे. या पक्षास ‘ विवर्त’ असें ह्मणतात. या विवर्तपक्षयुक्तीनें आत्मा निर्विकार असतां सविकार अहं उत्पन्न होतो असे श्रुत्यादिकांनीं आणि पूर्वाचार्यांचे सिद्धांत आहेत. ॥ ५ ॥

पंचम श्लोकाचें व्याख्यान संपवून षष्ठ श्लोकाचें व्याख्यान आरंभण्याकरितां पूर्ववादी शंका करितो.

शंका:— एथपर्यंत देहात्मत्वादिवादांचें खंडन करून व अहमिदमादिकांचें स्वरूपदाखवून आत्मा निर्विकार, असंग, सच्चिदानंद इत्यादि विशेषणानीं युक्त असा सिद्ध केला. तेणें करून त्यास परोक्षत्व सिद्ध झालें. तो अपरोक्ष नाहीं अशी शंका झाल्यास तिचें उत्तर सांगतों. अहं एतद्रूप पूर्वोक्त सामान्य आणि विशेष स्फुरण तें शब्दरूप आहे. त्या स्फुरणास जो अधिकरण ह्मणजे आश्रय तो आत्मा होय. ह्मणजे अहं एतद्रूप स्फुरण जेथें होतें तो अहमुपलक्षित आपण आत्मा आहे. तो परोक्ष किंवा इतरस्थाश्रय नाहीं, तर अहमाश्रय अपरोक्ष आहे.

॥ आ शर्वादामशकमखिलाः प्राणिनः पुत्तिकावत् ॥
॥ सं चेष्टचंते वत निजनिजव्यापृतौ येन यत्र ॥

---

शंका—अहं या स्फुरणास आश्रय तो आत्मा कोठें आहे असें ह्मणशील तर मी आहें असा प्रत्यय तुला असतां कोठें आहे असें विचारणें विरुत्व होय असें सांगून स्छलनिर्देशानें सांगतात. माझे ठायीं जो अहं या शब्दस्फुरणास आश्रय आहे तोच ब्रह्मदेवाचे ठायीं आहे. तो आत्मा आपण होय. हाच न्याय सर्वत्र योजितात. अहंस्फुरणास आश्रय जसा ब्रह्मदेवाचे ठायीं तसाच ईश्वराचे ठायीं, विष्णूचे ठायीं, इंद्रादि देवसमूहाचे ठायीं, तसेंच दानवांचेठायीं, सर्पांचेठायीं मनुष्यांचेठायीं आणि याच प्रकारें पशुपक्षिसमूहाचेठायीं आहे. फार बोलून काय ? तोच चेतनाचे ठायीं अभानावरणान्वित अहमास आश्रय आपण आत्मा आहे, आणि अचेतनाचे ठायीं असदावरणानें युक्त अहमास आश्रय आत्मा आहे. तोच सहस्त्रावधि ब्रह्मांडांचे ठायीं अभान आणि असत्त्व या आवरणांनीं युक्त अहमास आश्रय आत्मा आहे तो मजहून अन्य नाहीं. तर नित्य अपरोक्ष आपणच आहें.

शंका—अभानावरण आणि असदावरण हें कशास ह्मणतां? या शंकेवर उत्तर ऐक. देहाचे अंतरीं अहं हें स्फुरण प्रत्यक्ष असतां तदुपलक्षित आत्मा अपरोक्ष असून त्याचें भान नाहीं त्यास अभानावरण असें ह्मणतों. तसेंच देहाच्या बाहेर ब्रह्मदेवादि शरीरांचे ठायीं अहमुपलक्षित आत्मा असतां त्याचें भान नाहीं त्यासही अभानावरण ह्मणतों; परंतु आपल्या देहाबाहेर आपण नाहीं अशा असत्प्रत्ययाला धरून ब्रह्मादिकांचे ठायीं स्फुरणारा अहं आहे ह्मणून याला असदावरणही म्हणतों. आणि जसें स्वप्नकालीं आपल्या देहाबाहेर मी नाहीं यांत जग इत्यादि भासतें तें एक स्फुरण आहे तद्वत् देहास धरून मी आहें, आणि बाहेर मी नाहीं यांत भासणारें चेतनाचेतन जग तें एका अहं एतद्रूप स्फुरणावांचून नाहीं म्हणून देहाबाहेर असत्प्रत्ययास म्हणजे मी नाहीं या प्रत्ययास धरून राहणारा जो अहं तदुपलक्षित आत्मस्वरूपाचा नास्तिप्रत्यय झाला आहे त्यास असदावरण म्हणतों. एवंच दोन आवरणें एक अहंस्फुरणानें युक्त आहेत इतकें यथार्थ कळतांच अहमाश्रय अपरोक्ष आपणच आत्मा आहें. आपल्यावांचून अन्य आत्मा नाहीं असें ज्ञान होतें म्हणजे आपलेपणा प्रगट होतो. तोच मी ऐसा सिद्धांत ६

शंका:—आपल्यासहित ब्रह्मादिपिपीलिकांत शरीरांचे ठायीं सच्चिदानंदस्वरूप आपण आहें इतकें सिद्ध केलें; परंतु सकल शरीरांचे व्यापार कशानें होतात,

॥ यच्चैतन्यं सकलजगतामात्मभूतं निरंशं ॥
॥ द्वंद्वातीतं विमलमचलं ब्रह्म सैषोऽहमास्मि ॥ ७ ॥
॥ सद्रूपोहं यदिह न कदाप्यास्मिता मे प्रलुप्ता ॥
॥ चिद्रूपोऽहं खलु मम यतो नास्फुरत्ता कदाचित् ॥

---

व कोठें होतात असें विचारशील तर श्रवण कर.

शिवास आरंभ करून मशकादि सर्व प्राण्यांचे शरीरादिक आपआपले व्यापारांचे ठायीं ज्या चैतन्याच्या योगें करून ज्या चैतन्याचे ठायीं चेष्टा पावतात. यास दृष्टांतः—कळसूत्राची बाहुली काष्ठाची करून ती एका खांबावर ठेविली असतां सूत्रानें खांबाचे ठायीं चेष्टा पावते तद्वत्. बाहुलीस चेष्टा होण्यास सूत्र साधन आणि खांब आश्रय हे जसे भिन्न आहेत तसें येथें दार्ष्टांतीं नाहीं. तर चैतन्यच साधन व चैतन्यच आश्रय आहे. हें एक आश्चर्य होय. येणें करून काय सिद्ध झालें तें सागतों. जें चैतन्य सकल जगताचें आत्मा होय. तें निरवयव, जीवेशादिद्वंद्वातीत होय. अविद्यारूप मल ज्यास नाहीं, आणि ज्या स्वरूपाला स्पंद नाहीं ह्मणून निश्चल जें ब्रम्ह तेंच मी आहें.

शंका—चैतन्य जीवेशादिद्वंद्वातीत आहे असें जें सांगितलें तें कसें ह्मणशील तर ऐक. पूर्व श्लोकांत अभानावरणान्वित अहं आणि तदाश्रय साक्षिरूप आत्मा तप्तलोहाप्रमाणें एकरूप भासतात तेव्हां ईश्वरशब्दें उच्चारित होतात. यासच वाच्यार्थ असें महावाक्यार्थवेत्ते बोलतात. अहं ईशस्थितींत आणि जीवस्थितींत एकच असतां अभानावरण आणि असदावरण हे दोन भेद होऊन दोन प्रकारांचें भासतें. त्यास कारण उभयाश्रय सच्चिदानंद साक्षिस्वरूप आत्मा ह्मणजे आपण आहे. आपलें भान असतां अभान होतें, एतादृश मूलाज्ञानरूप अविद्या ती सद्गुरुमुखें महावाक्याचें श्रवणमननादि केलें असतां ज्ञान उत्पन्न होऊन तत्काळ नष्ट होते. ती अविद्या नष्ट होण्याबरोबर अभानावरण आणि असदावरण नष्ट होतात. जसें स्वप्नांतून जागृत होतांच स्वप्नकल्पित जीव, ईश, जगत् इत्यादि भाव नष्ट होतात त्या प्रमाणें आपल्या स्वरूपाचें ज्ञान झालें असतां अविद्येसह अभानासदावरणान्वित जीवेशजगद्भाव नष्ट होतो. त्याकाळीं आत्मातिरिक्त कांहीं अन्य नाहीं असा असंदिग्ध बोध होतो. हाच महावाक्यांतील तात्पर्यार्थ आहे. ७ एथपर्यंत सात श्लोकें करून जें प्रतिपादन केलें त्याचें

आनंदोऽहं मम तु मयियत्प्रीतिभंगो न जातु ॥
ख्यातं सच्चित्सुखमयमहं ब्रह्म वेदांतवेद्यं ॥ ८ ॥

---

फलित सच्चिदानंदस्वरूप ब्रह्मच आपण आहें. हें सविस्तर प्रतिपादन करण्याकरितां अष्टम श्लोकास आरंभ करितात.

आपणास सद्रूपता कशी आहे हें सांगतों. कोणतेही कालीं अस्मिता ह्मणजे सत्यता लोप ह्मणजे नाश पावत नाहीं म्हणून मी सद्रूप आहें. येथें अस्मितापदानें दोन मतें आहेत. तीं अशीं:–विशेष स्फुरणात्मक अहं आणि इदं यांचे लयानें सामान्यस्फुरणरूप अहं सुषुप्तिकालीं प्रतीतीस येतें त्यास अस्मिता असें अन्य शास्त्रकारानीं वार्णिलें आहे, आणि तदधिष्ठान परमात्मा. त्याचा कालत्रयीं नाश नाहीं. असें सर्वाभावसाक्षी सद्रूप त्यास आस्मिता असें वेदांतवेत्ते बोलतात. या दोन मतांत ग्राह्य कोणतें? याचा असा विचार करावा. जों पर्यंत सामान्यस्फुरणात्मक अहं आहे तोंपर्यंत अस्मिता हा शब्द त्याजवर जरी आला तरी देहपातानंतर त्याची प्रतीति नाहीं म्हणजे विशेष स्फुरणाचें उत्थान, अभाव अशा दोन अवस्थांस आश्रय नाहीं तेव्हां ती अस्मिता विवर्त आहे. ती ग्राह्य नव्हे ज्यावर सामान्य व विशेष यांचा भावाभाव झाला तरी अस्तित्व जसें आहे तसेंच असतें, बदलत नाहीं. असें जें अधिष्ठान परमात्मतत्व आपण तें अस्मिता आहे ह्मणून मी सद्रूप आहें. आतां आपण चिद्रूप कसा आहें तें सांगतों. ज्याकारणास्तव माझी स्फुरत्ता ह्मणजे ज्ञप्तिस्वरूपता केव्हांही नष्ट होत नाहीं. या कारणास्तव निश्चयें करून मी चिद्रूप आहे. एथें 'स्फुरत्ता' या पदानें दोन मतें आहेत तीं अशीं सामान्य विशेष जे पुर्वोक्त अहं इदं यांस स्फुरत्ता ह्मणतात. तेंच आत्मत्व असें बौधादिकांचे मतीं आहे, आणि ज्ञेयाचें ह्मणजे घटादिकांचें भान नाहीं तसेंच ज्ञात्याचें ही भान नाहीं या दोन भानां वांचून जें केवल ज्ञान त्यास ज्ञप्ति असें वेदांतवेत्ते बोलतात. ती स्फुरत्ता मुख्य आहे. अहमिदमात्मक स्फुरत्ता नष्ट होते. आणि ज्ञप्ति नष्ट होत नाहीं या कारणास्तव ज्ञप्तिस्वरूप चिद्रूप मी आहें. आतां आपण आनंदस्वरूप कसा आहें तें दाखवितों. कोणतेही कालीं माझे ठायीं माझी जी प्रीति तिचा भंग ह्मणजे नाश होत नाहीं या कारणास्तव मी आनंदस्वरूप आहें. आनंदपदेंकरून दोन मतें आहेत तीं अशीं:–विषयासक्त झालेली इदंवृत्ति तो विषय प्राप्त झाला ह्मणजे तिची धाव जाऊन अहमाशीं स्थिर होते त्याकालीं सर्व प्राणी सुख अनुभवितात. यावरून तेव्हां

न स्वर्गो मे न खलु नरको नामृतं नापि मृत्यु-
र्विज्ञानं वा कचिदपि कदाचित्तनोः कः प्रबोधः ॥
नाहं पापी न हि च सुकृती न द्विजो नापि शूद्रो
योऽहं यादृग्विगतविकृतिस्तादृगेवास्मि नित्यं ९

---

ही आपली प्रीति आपले ठायींच होते ह्मणून मुख्य आनंदस्वरूप विषय नव्हे. तर इदंवृत्तिरूप प्रीति अहमावर सार्वकाल राहते, तीस परम प्रेम ह्मणतात.त्या परम प्रेमास ह्मणजे अहमास आस्पद ह्मणजे स्थान किंवा आश्रय आपण आहें. ह्मणून परमानंदस्वरूप आपण आहें. हें मुख्य आहे. एवंच सद्रूप, चिद्रूप आणि आनंदरूप आपण असें सिद्ध झालें. तेव्हां असें सिद्ध झालें कीं, प्रसिद्ध सच्चिदानंदरूप परब्रह्म असें जें वेदांतानें प्रतिपादित आणि वेदांतानें समजण्यास योग्य तें मीच आहें तेव्हां ब्रह्मच मी असा सिद्धांत. ॥ ८ ॥

शंका—तुम्हीं एतावत्पर्यंत प्रतिपादन करून त्याचें फल सिद्धांतानें सच्चिदानंदस्वरूप परब्रम्हच आपण आहें असें सिद्ध केलें. तेणें करून अन्य फल काय झालें? अथवा अनर्थनिवृत्ति आणि स्वरूपप्राप्तिरूप प्रयोजन; यांत स्वरूप प्राप्ति झाली; परंतु अनर्थनिवृत्तिरूप प्रयोजन सिद्ध नाहीं अशी शंका जाहल्यास तें प्रयोजन प्रगट करून दाखवितात.

शास्त्रांत विज्ञानमय उपाधीनें युक्त जीवास परलोकगमन सांगितलें आहे. परलोकीं स्थूल उत्पन्न होण्यास कारण मानिलें तर गर्भादिसंभव पाहिजे. तो तेथें होतो ह्मणावें तर इहलोकस्थित स्थूल नष्ट जाहल्यावर परलोकीं गमन केवळ विज्ञानमयाचें संभवत नाहीं. मग तो तेथें गेल्यावर गर्भादिकाचा संभव कसा मानावा. स्वतः शरीरें कर्मरूप मूळचींच आहेत असें ह्मणावें तर त्यांत जीवाचा प्रवेश होण्यापूर्वीं तीं नाश पावतील. जेव्हां विज्ञानमय स्थूल शरीरावांचून प्रतीतीस येत नाहीं तेव्हां परलोकीं त्याचें गमन होत नाहीं. मी तर सच्चिदानंदस्वरूप परब्रह्मच असल्यानें सर्व लोक माझे ठायीं अध्यस्त. तेथें माझें गमनागमन संभवत नाहीं. तेव्हां मला स्वर्गलोक नाहीं तसाच निश्चयें करून नरकलोकही नाहीं.

शंका—तर तुह्मांस मोक्ष असेल असें ह्मणशील तर मला मोक्षही नाहीं, कारण बंधसापेक्ष कल्पिलेला मोक्ष तो मला नाहीं. शंका—स्वर्ग नाहीं, मोक्ष नाहीं, तर वारंवार जन्ममरणरूप चक्रांत पडलेले तुह्मी असाल असें ह्मणशाल

तर तसेंही नाहीं, कारण जन्ममरण माझे एकदेशावर जो अहं त्याच्या एकदेशावर कल्पिलेली जी इदंरूप वृत्ति त्यावृत्तीनें लौकिक दृष्टया कल्पिलेलें आहे. अधिष्ठानभूत जो मी त्या मला जन्ममरणें स्पर्श करीत नाहींत. शंका—तर तुह्मी नाहींच असें ह्मणूं नको; कारण रज्जु असून त्याजवर नाहींही जी प्रतीति तिचेंच नाम अज्ञान, तसा मी विद्यमान असतां मी नाहीं अशा प्रतीतीचें अज्ञान मला स्पर्श करीत नाहीं; कारण मी अहंकार नव्हे ह्मणून अज्ञान मला नाहीं.

शंकाः—जर अज्ञानाचा स्पर्श तुह्मांस नाहीं तर तुह्मांस ज्ञान झालें आहे असें म्हणशील तर ज्ञानस्वरूप मी, मला ज्ञान व्हावयाचें तें काय? तेव्हां मला ज्ञानाचाही स्पर्श नाहीं. शंकाः—तुम्हांस स्वर्ग, नरक, मोक्ष, जन्ममरणें, अज्ञान, ज्ञान हें कांहींच नाहीं;तेव्हां तुह्मी मोठे पापी आहा असें ह्मणशील तर कल्पित पापानें मी पापी होत नाहीं, कारण पापकर्मानें माझें चित्त मला दुःख देत नाहीं यास्तव पापाचा मला स्पर्श नाहीं. तर तुम्ही पुण्यवान् आहा असें म्हणूं नको; कारण पुण्यकर्मानें मला सुख होत नाहीं यास्तव मी पुण्यवान् होत नाहीं. शंकाः—तुम्ही ब्राम्हण वर्णानें युक्त असून पापपुण्य स्पर्श करीत नाहीं हें कसें म्हणतां, आणि त्याचें फल स्वर्गनरकादि नाहीं कसें ह्मणतां असें ह्मणशील तर व्यवहारांत अमक्यानें अमुक नियमानें वर्तावें अशी आट कल्पून ब्राह्मण उत्तम वर्ण आहे असा कल्पिला. तो देहावर जरी मूढ पाहतात तथापि मी ब्राह्मण वर्ण होत नाहीं कारण तो कल्पित ह्मणून. तर तुह्मी नीच वर्ण शूद्र असाल तेव्हां तुह्मांस कोणताच आधिकार नाहीं ह्मणून मला स्वर्गादिक नाहींत ह्मणालां असें ह्मणूं नको. कोणत्याही कर्माचा अनाधिकारी असा नीच वर्ण शूद्र तो मी नाहीं. येणें करून क्षत्रियवैश्यादि सर्व जाति मला नाहींत असें सिद्ध झालें.

**शंका**—आपणांस स्वर्गादि नाहीं या ह्मणण्यांत काय सिद्ध केलें असें ह्मणशील तर ऐक. सांगितल्या प्रकारें करून स्वर्ग, नरक, मोक्ष, जन्म, मरण, अज्ञान,ज्ञान, पाप, पुण्य, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य, शूद्रादि जे सर्व विकार त्या विकारानीं रहित अशा प्रकाराचा मी नित्य सच्चिदानंद या शब्दालाही न स्पर्शतां जशाचा तसाच आहें येथें वाणीचा, मनाचा लाग नाहीं ॥ ९ ॥ शंकाः—तुह्मी स्वर्गनरकादि नाहींत ह्मणून प्रतिपादन केले ते तुह्मी कृतकार्य असल्यानें तुह्मांस नाहींत हें इष्टच आहे; परंतु ज्याला स्वस्वरूपाचें ज्ञान नाहीं असे जे अज्ञानी त्यांस ते आहेत ह्मणून शास्त्रांत प्रतिपादन केलें आहे तें मिथ्या कसें संभवेल? या शंकेवर उत्तर सांगण्याकरितां पुढील श्लोकार्धाची प्रवृत्ति आहे.

स्वज्ञातारं सुखयति कथं स्वर्गलोको वराको
यस्य प्राप्त्यै जगति निगमः कर्मकांडं विधत्ते ॥
स्वाभिज्ञं वा स्वसुखनिभृतं तोषयेत्केन नाको
व्यर्थचाहो भ्रमयति जनान्हंतवेदार्थवादः॥१०॥

---

टीका—कवडीच्या मोलाचा स्वर्ग लोक ह्मणजे इहलोकाचा विचार केला असतां अनित्यत्व, सातिशयत्व, विरसत्व, क्षयित्व इत्यादि दोषरूप हा जसा प्रतीतीस येतो तसा स्वर्गलोक दोषरूपच आहे अशा विचारानें पाहिलें असतां कवडीच्या मोलाचा स्वर्गलोक आहे असें समजतें. या प्रकाराचा स्वर्गलोक आपल्या रूपाप्रत न जाणणारे अशा मूढ जनांप्रत कसा सुखी करतो? न जाणों. ह्मणजे अगोदर लोकाचा विचार केला असतां सुखरूप नव्हे तर केवळ दुःखरूप आहे. अशा दुःखरूप स्वर्गलोकानें सुख होईल हें कसें संभवेल? दुसरें सुख ह्मणून अनुभविणारे जन ते आत्मरूपास न जाणणारे. ह्मणजे आपणाप्रत जे जाणत नाहींत त्यांस सुख होईल कसें? ह्मणून दोन्हीकडून असंभव दिसतो. असें असून तो स्वर्ग लोक सुखरूप आहे ह्मणून त्याच्या प्राप्तीकरितां जगाचे ठायीं मोठेपणानें वेदानें प्रतिपादित कर्मकांड पाहून तें प्रमाण मानून तीं तीं यज्ञादिक कर्में करितात! अज्ञान्यांस स्वर्गप्राप्ति आहे ह्मणून शंका केलीस तर येथें विचार कर कीं; अज्ञान्यांस प्राप्ति ती वास्तविक नाहीं, तर माता मुलास रोचनार्थ गुडादि दाखविते तद्वत् स्वर्गादि लोक रोचनार्थ वेदानें सांगितले आहेत. ते प्रमाण मानणें हें मूर्खत्व होय.

शंकाः—अज्ञान्यांस स्वर्ग लोक तुह्मीं सांगितल्याप्रमाणें न संभवो; परंतु आपल्या स्वरूपाप्रत जाणणारे असे जे ज्ञानी त्यांस स्वर्ग लोक सुखी करील अशी शंका घेऊं नको. जे आपल्या स्वरूपाप्रत जाणणारे त्यांप्रत स्वर्ग लोक कशानें ह्मणजे कोणत्या प्रकारानें सुखी करील? कारण ज्ञानी पुरुष स्वरूपसुखांनेंच परिपूर्ण आहेत. तद्‌दृष्ट्या अन्यत्र सुखच नाहीं ह्मणून ज्ञानी पुरुषांसही तो स्वर्ग सुखी करीत नाहीं.

शंकाः—तर स्वर्गप्रतिपादक वेदवाक्यें मिथ्या कीं काय? असें ह्मणूं नको. वेदाची प्रवृत्ति रोचनार्थ आहे. तेंच रोचन ग्रहण करून मूढ लोक भ्रमिष्ट जाहले आहेत. वेदाचा अर्थवादसमूह विनाकारण जनांप्रत भ्रमवितो. काय हो हें आश्चर्य!! तात्पर्य वेदाचा उद्देश स्वर्गादि लोकांकडे नसून स्वर्गादिकांचीं स्तुतिवाक्यें श्रवण करून मूढ लोक भ्रमिष्ट जाहले. तेव्हां हें आश्चर्य आहे. १०

कं चोपास्मि प्रवदत बुधाः को विभिन्नोऽस्ति मत्तो
मोमूवाहं यदि बत तदा पद्यते पिष्टपेषः॥
किं जानीयां क किमु शृणुयां कं च पश्ययेमत्धा ॥
किं जिघ्रेयं मदितरदहं किं स्वदेयं वदेयं ॥ ११ ॥

---

शंकाः—तुह्मीं यज्ञादि कर्मकांडाचा निषेध केला तो असो; परंतु तुह्मांस देवतेची उपासना अवश्य केली पाहिजे. या शंकेवर उत्तर सांगतात.

टीका—मीं कोणत्या देवतेची उपासना करावी हें ज्ञात्यानीं सांगावें. मदतरिक्ताची उपासना करावी किंवा माझीच मीं करावी. प्रथम पक्षीं मद्व्यतिरिक्त कोण आहे तर कोणी नाहीं; मग उपासना कोणाची करूं? द्वितीय पक्षीं माझी मींच उपासना करावी असें ह्मणावें तर उपासनेस विषय नाहीं. असें असतां कल्पून केली तर पिष्टपेषण झालें तें व्यर्थ होय. तेव्हां उपासना संभवत नाहीं.

शंकाः—तर ज्ञानसंपादन तुह्मीं केलें पाहिजे असें ह्मणशील तर काय जाणावें? ह्मणजे ज्ञानाला विषय कांहीं नाहीं. जें ज्ञानाला विषय होतें त्यास आत्मत्व नाहीं. वेदांतादिकाचें श्रवण करावें तर श्रवणास वेद्य शब्द आहे. मी अशब्द असल्यानें श्रवणाचा विषय नाहीं. वेदांतांत माझेंच वर्णन आहे तें शब्दरूप आहे. नेत्रानें साक्षात् पाहणें रूपाचें होतें. मी रूप नाहीं यास्तव काय पाहूं? घ्राणानें गंधाचें ग्रहण होतें. मी गंध नाहीं यास्तव घ्राणानें काय घेऊं? रसनेनें रसाचें आस्वादन होतें. मी रस नाहीं यास्तव कशाचा स्वाद घ्यावा? वाणीनें शब्दाचें उच्चारण होतें, मी वाणीचा विषय नाहीं.

शंकाः—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध व शब्दोच्चारण हे श्रोत्रादि इंद्रियांचे विषय आहेत तेच ग्रहण करा असें ह्मणशील तर शब्दादि विषय माझ्याहून अन्य कोठें आहेत? अन्य नाहींत. तर ते विषयही मत्स्वरूपच असल्यानें माझें मला ग्रहण नाहीं.

शंकाः—सर्वशास्त्रांत शब्दादि विषयांचा त्याग सांगितला आहे, आणि ते विषय आपल्याहून भिन्न सांगितले आहेत. तुह्मी विषय मींच आहें असें विरुद्ध कसें बोलतां? अशी शंका झाल्यास त्याचें उत्तर सांगतों. प्रथमतां शब्दादि विषय त्यागावेत ह्मणून सांगितलें तें भेददृष्टिमूलक सांगितलें. नंतर आत्मसत्ते अतिरिक्त विषयांस सत्ता नाहीं अशा अभेद दृष्टीनें विषय मत्स्वरूपाहून अन्य नाहींत असें सिद्धांतानें शास्त्रांतच सांगितलें आहे. तसेंच माझेंही सांगणें आहे, विरुद्ध

वर्ततां वै व्यवहृतिपथे प्राणचित्तेंद्रियाणि प्राक्संस्कारानुगुणमभितःस्वस्वकर्मण्यथायं ॥ देहः काश्यां पततु कुपदे वापि शंका न मे यत्कुड्ये काष्ठे दृषदि च पदं न्यस्तमुर्वीस्थमेव॥१२ ॥ नद्यः कुल्यास्तदनु लहरीबुद्बुदावर्तफेनाः

नाहीं. यास दृष्टांतः—पाठीशीं अन्नाची शिदोरी बांधलेली असतां जोंपर्यंत जातिभेद आहे तोंपर्यंत विटाळ, दोष आहे. जातीचें एकत्व झाल्यानंतर विटाळ, दोष नाहीं तद्वत् समजावें. ॥ ११ ॥

शंकाः—शब्दादि विषय आत्मस्वरूपच आहेत असें तुह्मीं सांगितलें तें विरुद्ध आहे. कां तर, तसें आहे तर इंद्रियादिकांचा व्यवहारच होणार नाहीं. या शंकेचें उत्तर सांगतात.

प्राण, चित्त, इंद्रियें हीं व्यवहारमार्गीचे ठायीं पूर्व संस्काराला अनुलक्षून चोहोंकडून आप आपल्या कर्मीं वर्तोत. येणेंकरून इंद्रियादिकांचा व्यवहार अहं एतद्रूप प्रेरणात्मक पूर्व संस्कारानें होतो. आत्मरूप आहेत या सांगण्यांत इंद्रियादिकांस आत्मसत्ता आहे; परंतु व्यवहार होण्यास संस्कार कारण असल्यानें त्यास प्रतिबंध होत नाहीं. शंकाः—व्यवहार होण्यास संस्कार कारण आहे तर त्या योगानें पुन्हां जन्ममरण होईल असें ह्मणशील तर ऐक. देह काशीचें ठायीं पडो अथवा कीकट देशीं चांडालगृहीं पडो; परंतु याची शंका मला येत नाहीं. व्यवहार होण्यास संस्कार कारण जरी असला तरी जन्ममरणाला तो कारण होत नाहीं; कारण संस्कार नष्ट झाल्या वांचून देहपातच होत नाहीं मग जन्म-मरण कसें होईल? शंकाः—काशीचे ठायीं देहपात झाला असतां मुक्त होतो आणि अन्यत्र देहपात पुनर्जन्ममरणांस कारण आहे असें 'कौषीतकी' उपनिषदाचे ठायीं सांगीतलें आहे. तुह्मांस उभयाविषयीं शंका नसल्यास उपनिषदुक्ताप्रमाणें होणें अवश्य आहेच अशी शंका घेऊं नको. काशींत देहपात मुक्तीस कारण ह्मटलें ते काशी या नांवाचें क्षेत्र किंवा ग्राम हें नव्हे; तर भुवनत्रय जेणें प्रकाशित होतें तें काशीशब्दार्थ आहे. तज्ज्ञानपूर्वक देहपात झाला असतां सर्वत्र काशीच असल्यानें कोठेंही देह पडो मग काशीक्षेत्रीं किंवा कीकट देशीं चांडालगृहीं पडो. त्याची शंका नाहीं. याविषयीं दृष्टांत श्रवणकर. भितीचे ठायीं अथवा काष्ठाचे ठायीं अथवा दगडाचे ठायीं पाऊल ठेविलें तरी पृथ्वीवरच ठेविलें पृथ्वीबाहेर ठेविलें नाहीं तद्वत् काशीपुण्यक्षेत्रांत अथवा कीकटादिपापस्थानांत देह पडला तरी परमात्मरूप काशींतच देह पडला. त्या बाहेर पडतच नाहीं. मग कोठे जरी देह पडला तरी मला शंका येत नाहीं॥१२॥ सांगीतलेला विषय स्पष्ट करण्याकरितां सांगतात.

गंगादिनद्या, पाट, त्यांला अनुलक्षून येणाऱ्या लहरी ह्मणजे लाटा, बुडबुडे, भोंवरे, फेस हे सर्व उदकराशि जो समुद्र त्याहून कधींही भेद पावत नाहींत; कारण ते उदकच यास्तव. मग गंगा, यमुना, कृष्णा, पाट, लाटा, बुडबुडे, भोंवरे फेस इत्यादि सर्व उदकावर विवर्त होत. त्यांत गंगा यमुना उत्तम; पाट इत्यादि अधम हें नाममात्र.

सर्वं चैतद्व्यभिचरति नो जातुचिद्वारिराशेः ॥
तद्वद्देहेंद्रियघटपटप्रत्ययव्यक्तरूपो
नान्यो मत्तः किल चिदुदधेरेष सर्वो विवर्तः॥१३॥
यच्छ्रोत्राभ्यां किम पिशृणुयां तन्महावाक्य
मेव ब्रूयांयत्तत्सदनुवचनंयच्चकुर्यांस धर्मः ॥

वस्कतः उदकावांचून त्यांत उत्तमाधमभाव मुळींच नाहीं. तर उदक जसें, तद्वत् देह, इंद्रियें,घट पट इत्यादिकांचे प्रत्यय स्पष्टरूप आहेत व भासतात ते चैतन्यसमुद्र जो मी त्या मजहून अन्य कांहीं नाहीं. तर हा सर्व विवर्त आहे. काशी उत्तम, कीकट अधम; ब्राह्मण उत्तम, शूद्र अधम इत्यादि भाव मुळीं मी जो चैतन्यसमुद्र यावांचून पृथक् नाहीं. तर चैतन्यसमुद्रच मी आहें.माझ्या वर हा सर्व मिथ्याभास वाचारंभण होय.वस्तुतः मी एक आहे.१३ या तेरा श्लोकें करून जें कथन केलें त्याची ह्म० परम प्राप्तीची सीमा सांगून करावयाचें तें केलें यां उपर कर्तव्य नाहीं.पावावयाचें पावलों या उपर पावणें नाहीं असी विद्यानंदाची परमसीमारूप जीवन्मुक्ति प्रकट करितात.मी श्रोत्रेंद्रियें करून कांहीं एक श्रवण करीन तें व्यवहारी असो अथवा भलते प्रकारचें असो तें महावाक्यश्रवणच होय.त्या वांचून माझे श्रोत्र श्रवणच करीत नाहींत. भलत्या ही शब्दापासून जीवेश्वरांचें ऐक्यबोधन जर होतें तर तें महावाक्यच म्हटलें पाहिजे. जें जें वाणींद्रियानें बोलेन तें तें ब्रह्मकथनच होय ह्मणजे वाच्य, वाचक, वचन अशी त्रिपुटी एक सत्तेवांचून प्रतिभासत नाहीं. तेव्हां ती एक सत्ता ब्रह्मच आहे.मी शरीरानें अथवा प्राणानें,मनानें जें जें करीन तो सध्धर्म ह्मणजे ब्रह्म एतल्लक्षण धर्मच होय. ह्मणजे सर्व क्रिया ब्रह्मरूपच आहे. दृष्टिमार्गाचेठायीं जें जें मी पाहीन तो ब्रह्मवस्तूचा साक्षात्कारच होय; कारण द्रष्टा, दृष्टि, दृश्य तीनिपणेंकरून एक ब्रह्मचैतन्यच आहे. त्यावांचून द्रष्टा इत्यादि त्रिपुटी नाहींच.अतएव दृष्टीनें रूप विषय पाहत नाहीं. तर तदधिष्ठान ब्रह्मच पाहातों. तस्मात् या जगताचेठायीं मला करावयाचें इत:पर कांहीं राहिलें नाहीं. तसेंच प्राप्त व्हावयाचें तें थोडेंही राहिलें नाहीं तर करावयाचें तें केलें आणि प्राप्तव्हावयाचें तें प्राप्त झालें.

शंका—कर्तव्य तें केलें प्राप्य प्राप्त झालें हा अभिमान होय. वस्तुतः या बोलण्याचा विषय आहे असें नाहीं असें ह्मणशील तर कोण नव्हे ह्मणतें? हें बोलणें कर्तव्य आहे, प्राप्य होणें आहे याच्या सापेक्ष आहे. आतां कर्तव्य नाहीं प्राप्त होणें राहिलें नाहीं तर सर्व झालें तें वस्कबोधाभिमानच आहे.

शंका हा अभिमान जर राहिला तर अनर्थ उत्पन्न करिल असें ह्मणशील तर देहादि मी असा अभिमान नष्ट होण्याबरोबर हा मी ब्रह्म आहे हा अभिमानही नष्ट होतो. तो राहत नाहीं. राहील तर अनर्थ उत्पन्न करील शंका अभिमान नष्ट होतो त-

यत्षश्येयंनतुदशिपथे वस्तुसाक्षात्कातिः
सानोमेकुसंजगतिनतथाप्राप्यमप्यास्तिकिंचित् ॥ १४ ॥
॥ अस्यां हि सर्व सिधांत त्रयोदश्यां तु येनराः ॥
॥ प्रस्छांन कुर्वते तेषां ब्रह्म सिद्धिः करेस्छिता ॥ १९ ॥

र व्यवहारलोप होईल अशी शंका घेउं नको. अभिमान नष्ट होतो ह्मणजे त्याचें स्वरूप नाहींसेंहोतें असें नाहीं तर तो असतां त्याजवर मिथ्यादर्शन होतें. मिथ्या झाल्यावर व्यवहारलोप न होतां अनर्थास कारण होतनाहीं शंका तर अनर्थास कारण कोण? या शंकेवर उत्तर ऐक. स्वस्वरूपाचा अविवेक हा अनर्थास कारण आहे तो तुझा गेला तेव्हां अनर्थ ईछिलेस तरी प्राप्त होणें नाहीं असा सित्धांत॥ १४ ॥

याप्रकारें करून सर्व सिद्धांत सांगुन ग्रंथ समाप्त केला. आतांपुढें याग्रंथाचे ठायीं सर्व मुमुक्षुची प्रवृत्ती व्हावी याकारितां मुहूर्ताचे रूपक करून सांगतात.

टीका या 'सिद्धांतत्रेयोदशीचेठायीं जे नर प्रस्छान करतात त्यांचें हस्ताचे ठायीं ब्रम्हसिद्धि स्थित आहे 'सित्धांतत्रयोदशी' मुहूर्त या लक्षणांचा आहे. दुष्ट विषय एतछ्रुण विषयोग जाणावा. १. जन्ममरण एतछ्लक्षण. मृत्युयोग जाणावा. २. विषयेछारूप काम हाच राहू ३ क्रोध हाच पापवार ४ देहादिकाचिअहंत्व हेंच वैधृति ५ स्त्रीपुत्रादिकांचे ठायीं ममत्व हाच व्यतिपात ६ कल्पना हेच कल्याणी ७ दुष्टवासना हेच योगिनी ८ ग्रंथिभेद हेच सर्वसित्धांत्रयोदशी ९. महावाक्योपदेश हाच सन्मुख चंद्र १० अनुहत एतछ्लक्षण दुंदुभिनाद ११ मी मुक्त अशी भावना होणें हा अमृतसिद्धी योग १२ मी सच्चिदानंद परब्रह्म आहें अशी वृत्तीची अज्ञाननिरसनार्थ व्याप्ती होणें एतछ्लक्षण घबाड १३ एवंच या 'सित्धांतत्रेयादशी. मुहूर्ताचे ठायीं जे नर प्रस्छान ह्मणजे पूर्वीचे आठ परित्याग करून अहं एतद्रूपजडांशपरित्यागानें लक्ष्यत्वें करून राहतात त्यांचे हस्ताचे ठायीं करतलअमलकवत् ब्रह्मसित्धी स्छित आहे.

शंका—तुह्मीं त्रयोदश लक्षणांचा मुहूर्त सांगीतला तो प्रमाण नाहीं. मूळ'श्लोककारानें सर्वसिद्धांतत्रयोदशी' हाच मुहूर्त असें सांगीतलें आहे अशी शंका जाहल्यास त्याचें उत्तर ऐक. केवल सर्व सित्धत्रयोदशीतिथीची अपेक्षा करून मूलश्लोककार बोलले नाहींत त्यांच्या सर्व श्लोकांकडे दृष्टी पोंचविली असतां कांहीं निषेध वाक्यें आणिकांहींविधिवाक्ये अशीं आहेत तेव्हां मूहुर्तातही निषेधात्मक आणि विधात्मक अशा उभय लक्षणांची अपेक्षा अर्थात् आली. यावरून अह्मी सांगीतलेप्रमाणें त्यांचें सांगणें आहे

शंका—तुह्मीं दुंदुभिनाद अनुहत सांगीतला तो योग शास्त्रांत प्रवेश करून सांगीतला. तर अष्टांगादिकनिरूपण कां केलें नाहीं असें ह्मणशील तर ऐक. ज्याकाली आत्मैकाकारवृत्ति होते किंवा श्रवण मननादिक वेळीं वृत्ति अंतर्मुख

इमां मोक्षाध्वनीनेभ्यो दैवज्ञकुलसत्कृतां
वामनोऽदात्प्रयाणार्थं सुसिद्धांतत्रयोदशीम् ॥१६॥
( इति श्री सिद्धांतत्रयोदशी समाप्ता. )

होतें त्याकालीं अनाहत नाद ऐकूं येतो या उद्देशानें अनाहत सांगीतला. अष्टांगादिक योगशास्त्र स्वीकारून सांगीतला नाहीं ह्मणून योगाचें निरूपण करण्याचें कारण काय? शंका—ग्रंथिभेद ह्मणजे काय असें ह्मणशील तर श्रवण कर. पूर्वीं सामान्य आणि विशेष स्फुरणात्मक अहं सांगीतला आहे आणि तदधिष्ठान सच्चिदानंद परमात्मा आपण असतां मूलाज्ञानानें ते विसरून अहंच मी या स्थितीचें नांव ग्रंथि. आतां तद्भेद ह्मणजे त्या अहमाचा आणि आपला रज्जुसर्पवत् पृथग्भाव होणें.

शंका—ग्रंथिभेद आणि आपण सच्चिदानंद एतल्लक्षण ज्ञान एकाकालींच होतें. किंवा भिन्नकालीं होतें अशी शंका करूनको. एकाकालींच होतें जसें रज्जूचें दर्शन, व सर्पाचा अभाव एककालींच त्याप्रमाणें ग्रंथिभेद आणि आत्मज्ञान एकाकालींच होतें. शंका—हस्तगत ब्रह्मसिद्ध आहे या बोलण्याचा अर्थ कांहीं दुसरा आहे किंवा खरोखर हस्तगत होतेंच अशी शंका झाल्यास त्याचें उत्तर ऐक. 'हस्तगत' म्हणजे याचा अर्थ अपरोक्षप्राप्त असा आहे. खरोखर हस्तगत ह्मटल्यास साकारत्वादि दोष येतील. तसें नाहीं. तर स्वप्रकाश अपरोक्ष प्राप्त होतें असें बोलण्याचें तात्पर्य आहे.॥ १६ ॥ मुमुक्षूनें याच मुहूर्तावर गमन करावें असें बोलून ग्रंथकर्ता आपलें नाम प्रगट करून ग्रंथ समाप्त करतो.

शंका—मोक्षमार्गाचे ठायीं गमन करणारे मुमुक्षू याकरणें ज्योतिर्वेत्ते यांच्या कुलानीं सत्कात ह्मणजे परमादरानें मानिलेली उत्तम प्रकाराची असीही सित्धांतत्रयोदशी. प्रयाणा करितां वामन देता झाला. तात्पर्य सित्धांतत्रयोदशीरूप मुहुर्त ज्योतिर्वेत्ते ह्मणजे ब्रह्मवेत्ते त्यानीं मान्य केलेला असा मोक्षमार्गाचे ठायीं गमन करणारे जे मुमुक्षू स्व कारणें प्रयाणार्थ वामनानें परम आदरानें काढून दिला. या मार्गानें जे गमन करतील ह्मणजे प्रथम श्लोकापासून सोळा श्लोकांपर्यंत या ग्रंथाचा जे सुक्ष्म त्धीनें बु विचार करतील त्यांस सच्चिदानंद परमात्मावशेष एतल्लक्षण मोक्ष होऊन सर्व अनर्थ त्यांचे दूर होतलि तर या ग्रंथाचें श्रवणमननादिक करून कृतकार्य व्हावें हेंच जन्माचें सार्थक. १६ शिवं शिवं ओव्या–सित्धांत त्रयोदशी नामक । टीका करूनिया चोख । सद्गुरु चरणीं निश्चयात्मक । आर्पिली आजी। १। श्रीसद्गुरुवरदान कृपेनें । ग्रंथ हा गेला समाप्ती कारणें। आजि धन्य जाहलोंतेणें। सर्व कृत्यांपासून। २। इतिश्री वामनख्य विदुषा प्रणीतायां सिध्धांतत्रयोदश्यां श्रीमद्राजयोगिवरेत्यादिबिरुदौघभ्राजमानविश्वनाथशिष्यबाळकृष्णेन विरचिता सित्धांतत्रयोदशीव्याख्या नाम टीका समाप्ता.

सच्चिदानंदः श्रीगुरुर्जयति।

# अथ लक्ष्मीलहरी.

पंडितराजजगन्नाथविरचिता.

॥ नमः श्रीदेव्यै ॥

॥ शिखरिणी. ॥

॥ समुन्मीलन्नीलांबुजनिकरनीराजितरुचां
॥ अपांगानां भंगैरमृतलहरीश्रेणिमसृणैः ॥
॥ ह्रिया हीनं दीनं भृशमुदरलीनं करुणया
॥ हरिश्यामा सा मामवतु जडसामाजिकमपि ॥ १ ॥
॥ समुन्मीलत्स्वंतःकरणकरुणोद्गारचतुरः
॥ करित्राणप्राणप्रणयिनि दृगंतस्तव मयि ॥
॥ यमासाद्योन्माद्यद्द्विपनियुतगंडस्थलगल-
॥ न्मदक्लिन्नद्वारो भवति सुखसारो नरपतिः ॥ २ ॥
॥ उरस्यस्य भ्रश्यत्कबरभरनिर्यत्सुमनसः
॥ पतंति स्वर्बालाः स्मरशरपराधीनमनसः ॥

---

माहाराष्ट्री समश्लोकी टीका.

स्रग्धरावृत्त.

॥ हेरंबा अवलंबुनी स्वहृदयीं अंबाहि ते शारदा ॥
॥ योगानंदपदारविंदयुगुला वंदूनियां सारदा ॥
॥ श्रीदेवीकरुणाकटाक्षलहरी स्पर्शावया अंतरीं ॥
॥ हे लक्ष्मीलहरी यथार्थ स्रग्धरा विवरीं मी देशभाषांतरीं[१] ॥ १ ॥
॥ फुल्लां नलिनांबुजांचे[२] निकर[३] करिती ते ज्यांचिया कांतिलागीं ॥
॥ हर्षें नीराजना, जे दृगमृतलहरीसिक्त[४] ऐशा अपांगीं[५] ॥
॥ लज्जाहीना सुदीना मज उदरदरीपूर्तिलीना[६] अशाचें ॥
॥ रामा[७] ते माधवाची अवन[८] करु कृपें मूढसाभाजिकाचें[९] ॥ १ ॥
॥ व्हायासी भक्तसंघीं[१०] त्वद्दयगत कृपोद्गार जो फार दक्ष ॥
॥ देवि श्रीविष्णुकांते मजवरि विलसो तो तुझा वक्रटाक्ष ॥
॥ ज्यातें पावूनि मत्ताद्विरदानियुत[११] कीं ज्याचिया द्वारभागीं ॥
॥ दानांबूनें[१२] करीतें चिखल नृप असा होय तो सौख्यभोगी[१३] ॥ २ ॥
॥ ज्यांच्या विस्रस्तवेणींतुनि[१४] गळति सुमें[१५] स्वर्गिच्या त्या मृगाक्षी[१६] ॥
॥ बालाही लोळताति स्मरशरविवशा त्याचिया भव्य वक्षीं ॥

---

१ महाराष्ट्रभाषेमध्यें. २ कमळ. ३ समूह. ४ दृष्टिरूप अमृताच्यालाटेनें सिंचिलेले. ५ कटाक्षानीं. ६ भरण्याविषयीं तत्पर. ७ भार्या. ८ रक्षण. ९ मूर्खांच्या समाजांत असणारा. १० समुदायावर. ११ लक्ष हत्ती. १२ मदोदकानें. १३ सुखभोक्ता. १४ विस्कटलेल्या. १५ फुलें. १६ हरिण नेत्रा.

॥ सुरास्तं गायंति स्फुरिततनु गंगाधरमुखा-
॥ स्तवायं दृक्पातो यदुपरि कृपार्द्रो विलसति ॥ ३ ॥
॥ समीपे गीतस्वरमधुरभंगी मृगदृशां
॥ विदूरे दानांधद्विरदकलभोद्दाममनिनदः ॥
॥ बहिर्द्वारे तेषां भवति हयहेषाकलकलो
॥ दृगेषा ते येषामुपरि कमले देवि सदया ॥ ४ ॥
अगण्यैरिंद्राद्यैरपि परमपुण्यैः परिचितो,
जगज्जन्मस्थाननलयरचनाशिल्पनिपुणः ॥
उदंचत्पीयूषांबुधिलहरिलीलामनुहर-
न्नपांगस्तेऽमंदं मम कलुषवृंदं दलयतु ॥ ५ ॥
नमन्मौलिश्रेणि–त्रिपुरपरिपंथिप्रतिलस–
त्कपर्दव्यावृत्तिस्फुरितफणिफूत्कारचकितः ॥
लसत्फुल्लांभोजप्रदिमहरिणः कोपि चरण–
श्चिरं चेतश्चारी भवतु मम वारित्रदुहितुः ॥ ६॥
प्रवालानां दीक्षागुरुरपि च लाक्षाऽरुणरुचां

---

॥ गाती रोमांचितांग स्मरहरमुख ते देवही त्यास माते ॥
॥ तुझा दृक्पात हा ज्यावरि हरिदयिते उल्हसे फुल्लचित्तें ॥ ३ ॥
॥ संगीताच्या स्वरांची सुमधुर रचना संमुखीं सुंदरींची ॥
॥ तैशीं दूरप्रदेशीं विपुल मदभरें गर्जितें तीं करींचीं ॥
॥ बाह्यद्वारीं तयांच्या हिंसुनि कलकला अश्ववृंदें करीती ॥
॥ त्वद्दृष्टि स्पष्ट आहे सकरुण कमले देवि ज्यांच्यावरी ती ॥ ४॥
॥ ज्याचा पुण्यें अगण्यें परिचय घडला देवि हर्यादिकांतें ॥
॥ जो लीलेनेंचि विश्वस्थितिलयरचनादक्ष हर्यादिकांतें ॥
॥ जो पीयूषांबुधीच्या अनुकरि लहरीचारुलीलागुणातें ॥
॥ माझ्या तो त्वत्कटाक्ष त्वरित परिहरो पातकांच्या गणांतें ॥ ५ ॥
॥ वंदी तो धूर्जटी जैं शिरिं सुटुनि जटाजूट तैं सर्पमाला ॥
॥ फूत्कारातें करुनी जवळचि वळतां जो मनीं फार भ्याला ॥
॥ उत्फुल्ला पंकजांचें मृदुपण हरितो जो नये बाणमार्गीं ॥
॥ अंभोधीच्या सुतेचा चरण सुचिर तो होउ मच्चित्तचारी ॥ ६ ॥
॥ जो कीं लालां प्रवालांप्रति गुरुचि गमे तेविं लाक्षाद्युतीला ॥

---

१७ कामबाणाच्या अधीन. १८ दृष्टिरत्न. १९ हे विष्णुपत्नि. २० गजांची.
१ समूह. २ इंद्रादिकांस. ३ हरि (विष्णु) याची आदिकांता (मुख्यस्त्री) तिचें संबोधन. ४ अमृत-समुद्र. ५ शिव. ६ बाणाच्या मार्गांत. ७ समुद्र. ८ माझ्या चित्तांत असणारा.

नियंत्री बंधूकद्युतिनिकरबंधूकातिपटुः ॥
नृणामंतर्ध्वांतं निबिडमपहर्तुं तव किल
प्रभातश्रीरेषा चरणरुचिवेषा विजयते ॥ ७ ॥
प्रभातप्रोन्मीलत्कमलवनसंचारसमये
शिखाः किंजल्कानां विदधति रुजं यत्र मृदुलाः॥
तदेतन् मातस्ते चरणमरुणश्लाघ्यकरुणं
कठोरा मद्वाणी कथमियमिदानीं प्रविशतु ॥८॥
स्मितज्योत्स्नामज्जद्द्विजमणिमयूखामृतझरै-
र्निषिंचन्तीं विश्वं तव विमलमूर्तिं स्मराति यः॥
अमन्दं स्यन्दन्ते वदनकमलादस्य कृतिनो
विविक्ता वै कल्पाः सततमविकल्पा नवगिरः॥९॥
शरौ मायाबीजौ हिमकरकलाक्रान्तशिरसौ
विधायोर्ध्वं बिन्दुं स्फुरितमिति बीजं जलधिजे॥
जपेद्यः स्वच्छंदं सहि पुनरमन्दं गजघटा-
मदभ्राम्यद्भृङ्गैर्मुखरयति वेश्मानि विदुषाम्॥१०॥

॥ जिंकी, बंधूकपुष्पच्छावि[11]गण जिणुनी बंधनीं ठेवि त्याला ॥
॥ नाशाया ही तमातें जनहृदयगता वाटतें लोकमाते ॥
॥ घेऊनी त्वत्पदश्रीवपु[12] विलसतसे सुप्रभातप्रभा[13] ते ॥ ७ ॥
॥ प्रातः कालीं प्रफुल्लीं नवकमलवनामाजिं संचारकालीं ॥
॥ किंजल्कांच्या[14] शिखाही रुतुनि दुखविती आणिती ज्यास लाली ॥
॥ ज्यातें हा तेंवि माते अरुणाहि करुणा प्रार्थितो दीन चित्तें ॥
॥ माझी वाणी कठोरा कशि अजि न रुते सांग त्या त्वत्पदातें ॥८॥
॥ हास्यज्योत्स्नानिमग्नद्विजमणिकिरणांच्या[15] सुधानिर्झरांहीं[16] ॥
॥ विश्वातें सिंचितें जी विमल तनु तुझी जो स्मरे नित्य पाहीं ॥
॥ त्या धन्याच्या मुखाब्जांतुनि बहु निघती भव्य त्या नव्य वाणी ॥
॥ ज्या स्वच्छा सद्विचारी विभ्रांतिविरहिता[17] सर्वदा सत्यखाणी ॥ ९ ॥
॥ मायाबीजा शरांच्या[18] प्रथम शिरिं कला इंदुची सिंधुजाते ॥
॥ बिंदूतें त्यावरीही धरुनि मग तुझें बीज[19] जें सिद्ध होतें ॥
॥ त्यातें माते जपे तो प्रचुरगजघटादानसंभ्रांतभृंगीं ॥
॥ विद्वानांच्या गृहातें मुखरित करितो तोषुनी अंतरंगीं ॥ १० ॥

९ पोवळीं. १० कांति. ११ दुपारीच्या फुलांची कांति. १२ तुझ्या चरणकांतीचें स्वरूप. १३ प्रातःकालाची शोभा. १४ केसर. १५ हास्य हेंच चंद्रकांति तिजमध्यें निमग्न ( बुडालेले ) जे दंत त्यांच्या. १६ अमृताचे पाझर. १७ विवादरहित. १८ श, आणि र, या वर्णांच्या. १९ मंत्राक्षर.

स्मरो नामं नामं त्रिजगदभिरामं तव पदं-
प्रपेदे सिद्धिं यां कथमिव नरस्तां कथ यतु ॥
यया पातं पातं पदकमलयोः पर्वतचरो
हरो हा रोषार्द्रामनुनयति शैलेंद्रतनयाम् ॥११॥
हरन्तो निःशंकं हिमकरकलानां रुचिरतां
किरन्तः स्वच्छंदं किरणमयपीयूषनिकरम् ॥
विलुपंतु प्रौढा हरित्दृदयहाराः प्रियतमा
ममांतः सन्तापं तव चरणशोणांबुजनखाः॥१२॥
मिषान्माणिक्यानां विगलितनिमेषं निमिषता-
ममंदं सौन्दर्यं तव चरणयोरंबुधिसुते ॥
पदालंकाराणां जयति कलनिक्वाणनपटु-
रुदंचन्नुद्दामः स्तुतिवचनलीलाकलकलः ॥१३॥
मणिज्योत्स्नाजालैर्निजतनुरुचां मांसलतया
जटालं ते जंघायुगुलमघभंगाय भवतु ॥
भ्रमन्ती यन्मध्ये दरदलितशोणांबुजरुचां
दृशां माला नीराजनमिव विधत्ते मुररिपोः॥१४॥

---

॥ कामें वंदूनि नेमें तव पदकमलें नित्य लोकाभिरामें[२०] ॥
॥ सिद्धी जी साधिली ती वद कशि मनुजें आणिजे वाणिसीमे ॥
॥ कीं जीनें कामहंता गिरिचर हरही लोळलोळूनी पायीं ॥
॥ सद्भावें सांत्वनातें करि गिरितनयेलागिं नाना उपायीं ॥ ११ ॥
॥ जीं चंद्राच्या कलांची हरिति रुचिरता, अल्प घेती न शंका ॥
॥ स्वच्छंदें वर्षताती निजकिरणसुधापूर जीं सर्व लोकां ॥
॥ अतः संताप माझा पदकमलनखें तीं तुझीं देवि [२३]प्रौढें ॥
॥ साकल्यें संहरोत प्रियतम हरि[२४]हृदंगससंगि पद्में ॥ १२ ॥
॥ माणिक्यांच्या मिषानें नकरुनि निमिषा पाहती जे रसाळ ॥
॥ सौन्दर्या त्वत्पदांच्या जलनिधितनये राहुनी सर्वकाळ ॥
॥ माते त्या नूपुरांचा रवें मधुर उठे प्रौढ उद्दाम भारी ॥
॥ तो लीलास्तोत्रवाणीक[२६]लकलकलसा भासतो कर्णचारी ॥ १३ ॥
॥ रत्नांच्या कांतिजालें निजतनुरुचि ते पुष्ट होतां स्वभावें ॥
॥ झालें तेजाळ जंघायुग[२८]ळ मज तुझें पापभंगासि व्हावें ॥
॥ कीं किंचित्फुल्लरक्तांबुजसमरुचि त्या विष्णुच्या लोचनांची ॥
॥ माला नीराजनाला भ्रमुनि करितसे ज्यामधें काय साची ॥१४॥

---

२० गजश्रमहाल्या [illegible] किरणारे. २१ मन्दास्यमान. २२ वयात सुंदर. २३ हे लक्षिप.
२४ [illegible] न्मसनी सुगुण. २५ आवाज २६ कोमल. २७ कर्णगत. २८ दृय. २९ [illegible] कांती.

हरद् गर्वं सर्वं करिप[ ]कराणां मृदुतया
भृशं भाभिर्दंभं कनकमयरंभाऽवनिरुहाम् ॥
लसज्जानुज्योत्स्नातरणिपरिणद्धं जलधिजे
तवोरुद्वंद्वं नः श्लथयतु भवोरुज्वरभयम् ॥ १५ ॥
कलक्काणां कांचीं मणिगणजटालामधिवहन्
वसानः कौसुंभं वसनमसनं कौस्तुभरुचां ॥
मुनिव्रातैः प्रातः श्रुतिवचनजातैरतिनुतं
नितंबस्ते बिंबं हसति नवमंबांबरमणेः ॥ १६ ॥
जगन् मिथ्याभूतं मम निगदतां वेदवचसां
अभिप्रायो नाद्यावधि त्वहृदयमध्याविशदयम् ॥
इदानीं विश्वेषां जनकमुदरं ते विमृशतो
विसंदेहं चेतोऽजनि गरुडकेतोः प्रियतमे ॥ १७ ॥
अनल्पैर्वादींद्रैरगणितमहायुक्तिनिवहै-
र्निरस्ता विस्तारं क्वचिदकलयन्ती तनुमपि ॥
असत्ख्यातिव्याख्याऽधिकचतुरिमाख्यातमहिमा
वलग्ने लग्नेयं सुगतमतसिद्धांतसरणिः ॥ १८ ॥

---

शिखरिणी.

हरी सर्वा गर्वा[2] गजवर[1]करांच्या मृदुपणें ॥
प्रभानीं दंभानें करि कनकरंभां[3]साहि उणें ॥
जिथें जानू भानूपरि अचळ ते अंबु[4]धिसुते ॥
हरो हें संसारज्वरभय तुझें अंकयुग[5] तें ॥ १५ ॥
धरी जो रत्नांची मधुररव कांची[6]हि सुरुचि ॥
कसी कासें रक्तांबराहि हरि जें कौस्तुभरुचि[8] ॥
मुनिव्रात[9] प्रातःसमायें निगमीं ज्या स्तवितसे ॥
नितंब[10] श्री तुझा उदित रविबिंबासहि हसे ॥ १६ ॥
जगा मिथ्या ऐसें श्रुति वदति तो आशय मला ॥
तयांचा जो साचा अझुनि मनिं नाहींच गमला ॥
मनीं येतां आतां *जनजनक तुझें जठर तें ॥
नसे शंका कीं तें हरिसौति[11] मृषा आज ठरतें ॥ १७ ॥
बहू वादींनीं जी अगणित महायुक्तिनिकरीं[12] ॥
निरस्ता, विस्तारा क्वचिताहि न पावे लवभरी ॥
जनीं शून्यख्याति[13] प्रकटुनि सुचातुर्य वदवी ॥
दिसे ती बुद्धांची कटिनिकट सिद्धांतपदवी[14] ॥ १८ ॥

---

१ शुंडा. २ गर्व. ३ सोनकेळी. ४ हे लक्ष्मि. ५ मांड्यांचें द्वय. ६ कंबरपट्टा. ७ तांबडें वस्त्र. ८ कांति. ९ समूह. १० कटिपश्चाद्भाग. ११ हे विष्णुपत्नि. १२ समुदायानीं. १३ जग शून्य आहे असें मत. १४ शून्यसिद्धांताचें रूप. * ज्यास जनक आहे तें सर्व नाशवंत होय अशा अभिप्रायानें

निदानं शृंगारप्रकरमकरन्दस्य कमले
महानेवालंबो हरिनयनरोलम्बवरयोः ॥
निधानं शोभानां निधनमनुतापस्य जगतो
जवेनाप्नोतिं मे दिशतु तव नाभीसरासिजम् ॥ १९ ॥
गभीरामुद्वेलां प्रथमरसकल्लोलमिलितां
विगाढुं ते नाभीविमलसरसीं गौर्मम मनाक् ॥
पदं यावन् न्यस्यत्यहह विनिमग्नैव सहसा
न हि क्षेमं सूते गुरुमहिमभूतेष्वविनयः ॥ २० ॥
कुचौ ते दुग्धांभोनिधिकुलशिखामंडनमणे
हरेते सौभाग्यं यदि सुरगिरेश्चित्रमिह किम् ॥
त्रिलोकीलावण्याहरणनवलीलानिपुणयो-
र्ययोर्दत्ते भूयः करमखिलनाथो मधुरिपुः ॥ २१ ॥
हरक्रोधत्रस्यन्मदननवदुर्गद्वयतुलां
दधत् कोकद्वंद्वद्युतिदमनदीक्षाधिगुरुताम् ॥
तवैतद्वक्षोजद्वितयमरविन्दाक्षमहिले
मम स्वान्तध्वान्तं किमपि च नितान्तं गमयतु ॥ २२ ॥

---

जैनी[1] जें शृंगारप्रचुर[2] मकरन्दासि कमले ॥
जया आलंबूनी हरिनयनरोलंब[3] रमले ॥
निधी जें शोभांचे बघुनि जनतादैन्य[4] पळतें ॥
अभीतीतें देवो त्वरित मज नाभीकमळ तें ॥ १९ ॥
असे जी कीं खोल प्रथमरसकल्लोलभरिता[5] ॥
विशाला त्वन्नाभी विमल सरसी तींत शिरतां ॥
धरी माझी दृष्टी पद तंव बुडालीच कृपणा ॥
न माते क्षेमातें करि गुरुजनीं उद्धतपणा ॥ २० ॥
त्रिलोकीलावण्या हरिति निज लीलेंकरुनि जे ॥
जयांतें देऊनी कर अहिवरी तो हरि निजे ॥
हरीती सौंदर्या स्तन सुरगिरीच्या जरिहि ते ॥
तुझे, नाहीं माते नवल तरि तें सिंधुदुहिते ॥ २१ ॥
भंगीतें[10] भिउनी अनंग[11] रचि त्या दुर्गद्वयाचे[12] परी ॥
जें, चक्रद्वय[13]कान्तिचक्रमथनीं दीक्षागुरुत्वा धरी ॥
तें स्वानंदमुकुंदसुंदरि तुझें पीनस्तनांचें द्वय ॥
माझ्या चित्तगता अबोधतिमिरा हें संहरो अद्वय ॥ २२ ॥

(शार्दूलविक्रीडित.)

---

१ उत्पत्तिस्थान. २ शृंगारमय. ३ भ्रमर. ४ जनसमूहाची दीनता. ५ शृंगाररसाच्या लाटा. ... ८–सुवर्णपर्वत. ९ समुद्रकन्ये. १० सविलास. ११ मदन. १२ दोन किल्ले

अनेकब्रह्माण्डस्थितिनियमलीलाविलसिते
दयापीयूषांभोनिधिसहजसंवासभवने ॥
विधाश्चित्तायामे हृदयकमले ते तु कमले
मनाङ्मन्निस्तारस्मृतिरपि च कोणे निवसतु ॥ २३ ॥
मृणालीनां लीलाः सहजलवणिम्ना लघयतां
चतुर्णां सौभाग्यं तव जननि दोष्णां वदतु कः ॥
लुठन्ति स्वच्छन्दं मरकतशिलामांसलरुचः
श्रुतीनां स्पर्धां ये दधत इव कण्ठे मधुरिपोः ॥ २४ ॥
अलभ्यं सौरभ्यं कविकुलनमस्या रुचिरता
तथापि त्वद्धस्ते निवसदरविन्दं विकसितं ॥
कलापे काव्यानां प्रकृतिकमनीयस्तुतिविधौ
गुणोत्कर्षाधानं प्रथितमुपमानं समजनि ॥ २५ ॥
अनल्पं जल्पन्तु प्रतिहतधियः पल्लवतुलां
रसज्ञामज्ञानां क इव कमले मंथरयतु ॥
त्रपंतु श्रीभिक्षावितरणवशींभूतजगतां
कराणां सौभाग्यं तव तुलयितुं तुंगरसनाः ॥ २६ ॥

---

ब्रह्मांडस्थितिपालनीं सुकुशला लीला जिथें राहती ॥
कारुण्यामृतसिंधुपूरहि सुखें जेथें सदा वाहती ॥
हे पद्मे[1] हरिचित्तहारिणि तया त्वत्पद्मकोशांतरीं[2] ॥
माझी उद्धरणस्मृती तुज असो कोणाहि कोणीं[3] तरी ॥ २३ ॥
जो पाचासारिसाच साच रुचिनें[4] त्या शौरिच्या[5] आदरें ॥
कंठीं लोळति जे यथेच्छ धरुनी स्पर्धा श्रुतींशीं खरें ॥
जे लीला हरिती सलील नलिनीनालांचिया[6] मार्दवें ॥
माते जी तुझिया भुजीं सुभगता कोणा अजी वर्णवे ॥ २४ ॥
ज्या सौरभ्य[7] अलभ्य वंद्य कविच्या वंशींच ती चारुता ॥
ऐसें ही कमले प्रफुल्ल कमल त्वत्पाणिशीं[8] राहतां ॥
काव्यालापकलापें[9] सुंदर अशा वस्तूंचिया संस्तवीं ॥
झालें तें उपमान सिद्ध सुगुणां दे जें तुज्या थोरवी ॥ २५ ॥
ते जल्पोत अनल्प[10] अल्पमति जे त्यां पल्लवीं तुल्यता ॥
अज्ञांच्या धरिजे जिभेस कवणें पद्मे उणें बोलतां ॥
श्रीभिक्षार्पणि[11] ज्यांस वश्य जग हें माते तुझे ते शये[12] ॥
सौभाग्यें[13] तुळितां रसज्ञरसना[14] लाजोत निःसंशय ॥ २६ ॥

---

१ हे लक्ष्मि. २ हृदयरूप कमलाच्या कळीमध्यें. ३ कोपऱ्यांत. ४ कांतीनें. ५ विष्णूच्या. ६ कम-
ळांच्या देठांच्या. ७ सुगंध. ८ हाताशीं. ९ काव्य,सुभाषित यांच्या समुदायांत. १० पुष्कळ. ११ स-
पत्तिरूप भिक्षेच्या दानानें. १२ हस्त. १३ सौंदर्य. सभाग्यपणा. १४ मार्मिक कवींच्या जिव्हा.

समाहारः श्रीणां विरचितविहारो हरिदृशां
परीहारो भक्तप्रभवभवसंतापसरणेः ॥
प्रहारः सर्वासामपि च विपदां विष्णुदयिते
ममोद्धारोपायं तव सपदि हारो विमृशतु ॥ २७ ॥
अलंकुर्वाणानां मणिगणघृणीनां लवणिमा
यदीयाभिर्भाभिर्भजति महिमानं लघुरपि ॥
सुपर्वश्रेणीनां जनितपरसौभाग्यविभवा
स्तवांगुल्यस्ता मे ददतु हरिवामेऽभिलषितम् ॥ २८ ॥
तपस्तेपे तीव्रं किमपि परितप्य प्रतिदिनं
तव ग्रीवालक्ष्मीलवपरिचयादाप्तविभवम् ॥
हरिः कंबुं चुंबत्यथ वहति पाणौ किमधिकं
वदाम स्तत्रायं प्रणयवशतोऽस्मै स्पृहयति ॥ २९ ॥
अभूदप्रत्यूहः सकलहरिदुल्लासनविधि-
र्विलीनो लोकानां स हि नयनतापोऽपि कमले ॥
तवास्मिन् पीयूषं किरति वदने रत्नवदने
कुतो हेतोश्चेतो विधुरयमुदेति स्म जलधेः ॥ ३० ॥

विष्णूच्या[1] नयनां विहारपद[2] जो संपत्समाहार जो ॥
भक्तांच्या भवसंभवां[3] बहुविधां तापां परीहार जो ॥
सर्वांही विपदांसि विष्णुदयिते संहार जो हा रतो ॥
उद्धारासि उपाय शीघ्र निरखो माझ्या तुझा हार तो ॥ २७ ॥
भूषासंन्मणिमुद्रिकासुकिरणीं[4] लावण्य[5] जें कीं असे ॥
त्याचें तेज ज्यांचिया द्युतिगणें थोडेंहि भारी दिसे ॥
सौभाग्यातिसया[6] सुपर्वनिवहा[7] ज्या देति आलिंगनें ॥
माझें इंगित[8] हेतु अंगुलि तुझ्या देवोत हर्यंगने ॥ २८ ॥
जो तीव्रेंहि तपें तपे बहु खपे घे ताप रात्रंदिनीं ॥
त्वत्कंठच्छविच्च्या लवा मिळवुनी जो धन्य झाला जनीं ॥
तो कंबू[9] हरि चुंबि बिंब[10] अधरीं वाहे करीं ही सुखें ॥
सांगूं फार कशास त्यांस[11] मग तो आसक्त हें मी मुखें ॥ २९ ॥
तो निर्विघ्न दिगंतरांहि सकळां उल्हास[12] झाला पहा ॥
लोकांच्या नयनांतिलाहि कमले तो लोपला ताप हा ॥
वर्षे त्वन्मुखचंद्र[13] रत्नवदने लोकीं सुधौघीं[14] महा ॥
सिंधूपासुनि कां उगानि उगवे बंधू तुझा सोम[15] हा ॥ ३० ॥

१ क्रीडास्थान. २ समुच्चय. ३ संसारांत झालेल्या. ४ अलंकारभूत दिव्य रत्नांच्या आंगठ्या. ५ कांति. ६ असंत सौंदर्य पक्षीं ऐश्वर्य. ७ उत्तम पर्वें ( कांडीं ) पक्षीं देव यांच्या समूहास. ८ मनोगत. ९ शंख. १० तोंडल्यासारख्या लाल ओंठावर. ११ लक्ष्मीच्या कंठास. १२ प्रकाश. १३ हे रम्यमुखि. १४ अमृताचा पूर. १५ चंद्र.

॥ मुखांभोजे मन्दस्मितमधुरकान्त्या विकसतां
॥ द्विजानां ते हीरावलिविहितनीराजनरुचाम् ॥
॥ इयं ज्योत्स्ना काऽपि स्रवदमृतसन्दोहसरसा
॥ ममोद्यद्दारिद्र्यज्वरतरुणतापं तिरयतु ॥ ३१ ॥
॥ कुलैः कस्तूरीणां भृशमनिशमाशस्यमपि च
॥ प्रभातप्रोन्मीलन्नलिनानिवहैरश्रुतवरम् ॥
॥ वहन्तः सौरभ्यं मृदुगतिविलासा मम शिवं
॥ तव श्वासा नासापुटविहितवासा विदधताम् ॥ ३२ ॥
॥ कपोले ते दोलायितललितलोलालकवृते
॥ विमुक्ता धम्मिल्लादभिलसति मुक्तावलिरियम् ॥
॥ स्वकीयानां बंदीकृतिमसहमानैरिव बलान्
॥ निबध्योर्ध्वं कृष्टा तिमिरनिकुरम्बैर्विधुकला ॥ ३३ ॥
॥ प्रसादो यस्यायं नमदमितगीर्वाणमुकुट–
॥ प्रसर्पज्ज्योत्स्नाभिश्चरणतलपीठार्चितविधिः ॥
॥ दृगंभोजं तत्ते गतिहसितमत्तेभगमने

---

### हरिणी.

॥ वदनकमलीं शोभा मंदस्मितद्युतिनें जयां ॥
॥ करिति रुचितें हीरालीही निराजन ज्यांचिया ॥
॥ विगलितसुधा त्वद्दंतांची प्रभा सरसा अहा ॥
॥ शमवु कमले मद्दारिद्र्यज्वरोद्भव ताप हा ॥ ३१ ॥
॥ बहुतपरि जो कस्तूरींच्या प्रशंस्य सदा कुलीं ॥
॥ विकच कमलीं प्रातःकालीं कधीं नाचि ऐकिली ॥
॥ अशि सुरभिता ज्यासी खासी गतीहि सुकोमला ॥
॥ तव पवन ते नासावासी करोत शिवा मला ॥ ३२ ॥
॥ बहुत विलसे दोलीलोलालकान्वित सत्कटीं ॥
॥ निकट कबरीमुक्ता मुक्तावली तुझि उत्कटा ॥
॥ जणुं निजजनीं बांदित्वातें नसाहुनि कोपला ॥
॥ तिमिरगण ही बांधी ओढी वरी विधुची कला ॥ ३३ ॥

### मन्दाक्रान्ता.

॥ ज्याच्या हास्यें नतसुरशिरोमौलिरत्नप्रभानीं ॥
॥ होते माते पदतललसत्पीठपूजा विधानीं ॥
॥ सांगें मत्तद्विपगति तुझ्या त्या सुदृग्वारिजासी ॥

---

१. हास्यकांतीनें. २. कांतीस. ३. हिऱ्यांच्या पंक्ति. ४. प्रशंसनीय. ५. विकसित. ६. सुगंधिता. ७. श्वासवायु. ८. कल्याण. ९ झोंपाळ्याप्रमाणें चपळ अशा केशांनीं. १० सुंदर गंडस्थळ. ११ केशपाशांतून सुटलेली. १२ मोत्यांची लड. १३ विकासानें. १४ मुकुट. १५ गज. १६ नेत्रकमळास.

॥ वने लीनैर्दीनैः कथय कथमीयादिह तुलाम् ॥ ३४ ॥
॥ दुरापा दुर्वृत्तैर्दुरितदमने दारुणभरा
॥ दयार्द्रा दीनानामुपरि दलदिन्दीवरनिभा ॥
॥ दहन्ती दारिद्र्यद्रुमकुलमुदारद्रविणदा
॥ त्वदीया दृष्टिर्मे जननि दुरदृष्टं दलयतु ॥ ३५ ॥
॥ तव श्रोत्रे फुल्लोत्पलसकलसौभाग्यजयिनी
॥ सदैव श्रीनारायणगुणगणौघप्रणयिनी ॥
॥ रवैर्दीनालीनामनिशमवधानातिशयिनी
॥ ममाप्येतां वाचं जलधितनये गोचरयताम् ॥ ३६ ॥
॥ प्रभाजालैः प्राभातिकदिनकराभापनयनं
॥ तवेदं खेदं मे विघटयतु ताटंकयुगुलम् ॥
॥ महिम्ना यस्यायं प्रलयसमयेऽपि क्रतुभुजां
॥ जगत् पायं पायं स्वपिति निरपायं तव पतिः ॥ ३७ ॥
॥ निवासो मुक्तानां निबिडतरनीलांबुदनिभः
॥ तवायं धम्मिल्लो विमलयतु मल्लोचनयुगम् ॥
॥ भृशं यस्मिन् कालागुरुबहुलसौरभ्यनिवहैः

---

॥ व्हावी केवीं सुमुखि तुलना वारिलीनां[२७]बुजांशीं ॥ ३४ ॥
॥ उग्रा[१]वेशा दुरितदमनीं दु[२]र्जनाशक्यलाभा ॥
॥ जी कीं दीनांवरि सकरुणा फु[३]ल्लनीलोत्पलाभा ॥
॥ जाळी दैन्यद्रुमवन दये दे बहु द्रव्यठेवा ॥
॥ ती त्वद्दृष्टी जननि निरसो माझिया दुष्ट दैवा ॥ ३२ ॥
॥ नीला[४]ब्जांची आजि सुभगता जिंकिती जे अ[५]लोल ॥
॥ श्रीमन्नारायणगुणगणा[६]कर्णनीं फार लोलें ॥
॥ दीनालींच्या नि[७]नादिं हि ज्यां सावधानत्व पूर्ण ॥
॥ ते मद्वाणीप्रतिहि कमले देवि ऐकोत कर्ण ॥ ३६ ॥
॥ तेजें कीं जें परिहरि निजें बालसूर्यप्रभेला ॥
॥ तें तांटकद्वय विघडवो माझिया खेदजाला ॥
॥ यत्सामर्थ्यें प्रलयसमयीं सर्वदेवास्तमानीं ॥
॥ निःशंकत्वें तव पति निजे विश्व हें पीपिऊनी ॥ ३७ ॥
॥ जो मुक्तांचें निलय साचे ज्या नीलि मेघाचि ऐसी ॥
॥ तो हा तुझा कच[११]भर करो पूत मल्लोचनांसी ॥
॥ जेथें कृष्णागरुपरिमळीं ते अ[१२]ळी लुब्ध होती ॥

---

२७ पाण्यांत लपलेल्या कमळांशीं. १ जिचा आवेश उग्र आहे ती. २ दुष्टलोकांस दुर्लभ. ३ निळ्या कमळासारखी. ४ कमळांची. ५ स्थिर. ६ श्रवणाविषयीं. ७ उत्सुक. ८ दीनाची ओळ किंवा दीन असे भ्रमर. ९ तानवेडे. १० मोत्यांचें. ११ केशपाश. १२ भुंगे.

॥ पतन्ति श्रीभिक्षार्थिनइव मदान्धा मधुलिहः॥ ३८ ॥
॥ विलग्नौ ते पार्श्वद्वयपरिसरे मत्तकरिणौ ॥
॥ करोत्क्षीतैरञ्चन्मणिकलशमुग्धास्यगलितैः
॥ निषिञ्चन्तौ मुक्तामणिगणजयैस्त्वां जलकणै–
॥ र्नमस्यामो दामोदरगृहिणि दारिद्र्यदलिताः ॥ ३९ ॥
॥ अये मातर्लक्ष्मि त्वदरुणपदांभोजनिकटे ॥
॥ लुठन्तं बालं मामविरलगलद्बाष्पजटिलम् ॥
॥ सुधासेकस्निग्धैरतिममृणमुग्धैः करतलैः ॥
॥ स्पृशन्ती मारोदीरिति वद समाश्वासयसि कदा ॥ ४० ॥
॥ रमे पद्मे लक्ष्मि प्रणतजनकल्पद्रुमलते ॥
॥ सुधांभोधेः पुत्रि त्रिदशनिकरोपास्तचरणे ॥
॥ परे नित्ये मातर्गुणमयि परब्रह्ममहिले ॥
॥ जगन्नाथस्याकर्णय मृदुलवर्णावलिमिमाम् ॥ ४१ ॥

---

॥ कीं भिक्षार्थी जन जणुं मदें अंध जे लोटताती ॥ ३८ ॥

शार्दूलविक्रीडित.

॥ आधीं सन्मणिकुंभरम्य वदनांतूनी गळूनी जळें ॥
॥ शुंडानीं धरि।।ं वरी हरिति जे मुक्ताफळांच्या किळे ॥
॥ ऐशा अंबुकणीं सुलग्न असुनी पार्श्वी तुला सिंचिती ॥
॥ वंदूं दीन मुकुन्दसुंदरि तयां मत्तां गजेंद्रांप्रती ॥ ३९ ॥

स्रग्धरा.

॥ हे लक्ष्मी लोकमाते त्वदरुणचरणांभोरुहांचे समीप ॥
॥ लोळे हा बाळ डोळे घळ घळ गळती अश्रुनीं जेविं कूप ॥
॥ पीयूषासेकसांद्रीं सरसकरतलीं गात्र हें दुःखशील ॥
॥ स्पर्शोनी गा न वत्सा रुदन करिं असें सांग कै सांत्विशील । ४० ।

शिखरिणी.

॥ रमे पद्मे लक्ष्मी प्रणतजनकल्पद्रुमलते ॥
॥ सुरांच्या वृंदांनीं विनुतचरणे सिंधुदुहिते ॥
॥ परे नित्ये माते गुणवति परब्रह्मदयिते ॥
॥ जगन्नाथाची हे परिस मृदु वर्णावलिहि ते॥४१॥

---

१ मलाच्या तुषारांनीं. २ आरक्त चरण कमलांच्या. ३ अमृतसेचनानें स्निग्ध अशा. ४ जिचे चरण स्तविले आहेत ती. ५ अक्षरपंक्ति.

अनुष्टुप्.

॥ इमांहि लक्ष्मीलहरीं जगन्नाथेन निर्मिताम् ॥
॥ यः पठेत् तस्य सर्वत्र जायंते जयसंपदः ॥ ४२ ॥

इति श्रीमज्जगन्नाथ पंडितराजविरचिता लक्ष्मीलहरी समाप्ता ॥

आर्या.

॥ रसिकजगन्नाथकृता लक्ष्मीलहरी हरिप्रियास्तव[1] हा ॥
॥ पढतां जय संपत्तिहि होय सदा त्यास, गाचि यास्तव हा ॥४२॥

स्रग्धरा.

॥ रंगा शुद्धांतरंगा जननि जनकही तोंवि ज्या एकनाथ ॥
॥ श्रीयोगानंदनाथप्रवरयतिकृपाछत्रयोगें सनाथ[2] ॥
॥ यद्वंशा उत्तरेश[3]प्रभुपदनिकटीं वास त्या क्षेम गांवीं ॥
॥ तेणें ही स्पष्ट लक्ष्मीलहरि विवरिली दे सदा क्षेम गावी ॥४३॥

वसंततिलका.

॥ येणें विकाशहि घडो रसिकानना[4]नांचा ॥
॥ तैसा विनाश सकळां अघकानना[5]नांचा ॥
॥ संतोष ही त्रिपुरसुंदरि[6]च्या मनाचा ॥
॥ होवो असा त्वदयि आशय वामनाचा

शालिनी.

॥ लाहूनीया पंडिताच्या कृतीतें ॥
॥ व्हाया लोकां लभ्य हो प्राकृतीं ते ॥
॥ तुल्यश्लोकी निर्मुनी आजि टीका ॥
॥ पुण्यश्लोकीं अर्पिली, हे विलोका ॥ ४६ ॥

इति श्रीमद्योगानंदपदारविन्दमिलिन्दायमानवामनरायविरचिता लक्ष्मीलहरीटीका समश्लोकी समाप्ता. । श्रीरस्तु ।

१ लक्ष्मीची स्तुति. २ नाथवान्, धन्य. ३ उत्तरेश्वर नांवानें शिवलिंग. ४ रसिकांच्या मुखांचा. ५ पातकवनांचा. ६ श्रीदेवीच्या.



॥ श्री ॥

अध्यात्म रामायणासंबंधिनी

# रामगीता.

श्रीमत्परमहंस-परिव्राजक-श्रीयोगानन्द
-यतींद्र-विरचित-महाराष्ट्र-
भाषा-व्याख्यान-सहिता.

हें

पुस्तक

वामन एकनाथ शास्त्री केमकर.

यांणीं.

मुंबई

" इंदुप्रकाश " छापखान्यांत छापून

प्रसिद्ध केली.

मिति चैत्र शुद्ध १ सोमवार शके १८०८

व्यय संवत्सर.

# प्रस्तावना-

## रामगीता.

शिरोलेखांत निर्दिष्ट केलेली गीता श्रीवेदव्यासप्रणीता **अध्यात्मरामायणाच्या** उत्तरकांडांत आहे. **भगवद्गीता**, **शिवगीता**, **गणेशगीता**, इत्यादि गीतांपेक्षां या गीतेचा अनेक कारणानीं विशेष दृष्टीस पडतो. इतर गीतांपेक्षां प्रस्तुत गीतेचा पहिला विशेष संख्येच्या संबंधाचा होय. तो असा कीं, **भगवद्गीता** ही अठरा अध्याय असून तिची श्लोकसंख्या सातशें आहे. याचप्रमाणें **शिवगीता** ही सोळा अध्याय असून संख्यच्या मानानें तितकीच आहे. **गणेशगीता** ही संख्येनें तितकीच असून अकरा अध्यायांची आहे, आणि प्रस्तुत **गीता** (रामगीता) एकाध्यायात्मक असून इची श्लोकसंख्या सारी बासष्ट आहे. एवंच संख्येचें अल्पत्व हा एक इजमध्यें मुख्य विशेष आहे.

आतां अल्प ग्रंथांत विषयाचा संकोच व क्लिष्टत्व इत्यादिकाची भीति असते; परंतु प्रस्तुत गीतेंत तसा प्रकार नाहीं. वेदांत शास्त्रातील मुख्यत्वें प्रतिपादनीय विषय साकल्यानें व सुबोध रीतीनें इजमध्यें वर्णिले आहेत. आतां दुसरा विशेष हा कीं, **भगवद्गीता** ज्याच्या निमित्तानें प्रवृत्त झाली, तो अधिकारी अर्जुन केवळ मुमुक्षुच्या रीतीनें श्रीकृष्णास शरण गेला नसून स्वजनवत्सलत्वानें युद्धपराङ्मुख झाला असतां त्याची युद्धाविषयीं प्रवृत्ति व्हावी या उद्देशानें श्रीकृष्णानें ती त्यास उपदेशिली आहे. आणि हिचा उपदेश—एकांतीं मुमुक्षुबुद्धीनें शरण आलेल्या लक्ष्मणास श्रीरामचंद्रानें केला आहे. तसेंच वृत्तवैचित्र्याच्या संबंधानें ही इतर गीतांहून इचें वैलक्षण्य आहे. इतर गीता प्रायः अनुष्टुप् वृत्तांत असतात, आणि इजमध्यें वंशस्थ, वसंततिलका आदिकरून अनेक वृत्तें आहेत. इजमध्यें विषयरचना जी आहे ती उगीच भरतीची नसून निवडक व आवश्यक असे सर्व विषय हींत आले आहेत. ते असेः—कर्म, भक्ति आणि ज्ञान या तीन योगांचें अधिकारपरत्वें विधान करून ज्ञानयोगांत कर्माचें खंडन फार मजेदार व प्रौढतेनें प्रतिपादिलें आहे. सर्व उपनिषदांत सारभूत जें **तत्त्वमसि** महावाक्य त्याच्या अर्थाचें विवेचन इजमध्यें फार प्रांजल व उत्तम रीतीनें केलें आहे; व त्या संबंधें लक्षणांचा विचार सांगून मंदाधिकारी जनांस प्रणवोपासना अनायाससाध्य अशी सांगितली आहे. प्रस्तुत गीतेप्रमाणें वाक्यार्थविचार तर कोणत्याही गीतेंत आढळत नाहीं. यावरील कारणांनीं **रामगीता** इतर गीतांहून विशिष्ट आहे असें सहज लक्षांत येणार आहे. असो.

आतां प्रस्तुत गीता प्रतिपादित सारभूत ब्रह्मविद्येचा प्राकृत जनांसही लाभ व्हावा म्हणून ज्या परम दयाळु यतिंद्रानीं तिजवर महाराष्ट्र भाषेंत ओंविबद्ध व्याख्या लिहिली त्यांजविषयींची माहिती संक्षेपतः वाचकांस करून देऊन ही प्रस्तावना पूर्ण करितों.

प्रस्तुत व्याख्याकार हे श्रीगोदावरी तीरीं **सोनपेठ** या गांवीं राहणारे अश्वलायन शाखेंतील ब्राह्मण होत. यांनीं पूर्व वयांत दशग्रंथसहित वेदाचें अध्ययन करून श्रौतस्मार्त याज्ञिकीचेंही अध्ययन केलें होतें. नंतर ज्योतिष, व्याकरण, वेदान्त व योग या

शास्त्रांत प्रावीण्य संपादिलें. यांची वृत्ति मोठी निःस्पृह व आनंदी असून हे पराकाष्ठेचे उद्योगशील होते. यांचें पूर्वाश्रमींचें नांव सखारामदीक्षित असें असून चतुर्थाश्रमस्वीकारानंतर यांचें श्रीयोगानंदसरस्वती हें सांप्रदायिक नांव प्रसिद्ध होतें.

यांणीं आपल्या वयाच्या चाळिसावे वर्षीं संन्यास घेऊन पुष्कळ संस्थानें व पुण्यक्षेत्रें या ठिकाणीं पर्यटन केलें. शेवटीं उत्तर वयांत पंढरीस येऊन कोठें तरी क्षेत्रवास करावा या इच्छेनें फिरतां फिरतां सुवर्णपुरी नांवांच्या एका लहानशा क्षेत्रांत येऊन तेथें त्यांणीं शेवटला काळ ग्रंथरचनेंत व अनेक विषयांच्या अध्यापनांत घालविला. त्याच वेळीं कांहीं प्राकृत जनांच्या प्रार्थनेवरून प्रस्तुत गीतेवर सुबोध व संक्षिप्त अशी ही महाराष्ट्र व्याख्या रचिली. हे मोठे राजयोगी असून यांची शिष्यपरंपराही त्या प्रांतांत पुष्कळ आहे; व यांची समाधि झाल्यास सुमारें वीसवर्षें होऊन गेलीं आहेत.

असो प्रस्तुत गीतेच्या व टीकाकारांच्या संबंधानें जी माहिती आम्हीं संक्षेपांत सांगितली आहे तिची यथार्थता सुज्ञ वाचकांनीं स्वतः अनुभवून पहावी इतकी सूचना करून ही प्रस्तावना पूर्ण करितों.

पुस्तक प्रकाशक.

---

॥ श्री रामगीता अभिनव ॥ वल्लभेसि सांगे शिव ॥ जी श्रीरामें स्वयमेव ॥ लक्ष्मण उपदेशिली ॥ १ ॥ आहे जरी एक अध्याय ॥ तरी ईतें जो सदा ध्याय ॥ तो स्वयें परब्रह्म होय ॥ नित्य अद्वय अभंग ॥ २ ॥ परि मूळ ॥ असे संस्कृतीं ॥ तेणें जडमति कैसे तरती ॥ हें विचारूनिया महामति ॥ निज चित्तीं कळवळला ॥ ३ ॥ दयासिंधु श्रीयोगानंद ॥ पाहूनि प्राकृत मतिमंद ॥ तदुद्धारार्थ हें सानंद ॥ गीतारविंद प्रफुल्लवी ॥ ४ ॥ कीं घेऊनि तयाचा सुगंध ॥ अधिकारी साधक मिलिंद ॥ छेदोनिया संसारबंध ॥ निजानंद पावोत ॥ ५ ॥ शक आठराशे सात ॥ पार्थिव नाम संवत्सरांत ॥ माघमासीं केली मुद्रित ॥ व्हाया विश्रुत सकळांसी ॥ ६ ॥ सज्जनांचा कृपापात्र ॥ श्रीयोगानंदाचा छात्र ॥ एकनाथज्येष्ठपुत्र ॥ आर्यमित्रप्रकाशक ॥ ७ ॥ तेणें ही विवेकभरिता ॥ रामायणीय रामगीता ॥ मुद्रित केली तत्त्वतां ॥ जगद्धिताकारणें ॥ ८ ॥ ईतें विचारूनि मुमुक्षुजन ॥ होवोत सदा आनंदघन ॥ हेंचि मुद्रापण प्रयोजन ॥ मनीं वामन मानितो ॥ ९ ॥

ग्रंथप्रकाशक.

श्री.

# अथ रामगीता.

श्लोकः ( उपजातिवृत्तम्. )

श्रीमहादेव उवाच.—

ततो जगन्मंगलमंगलात्मना विधाय रामायणकीर्तिमुत्तमां ॥

---

## श्रीयोगानंदस्वामिविरचित ओवीबद्ध प्राकृत टीका.

श्रीगणेशांबागुरुभ्यांनमः । श्रीसीतारामचंद्राय नमः । ॐ नमः सच्चिदानंदा। अज अव्यय अभेदा । जगदंकुरमूळकंदा । आत्मया रामा ॥ १ ॥ तूंचि झालासी गजवदन । जो चतुर्दशविद्यांचें निधान । आरंभीं जयातें वंदन । करिताति महाकवि ॥ २ ॥ शुद्ध चिन्मय सिंहासन। वरि आरूढला आपण ।उदर दोंदील विराजमान । जेथें चौदा लोक वसती ॥ ३ ॥ शुद्ध पीतांबर परिधान । विद्युल्लतेपरि दैदीप्यमान । कटिवरी कटिसूत्र पूर्ण । शोभे नागबंधाचें ॥ ४ ॥ नागयज्ञोपवीत कंठीं । चंद्र वसे ज्याचे किरीटीं । चाऱ्ही वेद होऊनि हिंपुटी । हस्त झाले जयाचे ॥ ५ ॥ तत्पद गजाकार वदन । त्वंपद शरीर संपूर्ण । उभय ऐक्य असिपद जाण । श्रीगजानन शोभतो ॥ ६ ॥ देव मानव असुर । जयासी करिती नमस्कार । पावूनियां अभय वर । जयजयकार करिताति ॥ ७ ॥ ऐसें जाणोनि वेदवंद्या । शरण आलों तुजलागीं आद्या । आतां उपनिषत्प्रतिपाद्या । विनंती माझी अवधारिं ॥ ८ ॥ मी केवळ असें मूर्ख । नेणें कांहींच पैं विवेक ।परि तुवां साह्य व्हावें एक । मग उणें मज काय ॥ ९ ॥ तुझा प्रसाद जालिया प्राप्त । सहज सिद्धि पावेल ग्रंथ । श्रीरामगीता हें यथार्थ । नाम असे ज्याचें पैं ॥ १० ॥ या ग्रंथाची पाहतां थोरी । एक जाणतसे त्रिपुरारि । त्यांतील अर्ध जाणे गौरी । चतुर्थांश विधाता ॥ ११ ॥ तयां वांचोनिया आन । जाणावया समर्थ कोण । परि गुरु हरि जयासि प्रसन्न । तो तत्प्रसादें जाणे ॥ १२ ॥ आतां नमूं वागीश्वरी । प्रणवरूपिणी चिल्लहरी । परापश्यंती मध्यमा वैखरी । रूपें सर्वत्र जी वसे ॥ १३ ॥ जीचिया प्रसादें करून । मूक वाचस्पतीशीं भांडण । करावयालागीं पूर्ण । समर्थ होत असे ॥ १४ ॥ स्वयें होऊनि मूळप्रकृति। जीवेश निर्मिले सहज स्थिति । विद्याविद्यारूपें निश्चिति । स्वयें वर्ते दो ठायीं ॥ १५ ॥ गुणत्रयें तिन्ही देव । जिनें निर्मिले स्वयमेव । न होते ठायीं अपूर्व । सकळ विश्व दाविलें ॥ १६ ॥ चैतन्याहून वेगळी । जी नव्हेचि कवणे काळि । जिची होतां कृपा नव्हाळि । ब्रह्मप्राप्ति योगियांसी ॥ १७ ॥ तीतें करोनि वंदन । लाहोनि तिचें वरदान । ग्रंथलेखनालागीं मन । अत्यंत माझें उल्हासलें ॥ १८ ॥ आतां नमूं श्रीसद्गुरु । जो धैर्याचा महामेरु । आणि कृपेचा सागरु । **श्री पूर्णानंद** नाथ ॥ १९ ॥ अहो अपूर्ण एक असावें । तरि पूर्ण यातें ह्मणावें। त्याचिया अभावि वदावें । काय पैं यासी ॥ २० ॥दुःख असावें मूर्तिमंत। तरि आ

चचार पूर्वाचरितं रघूत्तमो राजर्षिवर्यैरभिसेवितं यथा ॥ १ ॥

नंद ह्मणावें याप्रत। दुःखाभावीं न घडे निश्चित। आनंद ह्मणणें॥ २१ ॥ तथापि पूर्णा-नंद नामासी। दावीतसे निश्चयेशीं। आणि स्वनामेंचि साधकांसी। अभेदब्रह्मत्वया-दावितो ॥ २२ ॥ पूर्णशब्दें करून। जाणावें ब्रह्म सनातन। आनंद हें अभिधान। प्रत्यगात्मयाचें ॥ २३ ॥ उभय–ऐक्यें अभिधान। पूर्णानंद असे पूर्ण। तो नमिला सद्भावें करून। अभेदें मियां ॥ २४ ॥ ज्याची कृपा जालिया पूर्ण। साधकासी नुरे मीतूंपण। गुरुत्व शिष्यत्व हींहि दोन। लोपति तेव्हां ॥ २५ ॥ आतां नमूं संत सज्जन। व्यास वाल्मीक प्रधान। तैसेची प्राकृतही पूर्ण। निवृत्तिज्ञानदेवादि ॥ २६ ॥ त्यांची सकृप अभयता। पावोनिया म्यां आतां। सद्भावें ठेविला माथा। त्यांचिया चरणीं ॥ २७ ॥ आतां नमूं कुलदेवता। जी एकवीरा आदिमाता। जीचिया प्रसादें तत्वतां। जोडताति ऋद्धि सिद्धि ॥ २८ ॥ तयेचा लाहोनि अभय वर। मी अपत्य ही पामर। संतपायां समोर। प्राप्त होता झालों ॥ २९ ॥ आतां श्रोतीं सावधान। होवोनि करावें श्रवण। तुमचिया कृपें वर्णन। करीन रामकथेचें ॥ ३० ॥ जी शिवपर्वतापासून। जाली कथागंगा निर्माण। आणि रामसमुद्राप्रति जाऊन। मिळती जाली ॥ ३१ ॥ उपनिषत्सिंधूचें मथन। स्वयें श्रीरामें करून। हें अमृत केलें निर्माण। रामगीतारूप पैं ॥ ३२ ॥ केलें लक्ष्मणासि अर्पण। तो तयातें सेवून। जाला असे सनातन। पूर्ण ब्रह्म अंगें ॥ ३३ ॥ ऐसिया कथेचें व्याख्यान। करावया समर्थ कोण। परि सद्गुरुकृपा संपूर्ण। पाववील सिद्धी ॥ ३४ ॥ सद्गुरुकृपा साधका होति। आलिया उणें तया प्रति। काय असे सुनिश्चिति। विचारून पाहा ॥ ३५ ॥ एकदां कैलासपर्वतीं। बैसोनिया शिवपार्वती। स्वेच्छा क्रीडा असती। आनंदरूप ॥ ३६ ॥ तेव्हां गौरी प्रेमयुक्त। शिवाप्रति असे बोलत॥ कीं रामगीता कथामृत। चाखवा मजसीं ॥ ३७ ॥ ऐकोनि तयेचें वचन। शिव अंतरीं संतोषवन। होऊनिया तो आपण। तयेकाळीं ॥ ३८ ॥ काय बोलिला तयेप्रति। तें ऐकावें स्वस्थचित्तीं। जें ऐकतां पुनरावृत्ति। जाय खुंटोनिया ॥ ३९ ॥ पाहोनि गौरीचा अधिकार। आनंदयुक्त श्रीशंकर। उपदेशावया साचार। परम तत्वातें ॥ ४० ॥ राम आणि लक्ष्मण। यांच्या संवादमुखें करून। करिता झाला निरूपण। ऐकावें तें आतां ॥ ४१ ॥

टीका:——मानूनि लोकापवादभय। राम जानकी त्यागिता होय। तदनंतर वर्तलें काय। तें सांगूं आतां ॥ ४२ ॥ मंगलशब्दें करून। या जगाचें संपूर्ण। आनंदाचि जे जाण। बोलिले असति ॥ ४३ ॥ त्या आनंदांलागिं निश्चित। जो असे उपजीविकाभूत। तो ब्रह्मानंद मूर्तिमंत। असे रघुवीर हा ॥ ४४ ॥ विवरलें थिजलें घृत। अन्य नोहेचि किंचित। तैसाचि हा रघुनाथ। ब्रह्मानंद मूर्ति ॥ ४५ ॥ साधू आणि गायी ब्राह्मण। यांचें करावया प्रतिपालन। आणि धर्माचें संरक्षण। करावया लागीं ॥ ४६ ॥ मारोनिया निशाचर। उतरावया धराभार। सुखी करावया निर्जर। अवतरे रघुवीर रघुवंशीं ॥ ४७ ॥ या ब्रह्मानंदलेशें करून। स्थावर जंगम भूतें संपूर्ण। पावताति उपजीवन। ऐसें बोले श्रुति ॥ ४८ ॥

सौमित्रिणा पृष्ट उदारबुद्धिना रामः कथाः प्राह पुरातनीः शुभाः ॥ राज्ञः प्रमत्तस्य नृगस्य शापतो द्विजस्य तिर्यक्त्वमथाह राघवः॥२॥

मंगलांचें ही मंगल । हा एकाच असे केवल । ऐशा स्मृतिहि सकल । बोलाती ज्यासी ॥ ४९ ॥ सकळ जगाचें कल्याण । होत असे जयापासून । तादृश कल्याणरूपचि पूर्ण । असे मूर्ति ज्याची ॥ ५० ॥ तेणेंचि स्वरूपें करून । जो घनानंद रघुनंदन । काय करीतसे आपण । लोक तरावयासी ॥ ५१ ॥ श्रोता वक्ता आणि इच्छक । एवं असे जो त्रिविध लोक। त्या सर्वांसी मोक्षदायक। जी निजांगें असे५२ ऐसी कीर्ति अति उदार । असे जी व्यापोनि व्योम । तयेतें प्रगट आत्माराम । करोनिया स्वयें ॥ ५३ ॥ वाल्मीकादिऋषिकृत । रामायणें जीं बहुत । त्यांतें प्रवर्तवीनिश्चित । निजांगेंच जी ॥५४॥स्वयें रामाचि जिय लागून। आश्रय असे परिपूर्ण । यास्तव जीस रामायण । अभिधान आलें ॥ ५५ ॥ रामावतारापासून । रावणवधांत संपूर्ण । स्पष्ट असे वर्णन । जिचिया ठायीं ॥ ५६ ॥ ऐसिया कीर्तीतें करून । राहता झाला रघुनंदन ।पुढें लोकापवादें जाण । त्यजिली सीता॥ ५७॥ पुढील भविष्यार्थ जाणून । सीते ऐसें चिद्रत्न । त्यजिता झाला रघुनंदन । लोकापवादभिषें ॥ ५८ ॥ असो या उपरि रघुवीर । धर्मार्थ काम साचार । विध्युक्त प्रकारेंचि रणधीर । लोकहितार्थ आचरे ॥ ५९ ॥ पूर्वीं राजे थोर थोर । झाले असती जे अपार । स्वकीय परकीय साचार । वंशांचिये ठायीं ॥ ६० ॥ तिहीं केलें जें आचरण । प्रजापालन सत्कथा श्रवण। तें विधियुक्त रघुनंदन। करिता झाला६१ कर्तृत्वभोक्तृत्वा अतीत। स्वयें असोनि श्रीरघुनाथ । लोकसंग्रहार्थ असे दावित। सर्व आचरोनि ॥ ६२ ॥ त्याचिया निजदासांप्रति । कर्तृत्वादि नसे निश्चिति । मा अंगें तो रघुपति । कर्ता भोक्ता होय कैसा ॥ ६३ ॥ यांतील जें गुह्य वर्म । तें संतांसि असे सुगम । इतरांसी अति दुर्गम । बोलावें न लगे ॥ ६४ ॥ १ ॥

टीकाः—वेद गुरु देवांचे ठायीं॥ जिचा पूर्ण विश्वास पाहिं ॥ दानशील सर्वदाही । अतिउदार जे॥६५॥ सकलहि उत्तम गुण । राहती जीचा आश्रय करून । ऐसी बुद्धी सलक्षण।जयाचीअसे॥६६॥ तेणें लक्ष्मणें आपण । होवोनिया सावधान।पुसियेला रघुनंदन । पुरातन कथेप्रति ॥६७॥ जे पूर्वीं महा थोर थोर ।जाले असती राजेश्वर । त्यांच्या पुरातन पवित्र । ज्या कथा असती॥६८॥धर्माधर्मांचा निर्णय । ज्यांचे ठायीं निःसंशय । त्या कथेतें सुमित्रातनय। पुसे श्रीरामासी॥६९॥ ऐकोनि लक्ष्मणाचा प्रश्न । राम त्या कथा सांगे संपूर्ण । प्रसंगेंचि नृगाख्यान। सांगता जाला७० नृग राजा दानशूर । पुण्यपावन परम पवित्र। ज्याच्या दानपुण्याचा पार । न कळेचि कोणा ॥७१॥ गोभू कन्या कांचन । गजाश्वरथ वस्त्र भूषण । देऊनिया याचकजन । सुखी केले अपार ॥७२॥ ज्याचिया गोदानांसी मिति।नाहींच पैं सुनिश्चिति। ऐसा तो पुण्यमूर्ति । नृपति असतां ॥ ७३ ॥ एके दिनीं तो नृपभूषण । बोलावूनि एक ब्राह्मण । तयालागीं अमित गोधन । देता जाला॥७४॥ त्यांतून गौतमी एक । नृपगायीं माजी देख । पळोनि आली तत्कालिक । नेणोचि कोणीही॥ ७५ ॥तया गौतमीस-

कदाचिदेकांत उपस्थितं प्रभुं रामं रमालालितपादपंकजम् ॥
सौमित्रिरासादितशुद्धभावनः प्रणम्य भक्त्या विनयान्वितोऽब्रवीत् २
सौमित्रिरुवाच
त्वं शुद्धबोधोसिहि सर्वदेहिनामात्मास्यधीशोसि निराकृतिःस्वयम् ।

---

हित । अन्य गायी अमित । अन्य ब्राह्मणा नृगनाथ । देता जाला परादिनीं॥७६॥ हें दुरित न जाणून । पावता जाला नृपभूषण । पुढें जालें वर्तमान। काय तें ऐका७७ तंव प्रथम येऊनि ब्राह्मण । ह्मणे माझी गौतमी जाण । मजलागीं हें गोदान । कालचि केलें नृपवरें॥ ७८ ॥ दुजाही ह्मणे मजप्रति । आज देता जाला भूपती । ऐसे दोघे ही भांडती । कोणी नायके कोणाचें ॥ ७९ ॥ तैसे च गेले रायापाशीं । बोलते जाले ते तयासी । दाता आणि अपहर्ता होसी । तूंचि एक नृगनाथा ॥ ८० ॥ दोघेही गौतमी टाकून । जाति ऐसें नृग पाहून। प्रार्थिता जाला स्वयें आपण। दोघां सहीं ॥८१॥ ईच्छ्या पालटें अपार । धेनु देतों सालंकार । परि क्षमा करोनि सत्वर । अपराध सहन करावा ॥८२॥ न जाणोनि हा मजप्रति। दोष जाला मुनिश्रेष्ठी तरि येवेळीं कृपामूर्ती । क्षमा केली पाहिजे ॥८३॥ ऐसें विनवितांहि ब्राह्मण । नायकोनि रायाचें वचन । पावते जाले स्थान । आपुलालें ते ॥८४ ॥ श्रीराम ह्मणे लक्ष्मणासी। ऐसिया धार्मिक नृपासी। प्राप्त जाली दशा ऐसी। त्यांचिया शापें॥ ८५ ॥ पावूनिया कृकलासयोनि। राहता झाला कूपस्थानीं। मा ब्रह्मस्व हारिती जाणूनि। त्यांची गति काय बोलूं॥८६ ॥कैसाही असो नृपति। विमुख व्हावें ब्रह्मस्वाप्रती हा चि परम धर्म निश्चिति । जाणोनि वेंई सौमित्रा ॥ ८७॥ करितां ब्रह्मस्वहरण । समूळ वंशाचें होय दहन । हा मुख्य धर्म रघुनंदन । सांगता झाला अनुजासी ॥ ८८ ॥ २ ॥

टीकाः———एके दिनीं श्रीरघुपति । बैसला असतां एकांतीं । परम नम्रता धरोनि चित्तीं । लक्ष्मण तेव्हां ॥ ८९॥ प्रेमभक्तियुक्त होऊन । हा सद्गुरु ऐसें मानून । करोनिया सांष्टाग नमन । शरण झाला ॥ ९० ॥भगवन्मुखें कथा श्रवण केलें परमादरें करून। तेणें सहज अंतः करण। अति शुद्ध जालें साधनचतुष्टयसंपन्न। होऊनी सद्गुरुसी शरण । जाता झाला लक्ष्मण । हें सूचविलें सहजी ॥ ९२ ॥ गुरूपसत्तीविण। कदान लाभे आत्मज्ञान । यास्तव स्वयें लक्ष्मण करिता झाला उल्हासें ॥ ९३ ॥ ज्याचिया चरणकमळासी । रमा होवोनिया दासी । लालन करी अहिर्निशिं । सप्रेमभावें ॥ ९४ ॥ ऐसिया जगत्प्रभूप्रति । लक्ष्मण तेव्हां महामति ।बोलता जाला तेच श्रोतिं । ऐकावें आतां॥९५॥ सर्व विषयांते जाणती । उत्कृष्ट असे जयाची मती । यास्तव महामते यारिति । संबोधनातें॥९६ ॥ देवोनिया लक्ष्मण । श्री रामासि बोले वचन । ह्मणे रामा तूं आहेसी पूर्ण । शुद्ध बोध स्वयें ॥ ९७ ॥ ह्मणजे जें अनवच्छिन्न । प्रत्यग्ब्रह्म पूर्ण चैतन्य । तें स्वरूप जयाचें पूर्ण । ऐसा तू आहेसी ॥ ९८ ॥ आणि देही जे संपूर्ण । यांचा आत्मा तूं आहेसी पूर्ण । सर्व जीव तुझेचि जाण । प्रतिबिंब असती ॥ ९९ ॥ जीव आणि

प्रतीयसे ज्ञानदृशां महामते पादाब्जभृंगाहितसंगसंगिनाम् ॥ ४ ॥
अहं प्रपन्नोस्मि पदांबुजं प्रभो भवापवर्गं तव योगिभावितम् ।
यथांजसा ऽज्ञानमपारवारिधिं सुखं तरिष्यामि तथानुशाधि मां ॥ ५ ॥

ईश्वर । प्रतिबिंबें तुझीं साचार । यास्तव प्रत्यग्ब्रह्म परात्पर । तूं आहेसी स्वयें ॥ १०० ॥ तूंचि ईश्वररूपें करून । करिसी सर्वांचें नियमन । अंतर्यामित्वास्तव तूं जाण । सर्वाधीश असती ॥ १ ॥ सर्वांचेंही नियमन । करोनियाहि तुजलागुन । भेद नसे यास्तव पूर्ण । सर्वात्मत्व असे तुजसी ॥ २ ॥ औपाधिक भेदास्तव । वर्ते नियंतृनियम्यभाव । त्या उपाधीसी मिथ्यात्व । जाणुन घ्यावें ॥ ३ ॥ जीवेश्वरादि सकल द्वैत । मिथ्या असे मायाकल्पित । एकला एक शाश्वत । आससी तूं ॥ ४ ॥ यास्तव भेद त्रिविधही । तुझे ठायिं कदा नाहीं । एकाचि तूं सर्वदाही । स्वप्रकाश आहेसि ॥ ५ ॥ अस्मदादिकांचियापरि । स्वार्जित कमावान निर्धारिं । तूं नव्हेसी गा शरीरी । सुखदुःखभोक्ता ॥ ६ ॥ तूं नामरूपां अतीत । स्वयें आहेसी पूर्ण शाश्वत । तुझिया स्वरूपाचा अंत । नेणेचि पैं कोणी ॥ ७ ॥ तूं ह्मणसी ऐसिया रिती । सर्वहि लोकीं कां मजप्रति । जाणिजेतं नसे निश्चिति । तरि ऐक सांगूं ॥ ८ ॥ ज्ञानदृष्टि जोडली ज्यांसी । स्वयें त्यांचिया प्रत्ययासी । तूं येताहेस अहर्निशीं । अभेदपणें ॥ ९ ॥ परि तें तुझें अपरोक्ष ज्ञान । असे महावाक्या अधीन । गुरुमुखें श्रवणादि साधन । केलिया लागे ॥ १० ॥ तें वेदांतविचारज्ञान । प्राप्त जालें ज्यांलागुन । तेच या लोकीं पूर्ण । जाणाति तुजसी ॥ ११ ॥ एवढाहि लाभ पूर्ण । असे तुझ्या भक्ती अधीन । तुझिया भक्तीविना ज्ञान । न लाभे कोणा ॥ १२ ॥ तुझिया चरणकमळाचे ठायीं । ज्यांचें अंतःकरण सर्वदाही । भृंगांचियापरि पाहीं । रंगोनि गेलें ॥ १३ ॥ जीव गेलियाही भृंग । न सोडीच कमलपराग । तैसें अंतःकरण अभंग । असे चरणीं ज्यांचें ॥ १४ ॥ ऐसें तुझे भक्त । त्यांचा संग भक्तियुक्त । जिहीं केला सुनिश्चित । ते जाणती तूंतें ॥ १५ ॥ सारांश सत्सहवासें करून । प्राप्त जालिया आत्मज्ञान । तूं लाभसी त्यांलागुन । इतर तुज नेणे ॥ ११६ ॥ ४

ऐसी प्रार्थना लक्ष्मण । करिता जाला स्वयें आपण । ह्मणे मी आहें तुझिया शरण । चरणकमळांसी ॥ १७ ॥ ज्या चरणाचा आश्रय । केलिया हें संसारभय । तात्कालाचि दूरहोय । निःशेष पैं ॥ १८ ॥ आणि योगी जयाप्रति । सर्वदा ह्रदयीं ध्याति । व्हावयालागी स्वमुक्ति । संसारदुःखापासोनिया ॥ १९ ॥ येणें वचनें करून । सदाचारही दाविला पूर्ण । सारांश जें तुझें भजन । तें मोक्षदायी ॥ २० ॥ आतां माझी प्रार्थना एक । ऐकावी बोलतों सकाळिक । अपार सिंधुरूप देख । जें अज्ञान असे ॥ २१॥ संसारासी मूळ कारण । तेंचि सर्वथा असे पूर्ण । जेणें देहद्वयबंधन । जीवांसि होय ॥ २२ ॥ ऐसिया अज्ञानापासून । जैसा मी अक्लेशें करून । तरेन तैसा उपाय पूर्ण । शिकवीं मजसी ॥ २३ ॥ अपार वारिधि ऐसें वचन । येणें सपार समुद्राहून । व्यतिरेकाचि परिपूर्ण । बोलिला असे ॥ २३ ॥

श्रुत्वाथ सौमित्रिवचोऽखिलं तदा प्राह प्रपन्नार्तिहरः प्रसन्नधीः ।
विज्ञानमज्ञानतमोपशांतये श्रुतिप्रपन्नं क्षितिपालभूषणः ॥ ६ ॥

**श्रीरामउवाच**

आदौ स्ववर्णाश्रमवर्णिताः क्रियाःकृत्वा समासादितशुद्धमानसः ।

तस्मात् हा संसारसमुद्र।तरावयासी कठीण फार।यालागिं तूं परपार।पाववीं मातें॥२५॥६

ऐसें ऐकोनि सौमित्रिवचन । या उपरी श्रीरघुनंदन । उत्तर देतसे आपण । सौमित्रीलागीं ॥ २६ ॥ जे शरणागत निजभक्त । त्यांचें संसारदुःख समस्त । जी हरण करी सौख्य देत । श्रवणयोग्य कालीं ॥ २७ ॥ ऐसी भ्रमादि रहित । भक्तानुग्रहपर शाश्वत । ज्याची बुद्धि असे निश्चित । तो श्रीराम अंगें ॥ २८ ॥ जो सकल रायांमाजि जाण । भूषणभूत असे पूर्ण । तो श्रीराम तत्त्वज्ञान । लक्ष्मणासि सांगे ॥ २९ ॥ अज्ञानरूप जें तम निश्चित । तें व्हावया भस्मीभूत । अपरोक्ष ज्ञान रघुनाथ । फलत्वें सांगे ॥ ३० ॥ यदर्थीं बोले श्रुति वचन । तमेव विदित्वा ऐसें जाण । कीं होय संसाराचें दहन । ज्ञानेंचि एकें ॥ ३१ ॥ एक आत्मज्ञानाविण । कदा नव्हे संसारदहन । यास्तव आत्मतत्त्वज्ञान । श्रीराम सांगे ॥ ३२ ॥ प्रथम सामान्यत्वेंकरून । आत्मतत्वाचें पूर्ण ज्ञान ॥ बोलता जाला रघुनंदन । लक्ष्मणासि तेव्हां ॥ ३३ ॥ लक्ष्मणाचें जें त्दद्गत । जाणोनियां तें समस्त । बोधीतसे रघुनाथ । काय तें ऐका ॥ ३४ ॥ ६ ॥

प्रथम स्ववर्णाश्रमांसी । शास्त्रवर्णित कर्मांसी । करोनिया निज मनासी । करावें शुद्ध ॥३५॥ ह्मणजे वर्ण चार आश्रम च्यार । यांचा भिन्न भिन्न अचार ।वेदशास्त्रीं सविस्तर । वर्णिला असे॥३६॥ ब्राह्मण क्षात्रिय वैश्यांसी । वेदाध्ययन उपनयनांसी । अधिकार असे निश्चयेंशीं। स्त्रीशूद्रांसि नाहीं ॥ ३७ ॥ ब्रह्मचर्य गृहस्थाश्रम । तिसरा वानप्रस्थ धर्म । हा त्रयासीच नेम । वेदशास्त्रीं केला ॥ ३८ ॥ चतुर्थ संन्यासाधिकार । ब्राह्मणासिच असे साचार । क्षत्रियादि वर्ण इतर । त्यांसि कदापि नाहीं ॥ ३९ ॥ वर्णत्रयाचें सेवन । शूद्रें निष्कपट करावें पूर्ण । आणि समार्जनादि सेवा जाण । करावी देवालयीं ॥ ४० ॥ तेथें जें प्राप्त होईल देखा । तेणेंचि करावी निज जीविका ।पतिसेवाचि एक धर्म निका । स्त्रीयांसी असे४१ पूर्व पुण्यें करून । प्राप्त झालिया द्विजत्व पूर्ण। त्यासि वेदें जें कर्माचरण । नेमिलें तें ऐका॥४२॥गर्भाधान पुंसवन । तिसरें सीमंतोन्नयन। विष्णुबालि निष्क्रमण ।जातकर्म नामकर्म ॥ ४३ ॥ अन्नप्राशन आणि चौल । हे नव संस्कार केवल । उपनयना पूर्वीं सकल । यथासांग व्हावे ॥ ४४ ॥ जालिया उपनयन संस्कार । ब्रह्मचर्यधर्म सविस्तर । आचरावा अति आदर । पूर्वक तेणें ॥ ४५ ॥ जरि वर्णावा धर्मविस्तार । तरि हा ग्रंथ वाढेल थोर । असो वेदें जो आचार । नेमिला ज्यांसी ॥४६॥ तोच तिहीं आचरुन । ह्दयशुद्धि साधावी पूर्ण । परधर्मातें कधींही जाण । नाचरावें कोणीं ॥ ४७ ॥ ह्दयशुद्धीवांचून । कदा न घडे आत्मज्ञान । तेणेंवीण जन्म मरण । न चुके कोणा ॥ ४८ ॥ आतां तादृश जे ज्ञानप्राप्ति ।

समाध्य तत्पूर्वमुपात्तसाधनः समाश्रयेत्सद्गुरुमात्मलब्धये ॥ ७ ॥
क्रिया शरीरोद्भवहेतुरादृता प्रियाप्रियौ तौ भवतः सुरागिणः
धर्मेतरौ तत्र पुनः शरीरकं पुनः क्रियाश्चक्रवदीर्यते भवः ८

अनुक्रमें तयेप्रति । अंतरंग बहिरंग निश्चिति । असती जीं साधनें ॥ ४९ ॥ तीं लक्ष्मणासी राम । सांगता झाला पूर्णकाम । जें हें बहिरंग कर्म । अंतरंग शमादि ॥ १५० ॥ पूर्वी नित्य नैमित्तिक । यज्ञ दान तप सुरेख । हें कर्मचि अवश्यक । पाहिजे केलें ॥ ५१ ॥ जंव लाहिजे हृदयशुद्धि । तव कर्म करावेंचि त्रिशुद्धि । पुढेंही तत्सहितचि शमादि । करावीं साधनें ॥ ५२ ॥ शमदमादिसहित । वैराग्यदार्ढ्यपर्यंत । कर्मे आचरावीं पूर्वोक्त । यज्ञदान तपादि ॥ ५३ ॥ एवं साधनचतुष्टयसंपन्न । होवोनिया स्वयें पूर्ण । सद्गुरुलागीं शरण । व्हावें अनन्य भावें ॥ ५४ ॥ परिसाधनचतुष्टयसंपन्नता । पूर्ण यावया आपुल्या हाता । सगुणोपासनाचि तत्वतां । पाहिजे केलें ॥ ५५ ॥ हरिप्रसादें करून । झालिया सद्गुरुदर्शन । मग सहजचि कर्माचरण । गळालें त्याचें ॥ ५६ ॥ लाहोनि गुरुप्रसन्नता । आत्मलाभार्थीचि तत्वतां । तत्त्वमस्यादिवाक्यार्थी । विचारोनि ध्यावें ॥ ५७ ॥ श्रोत्रिय आणि ब्रह्मनिष्ठ पूर्ण । हे मुख्य सद्गुरु लक्षण । साधकें सद्भावें शरण । तयासीच व्हावें ॥ ५८ ॥ व्युत्पत्तिबळें करुन । वाक्यार्थाचें विचारण । स्वयें केलियाही पूर्ण । निष्फलचि होय ॥ ५९ ॥ जयासी नाहीं पूर्ण प्राप्ति । तो शिष्यसी करवील कवणे रिती । आणि देखिली नसतां श्रुति । संशय हरील कैसा ॥ ६० ॥ उभयसंपन्नता ज्यासी । गुरुत्वही बोलिलें त्यासी । अन्यथा विटंबनेसी । उणें काय असे ॥ ६१ ॥ आणि साधनचतुष्टयसंपन्न । शिष्यही तोचि बोलिजे पूर्ण । अन्यथा हें ज्ञानधन । न लाभे त्यासी ॥ ६२ ॥ त्यांसि कर्म कीं उपासन । सांगावें आलिया शरण । सारांश अधिकारावांचून । लाभ न मिळे ॥ ६३ ॥ असो एथें अधिकारी लक्ष्मण । सद्गुरु श्रीरघुनंदन । तो ह्मणे आत्मलाभार्थ शरण । सद्गुरूसि व्हावें ॥ ६४ ॥ लक्ष्मणाचें मिष करून । जीव उद्धराया संपूर्ण । श्रीरामें निज गुह्य ज्ञान । आदरिलें प्रगटूं ॥ ६५ ॥ हेंचि शिव गौरीप्रति । सांगतसे कैलास पर्वतीं । तरि अत्यादरें हेंच श्रोतीं । करावें श्रवण ॥ ६६ ॥ ७ ॥

राम ह्मणे लक्ष्मणाप्रति । ऐक या संसाराची स्थिति । चक्ररूपत्वाचि निश्चिती । असे यासी ॥ ६७ ॥ सर्वदा करि परिभ्रमण । ऐसें चक्र जें असे जाण । तया परीच याचेंही पूर्ण । परिभ्रमण असे ॥ ६८ ॥ याची निवृत्ति व्हावयासी । आधीं कारण जें असे यासी । नाश व्हावा त्या अज्ञानासी । तरिच हा नाशे ॥ ६९ ॥ अज्ञाननिवृत्तीसि साधन । एकचि असे तत्वज्ञान । तें व्हावया उत्पन्न । तत्त्वविचार व्हावा ॥ ७० ॥ तो विचार गुरू अधीन । या लागी व्हावें त्यासि शरण । ऐसें स्वमुखें रघुनंदन । बोलता झाले ॥ ७१ ॥ चक्रापरि भ्रममाण । संसार जो बोलिला पूर्ण । तयातेंचि उपपादुन । आतां दावता ॥ ७२ ॥ झालिया सद्गुरूसी

**अज्ञानमेवास्य हि मूलकारणं तद्धानमेवात्र विधौ विधीयते ॥**
**विद्यैव तन्नाशविधौ पटीयसी न कर्म तज्जं सविरोधमीरितं ॥ ९ ॥**

शरण । टाकावा कर्मादर संपूर्ण । पूर्वीं आदर पूर्वकाचे जाण । कर्में जीं केलीं ७३ तींच या शरीरजन्मासी कारण असती निश्चयेंसि कर्मानुरूप जन्माशी जीव हा पावे ७४ देवेमनुष्यजन्म पावून । विषयाभिलाषानें धरून । शास्त्रप्रसिद्ध धर्माधर्म । दोन आचरताति ॥ ७५ ॥ त्यांचें फल सुखदुःख । जीव भोगिति अवश्यक । स्वर्ग अथवा नरक । भोगिति कर्मयोगें ॥ ७६ ॥ कोणीएकाची बुद्धि पाहीं । अधर्म जो त्याचेच ठायीं । सुख मानोनिया सर्वथाहि । प्रवर्तमान होये ॥ ७७ ॥ कोणाची धर्माचेच ठायीं । सुखबुद्धीकरूनि पाहीं । प्रवृत्ती जाण सर्वदाहि । होत असे॥७८॥जो दृढ असे पूर्वाभ्यास । तीच प्रवृत्ति होतसे त्यास।एवं कर्म शरीर शरीरें कर्मास।करणें घडे॥७९॥ऐसें चक्रापरि भ्रमण ।असे या संसारालागून तेंचि आतां प्रगट करून। दावितों ऐका ॥८०॥ जैसें चक्र फिरत असतां । अधोभाग तो होय वरता । ऊर्ध्वभागही तत्वतां । तळासी ये ॥ ८१ ॥ पुनः अधोभाग जाय वरि । आणि पावे तळा माझारी । एवं अधोर्ध्व फेरी।जैसी असे त्याची॥८२॥एवं जन्यजनकभावें करून।जन्म कर्म जें त्या लागुन।निजानुभवें विचारून । परिभ्रमण जाणावें॥८३॥ जरी पुण्य झालें अधिक । तरि आधीं भोगी स्वर्गसुख । पापाधिक्य तरि नरक । भोगावा आधीं ॥ ८४ ॥ एवं कर्मफळें भोगून । पाप पुण्य होतां समान । मनुष्यजन्मातें आपण । पावता होय ॥ ८५ ॥ पुनः करि कर्माचरण । तेणें तैसेंच पावे जनन । ऐशा प्रवाहीं सर्वही जन । बुडोन गेले ॥ ८६ ॥ यास्तव जो मुमुक्षु नर । तेणें तरावया हा संसार । टाकोनिया कर्मादर । विचारनिष्ठ व्हावें ॥ ८७ ॥ ८

कारण कीं संसारालागून । अज्ञानचि असे मूळ कारण । ऐसें तेव्हां रघुनंदन । बोलता झाला ॥ ८७ ॥ संसार निवृत्तिलक्षण । कर्तव्यार्थ असे पूर्ण । तया संसारा मूळ कारण । मूलाज्ञान असे ॥ ८८ ॥ यास्तव आधीं त्याचेंचि हनन । करावें साधनोपायें करून । मग सहजचि हा संसार जाण । नाश पावे ॥ ८९ ॥ जरि तूं ऐसें कांहीं ह्मणसि । कर्मचि त्या अज्ञानासी । नाशक असो निश्चयेंसी । निज सामर्थ्यें ॥ ९० ॥ सांगितल्या ज्ञानें करून । काय असे प्रयोजन । तरि येविषयीं समाधान । सांगतों ऐक ॥ ९१ ॥ मूलाज्ञाननाशाविषयीं । ज्ञानचि एक समर्थ पाहीं । कर्म तें कदापिही । समर्थ नव्हे ॥ ९२ ॥ जें आत्मस्वरूपाचें अज्ञान। त्यापासोनि देहाभिमान । त्याचिया पोटीं उत्पन्न । कर्म हें झालें ॥ ९३ ॥ यास्तव परंपरा कार्य । कर्म अज्ञानाचेंचि होय । यास्तव तें नाशक काय । होईल त्यासी ॥ ९४ ॥ आणीकही ऐक वचन । जरि कांहीं बोलसी साशंकमन । कीं जें उत्पन्न ज्यापासून । तें त्यासही नाशक असे ॥ ९५ ॥ कर्कटी वृश्चिकादिक जे कांहीं । जयापासोनि जन्मति पाहीं । तयासीच सर्वथाहि । नाशक होती ॥९६॥ तैसेंच कर्महीं निश्चयेंशीं । निजकारण अज्ञानासी । नाशक होवो कांहीं ऐसी । वदसील मात ॥ ९७ ॥ तरि ऐक माझें वचन । जें जन्यत्व असे जाण । तें प्रयो-

न ज्ञानहानिर्न च रागसंक्षयो भवेत्ततः कर्म सदोषमुद्भवेत् ॥
ततः पुनः संसृतिरप्यवारिता तस्माद्बुधो ज्ञानविचारवान् भवेत् ॥१०॥
ननु क्रिया वेदमुखेन चोदिता यथैव विद्या पुरुषार्थसाधनं ॥
कर्तव्यता प्राणभृतः प्रचोदिता विद्यासहायत्वमुपैति सा पुनः ॥ ११ ॥

जक नाहींच पूर्ण ॥ नाशकत्वाविषयीं ॥ ९८ ॥ जें ज्यासी विरोधी पूर्ण ॥ तेंचि त्याच्या नाशासी कारण ॥ बोलिजलें असे जाण ॥ सर्वज्ञ जनीं ॥ ९९ ॥ यास्तव अज्ञानासी विरोधी ॥ ज्ञान असे एक त्रिशुद्धि ॥ त्यावीण अन्य अज्ञाना कांधीं ॥ नाशक नव्हे ॥ २०० ॥ ९ ॥

अत एव कर्मेंकरून । अज्ञानाचें नोहे हनन । ऐसेंच या श्लोकें जाण ॥ बोलताहे तो ॥ २०१ ॥ कर्म आणि अज्ञानासी ॥ विरोध नसे परस्परेंशीं ॥ यास्तव कर्में अज्ञानासी । नाश न घडे ॥ २ ॥ जंव अज्ञानाचा नाश नाहें ॥ तंव द्वैत सत्याचि भासे पाहिं ॥ तेणें विषयाभिलाष कांहिं । न पावे नाश ॥ ३ ॥ अज्ञान आणि विषयाभिलाष ॥ यांचा यथार्थ न झाल्या नाश ॥ पुनः कर्मचित्तें सदोष । उद्भवताहे ॥४ ह्मणसील तेथ दोष कोण । ऐक त्याचेंहि लक्षण । तादृश कर्मे फलहि जाण ॥ नाशवंताचि असे ॥ ५ ॥ तेणें पुनः होय संसार । परि कदा न चुकेचि फेर। यास्तव जा मुमुक्षु नर ॥ तेणें त्यागावेंचि कर्म ॥ ६ ॥ वेदांतवाक्यांचा विचार ॥ करोनि व्हावें ज्ञानपर । ह्मणजे अज्ञानेंशीं हा संसार ॥ नाश पावे ॥ ७ ॥ १० ॥ आतां ज्ञानासीच पाहिं ॥ मोक्षप्राप्ति जे तयेविषयीं ॥ कारणत्व असे सर्वथाहि ॥ बोलावया त्यातें ॥ ८ ॥ जो ज्ञानकर्मांचा सर्वथा ॥ समुच्चयवाद तत्वता ॥ त्यातें दूषावया आतां ॥ बोलताहे ॥ ९ ॥ येथें दीड श्लोकें करून । शंकायुक्त लक्ष्मण । बोलता जाला काय वचन । तें ऐकावें आतां ॥ १० ॥ अहो हें आत्मज्ञान । जैसें पुरुषार्थसाधन । बोलती वेद शास्त्र पुराण । यथार्थपणें ॥ ११ ॥ ब्रह्म जाणे तो ब्रह्मप्राप्ति । पावताहे सुनिश्चिति । कर्महीं ऐशाच रिती । बोलती ते ॥ १२ ॥ समुच्चयवादियाचें मत । यदर्थीं असे सुनश्चित । कीं ज्ञान हें कर्मसाहित । ब्रह्मप्रापक असे ॥ १३ ॥ उभय पक्षेंकरून । जैसें पक्षियासि नभिगमन । तैसें कर्मज्ञानयोगेंचि पूर्ण । शाश्वत ब्रम्ह पाविजे ॥ १४ ॥ इत्यादि वचनें करून । पुरुषार्थसाधनत्वें पूर्ण । कर्महीं अवश्य बोलिलें जाण । कर्तव्यत्वें ॥ १५ तस्मात् नित्य नैमित्तिक । कर्म करावेंचि अवश्यक । नकरितां दोषहि देख । उत्पन्न होय ॥ १६ ॥ तेणें ज्ञानाची उत्पत्ति । होणार नाहीं सुनिश्चिति । यास्तव दोन्ही समानरीति । उपासावें ॥ १७ ॥ यदर्थीं असे दृष्टांत । घटजनन जें कार्य प्राप्त । त्यासि चक्रादिकांची जैसी होत । परस्परें सहायता ॥ १८ ॥ तैसें कर्महीं ज्ञानाप्रति । सहायत्व जें सुनिश्चिति । त्यातें पावे त्याच रीती । वाटतें ऐसें ॥ १९ । ऐसी कर्मकर्तव्यता । स्वयें बोलिली जी तत्वता । तीतेंच वर्णून आतां । दाखविताहे ॥ २० ॥ जो सकल देवांमाजी पूर्ण । करी अग्नीचें आराधन । त्यातें वीरशब्दें करून । बोलतसे श्रुती ॥ २१ ॥ यावज्जीवपर्यंत । अग्निहोत्र जें त्याप्रत । होमिताहे जो आद-

कर्माकृतौ दोषमपि श्रुतिर्जगौ तस्मात् सदा कार्यमिदं मुमुक्षुणा ॥
ननु स्वतंत्रा ध्रुवकार्यकारिणी विद्या न किंचिन्मनसाप्यपेक्षते ॥ १२ ॥
न सत्यकार्योपि हि यद्वदध्वरः प्रकांक्षतेऽन्यानपि कारकादिकान् ॥
तथैव विद्या विधितः प्रकाशितैर्विशिष्यते कर्मभिरेव मुक्तये ॥ १३ ॥

रयुक्त । धन्य तो या जगीं ॥ २२ ॥ न करितां कर्माचरण । दोषातेंही श्रुति-आपण । बोलताहे याकारणें । सर्वदा स्वयें ॥ २३ ॥ मुमुक्षूनें कर्माचरण । करावेंचि यथार्थ पूर्ण । सहायत्वालागुन । ज्ञानाचिया पैं ॥ २४ ॥ ११ ॥

ऐकोनि ऐसें त्याचें वचन । उत्तर देतसे रघुनंदन । ह्मणे मोक्ष द्यावया हें ज्ञान । स्वतंत्रचि असे ॥ २५ ॥ मोक्षरूप जो पुरुषार्थ । हेंचि स्थिरकार्य असे निश्चित । यातें द्यावया समर्थ । एक ज्ञानाचि असे ॥ २६ ॥ सहाय जो त्यावांचूनही । स्वकार्यसंपादनाविषयीं । समर्थाचि असे पाहीं । स्वतंत्र तें ज्ञान ॥२७॥ जैसें नाशावया तिमिर । तेजाचि एक समर्थ थोर । सहायभूत वस्तु इतर । नइच्छि मनें कांहीं ॥ २८ ॥ तैसें स्वफलजननाविषयीं । अन्य सहाय जें कांहि । त्याची संभावनाही नाहीं । स्वतंत्र ज्ञाना ॥ २९ ॥ येणें वचनें अनुमान । सुचवीतसे परिपूर्ण । कीं निरपेक्षाचि असे ज्ञान । स्वफलोत्पत्तीविषयीं ॥ ३० ॥ कारण कीं तें स्वतंत्र । ज्ञान असे परम पवित्र । जैसें तेजाचि एक सधर । तमोनाशाविषयीं ॥ ३१ ॥ सारांश ज्ञानासि कांहीं । सर्वथा मनेंकरूनही । पाहतां अपेक्षाचि नाहीं ॥ कर्मादिकांची ॥ ३२ ॥ १२ ॥

समुच्चयवाद स्वीकारून । पुनः बोले सुमित्रानंदन । तुमचें हें वचन । प्रमाण । न वाटे मजसी ॥ ३३ ॥ परि समर्थ जें बोलती कांहीं । तेंही अन्यथा कदा नाहीं । आणि कर्मातें श्रुतीही । आदरें वदति ॥ ३४ ॥ या दोहींमाजी प्रमाण । काय जाणे माद्दश जन । श्रुतीतेंही अप्रमाण । बोलतां नये ॥ ३५ ॥ ऐका श्रुतीचें उत्तर । सत्यकार्यही जो अध्वर । येणें वचनें साचार । कर्मही मोक्षदायी ॥ ३६ ॥ चातुर्मास्ययाजीलागुन । अक्षय सुकृत होतसे पूर्ण । येणें वचनें कर्मही कारण । मोक्षासी असे ॥ ३७ ॥ जैसा वेदबोधित अध्वर । स्थिरकार्यही साचार । अन्य जें कारकादिक प्रकार । त्यातेंहि इच्छि स्वयें ॥ ३८ ॥ समीप उपकारक । प्रयाज अनुयाजादिक । अंगें असती जीं सकाळिक । कारकें तींचि ॥ ३९ ॥ तैसाच देशकालांप्रती । इच्छीतसे तो अतिनिगुती । मंत्रतंत्रादि त्याच रीती । ऋत्विज दक्षिणा ॥ ४० ॥ तैसेंच हेंहि ज्ञान । मुक्ति द्यावयालागुन । कर्मसहितचि पूर्ण । विशिष्ट होय ॥ ४१ ॥ जें विधिवाक्यांच्या निश्चित । समुदायें असे होत । यास्तव ज्ञानसाह्याप्रत । करीलचि तें ॥ ४२ ॥ यदर्थीं असे अनुमान । कीं स्वफल द्यावयालागुन । कर्मसापेक्ष असे ज्ञान । आंगित्वास्तव ॥ ४३ ॥ प्रयाजादि अंगांप्रति । दर्शादि सापेक्ष जैशारिति । तैसें ज्ञानही कर्माप्रति । सापेक्ष असे ॥ ४४ ॥ ऐसें सत्प्रतिपक्षपूर्ण । सुचविलें अनुमान । तेणें कर्मसापेक्षचि ज्ञान । सुचविजेतसे ॥ ४५ ॥ तस्मात् कर्मसहित

**केचिद्वदन्तीति वितर्कवादिनस्तदप्यसद्दष्टविरोधकारणात् ॥**
**देहाभिमानादभिवर्धते क्रिया विद्या गताहंकृतितः प्रसिध्यति॥ १४ ॥**
**विशुद्धविज्ञानविरोचनांचिता विद्यात्मवृत्तिश्चरमेति भण्यते ॥**
**उदेति कर्माखिलकारकादिभिर्निहंति विद्याखिलकारकादिकम्॥१५ ॥**

---

ज्ञान । यथार्थ आचरो मुमुक्षुजन । तेणेंचि पुरुषार्थ पूर्ण । जोडेल त्यासी ॥ ४६ ॥ १३

ऐसें ऐकून सौमित्रिवचन । दूषीतसे रघुनंदन । जे कोणी वितर्कवादी जन । ते बोलती ऐसें ॥ ४७ ॥ कीं ज्ञानकर्मांचा समुच्चय । तेंचि मुक्तिचें साधन होय । ऐसें बोलती तें निःसंशय । मिथ्याचि व्यर्थ ॥ ४८ ॥ अगा जैसें कर्म केवळ । मोक्ष द्यावया असे विकल । तैसें ज्ञानयुक्तही निष्फल । मोक्षार्थी कर्म ॥ ४९ ॥ स्वयें किंवा ज्ञानाश्रयें करून । मोक्षास द्यावयालागुन । कर्म नोहे समर्थ जाण । दृष्ट विरोधास्तव ॥ ५० ॥ हें विरोधरूप कारण । देखताहे सर्वही जन । यास्तव सर्वथा व्यर्थचि जाण । असे हें कर्म ॥५१॥ आतां तया विरोधाप्रति। बोलतों ऐकें स्वस्थचित्तिं । कर्म वाढे सुनिश्चिति । देहाभिमानास्तवचि ॥ ५२ ॥ अनात्मा जो देहादिक । तेथें आत्मत्वाभिमान जो देख । तेणें कर्म हें सकळिक । पावतसे वृद्धी ॥ ५३ ॥ तो गेलिया देहाभिमान । उत्पन्न होत असे ज्ञान । एवं दोघांचें दर्शन । नाहींच परस्परें ॥ ५४ ॥ जोंवरि असे तो अभिमान । तोंवरीच हें कर्माचरण । तो गेलिया निपटून । ज्ञानसिद्धि ॥ ५५ ॥ एवं अहंकार-सत्ताऽसत्ता । मूल दोन्हींसिही तत्वतां । यास्तव क्रियाज्ञानांचा सर्वथा । विरुद्ध समुच्चयें ॥ ५६ ॥ १४ ॥

आतां पूर्व पक्षाचे ठायिं । बोलिलें जें अनुमान कांहिं । त्यातें दूषण सर्वथा-ही । देवोनिया ॥ ५७ ॥ ज्ञानाचिया स्वरूपाप्रति । बोलताहे तो महामति । जें अतिशुद्ध स्वयंज्योति । विज्ञान असे ॥ ५८ ॥ तें होत असे ज्यांपासून । ऐ-सीं जीं वेदांतवचन । तत्त्वमस्यादि संपूर्ण । षोडशही वाक्यें ॥ ५९ ॥ त्यांचा सद्गुरुमुखें विचार । केलियावरि दृढतर । तेणें प्राप्त जी साचार । चरमा आत्मवृत्ती ॥ ६० ॥ ह्मणजे ब्रह्माकार निश्चिति । जी जाली अंतःकरणवृत्ति । तीच स्पष्ट बोलिजेति। आत्मविद्या नामें ॥ ६१ ॥ ऐसें बोलती थोर थोर। यास्तव हाचि वाक्यविचार । करोनिया संसार । तरावा मुमुक्षुनें ॥ ६२ ॥ पुनः वाद जो समुच्चयपर । त्यातें करावया अत्यंत दूर । ज्ञानकर्मांचें परस्पर । वैषम्य बोले ६३ कर्म जें का यज्ञादिक । तुवां बोलिलें मोक्षदायक । तें कर्तव्यत्वें अवश्यक । मुमुक्षूसि नसे ॥ ६४ ॥ तदुचित कर्मादि अंगेंकरून । युक्त जालिया परिपूर्ण । फळ द्यावयालागुन । सन्मुख होय ॥ ६५ ॥ कारकशब्दें करून । जाणावीं अंगें संपूर्ण। कर्तृत्वभोक्तृत्वादिक जाण । जीं असती कांहिं ॥ ६६ ॥ त्या सर्वांचेंहि हनन । करीत असे स्वयें ज्ञान । अहंबुद्धि निपटून । ज्ञानोत्तर नाहीं ॥ ६७ ॥ सकल व्यापारत्यागें करून । ब्रह्मीं जें पर्यवसान । तेचि आत्मविद्या परिपूर्ण । नि-श्चयें असे ॥ ६८ ॥ यास्तव स्वोत्पत्तीविषयीं । चित्तशुद्धिद्वारें पांहि । कर्मसा-

तस्मात्त्यजेत्कार्यमशेषतः सुधीर्विद्याविरोधान्न समुच्चयो भवेत् ॥
आत्मानुसंधानपरायणःसदा निवृत्तसर्वेंद्रियवृत्तिगोचरः ॥ १६ ॥
यावच्छरीरादिषु माययात्मधीस्तावद्विधेयो विधिवादकर्मणाम् ॥
नेतीति वाक्यैरखिलं निषिध्य तत् ज्ञात्वा परात्मानमथ त्यजेत्क्रियाः ॥ १७ ॥

पेक्ष ती विद्याही । होत असे स्वयें ॥ ६८ ॥ मोक्षरूप जें निजफल । तें द्यावया- लागि सकल । विद्या निरपेक्षाचि केवल । असे कर्माविषयीं ॥ ६९ ॥ अन्यथा स्वरूपासी । नाशचि होईल निश्चयेंशीं । यास्तव बोलिल्या कारणासी । असिद्धि- चि असे॥७०॥ पूर्वपक्षाचियाठायीं । जें बोलिलें असे कांहीं । त्याचें आतां प्रयोजन नाहीं । व्यर्थत्वास्तव ॥ ७१ ॥ १६॥

या उक्तवाक्याचा उपसंहारकरोनिया तो रघुवीर । मुमुक्षूचा वर्तनप्रकार बोलताहे स्वयें॥७२॥ कर्म जें त्यासह वर्तमान विरोध असे ज्ञानालागुन । यास्तव बुद्धिमंत जो मुमुक्षू पूर्णतेणें समुच्चय त्यजावा ॥७३॥ आणि कर्मही संपूर्णतेणें त्यजावेंचि पैं जाण। काम्य कर्मं विशेषेंकरुन । टाकावेंच आधीं॥ ७४ ॥आणि नित्य नैमित्तिकही। जंव चित्तशुद्धि होतसे पाहीं । तोंपर्यंतचि सर्वथाही। करावें कर्म॥ ७५ ॥पुढें आत्मानुसं- धानासी । बंधकत्वाचि असे कर्मासी । आणि प्रयोजनही त्यासि । कांहींच नाहीं ॥ ७६ ॥ यास्तव नित्य नैमित्तिकाहि । कर्म टाकावेंचि पाहीं । पुढेंहि क- र्तव्यत्व कर्माचें कांहीं । बोलिजेतसे अल्प ॥ ७७ ॥ परब्रह्मीं जंव चित्त । स्थैर्य पावे तंवपर्यंत । करावें कर्म विधियुक्त । टाकावेंचि पुढें ॥ ७८ ॥ आतां मुमुक्षू- ची कर्तव्यता । तुजसी सांगतों ऐक ताता । शद्वादि विषय सर्वथा । टाकोनि पांच ॥ ७९ ॥ मन गुंबले आत्मचिंतानें । इंद्रियेंहि त्यालागुनि । अनुसराती विषय टाकु- नि । स्वामित्वास्तव ॥ ८० ॥ सहजें निर्विषय होऊनि । मुमुक्षू वर्ततसे या जनीं। तेणें आत्मानुसंधानीं । असावेंचि सदा ॥ ८१ ॥ जो सच्चिदानंद आपण । प्रत्यग्ब्रह्म सनातन । तयाचें निरंतर ध्यान । करितां तोचि व्हावें ॥ ८२ ॥ येथें इंद्रियप्रत्याहा- र । कर्तव्यत्वें साचार । बोलिला जेणें ऐसा प्रकार । दिसोनि येतो ॥ ८३ ॥ त्या- पूर्वीं अर्थेंचि करुन । प्राणायामादिक साधन । बोलिलें यास्तव मुमुक्षुजन । आचरो योगा ॥ ८४ ॥ रागी विरागी भेदें करून । कर्माकर्म कर्तव्य पूर्ण । बोलताहे रघु- नंदन । येणें श्लोकें ॥ ८५ ॥ १६ ॥

अनात्मे जे देहादिक । अज्ञानें करोनिया देख । त्यांचेठायीं अवश्यक । आत्म- बुद्धि ॥ ८६ ॥ मी कर्ता इत्यादिरूप । जंव वर्तताहे समीप । तंव विधिवादें अमूप। जीं बोलिलीं कर्में ॥ ८७ ॥ त्यांचिया कर्तव्यते बाधक । यजन करो इत्यादिक । वि धिवाद जो अवश्यक । वेदोक्त असे ॥ ८८ ॥ कर्मकर्ता सर्वोत्कृष्ट । जो येथें अ- से वरिष्ठ । त्याचेंचि कर्म हें स्पष्ट । होत असे पैं ॥ ८९ ॥ तेंच गेलिया अज्ञान । मग जग हें संपूर्ण । नेति नेति इत्यादि वाक्यें करून । निषेधोनिया ॥ ९० ॥ ह्मा- णजे मिथ्यात्वें निर्णय । करोनिया निःसंशय । तद्विलक्षण जो होय । सत्यत्वें आ- त्मा ॥ ९१ ॥ त्या परमात्मस्वरूपातें जाणून । कर्म टाकावेंचि संपूर्ण । आणि नि-

यदा परात्मात्मविभेदभेदकं विज्ञानमात्मन्यवभाति भास्वरं ॥
तदैव माया प्रविलीयतेऽञ्जसा सकारका कारणमात्मसंसृतेः ॥ १८ ॥
श्रुतिप्रमाणाभिविनाशिता च सा कथं भविष्यत्यपि कार्यकारिणी ॥
विज्ञानमात्रादमलाद्द्वितीयतस्तस्मादविद्या न पुनर्भविष्यति ॥१९॥

---

गृहीत झालिया मन । योग तोही त्यजावा ॥ ९२ ॥ साधक. झालिया ब्रह्म पूर्ण सहज गळालें सर्व साधन । हेंचि केलें निरूपण । श्रीरामें स्वयें ॥ ९३ ॥ १७ ॥

झालिया आत्मविज्ञान । अवश्य अविद्या निवर्ते पूर्ण । हेंचि आतां निरूपण । करिजेतअसे ॥ ९४ ॥ शुद्ध झालिया अंतःकरण । परमात्मा जो ईशान । त्याचा आणि जीवाचा जाण । भेद जो असे ॥ ९५ ॥ माया आणि अंतःकरण । ऐसे हे उपाधी दोन । त्यांहींच दाविला संपूर्ण । जो जीवेशादि भेद ॥ ९६ ॥ तयाचें जें नाशक पूर्ण । प्रकाशशील देदीप्यमान । बोलिलें असे विज्ञान । तें होत असे जेव्हां ॥ ९७ ॥ इतरवृत्तींचें उपमर्दन । तत्पूर्वकाचि परिपूर्ण । ब्रह्माकार अखंड जाण । वृत्ति होय जेव्हां ॥ ९८॥ असंभावना विपरीत भावना । इत्यादि ज्या विविध कल्पना । त्यांचिया तिरस्कारें ज्ञाना । उदय होत असे पैं ॥ ९९ ॥ तेव्हांचि जन्मांतरप्रापक । कर्मसहित अवश्यक । अविद्यानाशेचि पैं देख । मायेसहित । ३००॥ जीवेश्वरां उपाधीभूत । माया अविद्या ज्या नेमस्त । त्यांचा नाशचि त्वरित । होत असे पैं ॥ १ ॥ अविद्या माया झालिया दूर । सहज नाशे हा संसार । कैसा ह्मणसी तरी प्रकार । ऐकें तोही ॥ २ ॥ जीवासि संसारालागुन । जी असे उपादान कारण । त्या मायेचें झालिया हनन । संसारनाश होय सहज ॥ ३ ॥ १८ ॥

बोलिल्याचि अर्थाप्रति । दृढ करावया निश्चिति । पुनरपि तो सीतापति । बोलताहे ॥ ४ ॥ तत्त्वमस्यादि श्रुतिरूप । जीं का प्रमाणें अमूप । तिहीं विचारें ज्ञानदीप । प्रज्वाळिला जो ॥ ५॥ तेणें जाळिलें जें अज्ञान । तें स्वकार्य संसारालागुन । द्यावयालागीं परतून । समर्थ होय काय ॥ ६ ॥ मुळिं तेंचि असावें । तरि स्वकार्य संपादावें। नाश पावेचि तयासवें । संसारही हा ॥ ७ ॥ जें मूळेंचि नाहीं तें कार्य संपादील कायि । यास्तव संसार पुनः कांहिं । तयासी नसे ॥ ८ ॥ पुनः त्याचा उद्भव । नाहींच गा सर्वथैव । हेंचि स्वमुखें राघव । अनुजासि बोले॥ ९ विज्ञानमात्र जें शुद्ध । अद्वितीय रहितभेद । ऐसा आत्मा जो प्रसिद्ध । प्रत्यग्ब्रह्म ॥ १० ॥ तयाचें जें अपरोक्षज्ञान । तद्रूप स्वयें होऊन । इतर सहकारियावाचून । जें निदिध्यासन केलें ॥ ११ ॥ त्याचिया परिपाकापासून । जें दृढतर जालें ज्ञान । तेणें जाळिलें अज्ञान । यास्तव पुनः ॥ १२ ॥ न होयाचि अज्ञान । यदर्थीं ऐका निदर्शन । रज्जूविषयीं जें अज्ञान । तें सर्पासि मूल । १३ तें रज्जुज्ञानेंकरून । निवर्तलिया सर्पत्व पूर्ण । तें पुनरपि उत्पन्न । न होय जैसें ॥ १४ ॥ तैसें आत्मज्ञानें अज्ञान । दग्ध जाहले जें संपूर्ण । तयाची उत्पत्ति परतून । न घडेचि कदा ॥ १५ ॥ १९ ॥

**यदि स्म नष्टा न पुनः प्रसूयते कर्ताहमस्येति मतिः कथं भवेत् ॥**
**तस्मात् स्वतंत्रा न किमप्यपेक्षते विद्या विमोक्षाय विभाति केवला॥२०॥**
**सा तैत्तिरीयश्रुतिराह सादरं न्यासं प्रशस्ताखिलकर्मणां स्फुटं ॥**
**एतावदित्याह च वाजिनां श्रुतिर्ज्ञानं विमोक्षाय न कर्म साधनं ॥२१॥**
**विद्या समत्स्वने तु दर्शितस्त्वया क्रतुर्न दृष्टांत उदाहृतः समः ॥**
**फलैः पृथक्त्वाद्वहुकारकैः क्रतुः संसाध्यते ज्ञानमतो विपर्ययम् ॥२२॥**

इतरनिरपेक्ष जें ज्ञान। तेंचि मोक्षासी कारण। याप्रकारें भाषण। जें पूर्वी केलें॥१६॥ तयातेंचि युक्तिपूर्वक। पुनः बोलताहे सम्यक। दृढतर व्हावया देख। श्रोतियां लागीं ॥ १७ ॥ तत्वज्ञानें नाशित। जरि अज्ञान जालें भस्मीभूत। तें पुनः उदय पावत। नसेचि कधीं ॥ १८ नाश झालिया कारणाप्रति। कैसी उद्भवेल अहंमति। पुनः ती कोणत्याही रिति। न उद्भवेचि ॥ १९ ॥ जेव्हां गळाला अहंभाव। ते-व्हांचि झाला कर्मा अभाव। तस्मात् मोक्षातें स्वयमेव। द्यावयाविषयीं ॥ २० ॥ स्वतंत्रचि असे ज्ञान। त्यासि इतराची अपेक्षा जाण। नाहींच गा परिपूर्ण। कवणे ही कालीं ॥ २१ ॥ कारण कीं दुजियाचा। असंभवचि असे साचा। ज्ञानोदयीं द्वैताचा। ठावाचि न उरे ॥ २२ ॥ यास्तव सहाय जो त्यावांचून। एकलेंचि केवल ज्ञान। मोक्ष द्यावयालागुन। अत्यंत शोभे ॥ २३ ॥ मोक्ष तंव ज्ञानाचें फळ। एक-चि असे केवल। त्याविण इतराचें बल। न चाले तेथें ॥ २४ ॥ २० ॥

याच अर्थाविषयीं। प्रमाण असे श्रुतीचेंही। ऐसें रघुवीर ते समयीं। बोलता झाला ॥ २५ ॥ न कर्मणा हे तैत्तिरीय श्रुती। प्रसिद्ध असे ज्ञातियांप्रति। कर्म-त्यागातें निश्चिती। बोधिताहे ॥ २६ ॥ मोक्ष न घडे कर्मेंकरून। न मिळे कालिया संतान। द्रव्य जोडुन केलिया दान। मोक्ष न मिळे ॥ २७ ॥ अथवा केलिया अ-न्नदान। किंवा इतरही साधन। मोक्ष न मिळे ज्ञानेंविण। कोणासाहि क-धीं ॥ २८ ॥ अर्थवाद जे त्यांहीं। प्रशस्तत्वें करोनिया पाहीं। बोधिलीं जीं स-र्वही। असती कर्में ॥ २९ ॥ त्या सर्वांच्याही त्यागाप्रति। स्पष्ट बोलताहे ही श्रु-ती। कर्म अथवा समुच्चय निश्चिती। टाकावे दोन्ही ॥ ३० ॥ ऐसीच वाजसनेय श्रुति। त्याग बोले कर्माप्रति। ज्ञानेंचि मोक्ष निश्चिति। नघडे कर्में ॥ ३१ ॥ त-स्मात् ज्ञानावांचून। कर्मादि इतर साधन। व्यर्थचि असे ऐसें जाण। मोक्षा वि-षयीं ॥ ३२ ॥ २१ ॥

अहंकारत्याग आणि स्वीकार। एवंरूप कारण जें साचार। तेणें वैषम्य घडल थोर। ज्ञानकर्मांसी ॥ ३३ ॥ यास्तव घेऊनिया ज्ञान। त्यागावेंचि कर्म संपूर्ण। या रिती वैषम्यालागुन। बोलोनिया ॥ ३४ ॥ फलप्रयुक्तही विषमपण। ज्ञानकर्मां-सी असे पूर्ण। तेंही आतां रघुनंदन। बोलताहे ॥ ३५ ॥ अगा लक्ष्मणा ऐक वच-न। तूं समुच्चय वाद स्वीकारुन। बोलिलासि जो दृष्टांत जाण। तो समान ना-हीं ॥ ३६ ॥ क्रतु अग्निष्टोमादिक। ज्ञान समानत्वें देख। दाविला तो निश्चयात्म-कसमदृष्टांत नोहे ॥ ३७ ॥ समान क्रतु आणि ज्ञान। वेद बोधितत्वास्तव पूर्ण। न-

सप्रज्ञायो ह्यहामित्यनात्मधीरज्ञप्रसिद्धा न तु तत्त्वदर्शिनः ॥
तस्माद्बुधैस्त्याज्यमपि क्रियात्मभिर्विधानतः कर्म विधिप्रकाशितं ।२३

सावचि अनुमान । दृष्टांताभावास्तव ॥ ३८ ॥ हेंचि आकरग्रंथीं सविस्तर । बोलिला आचार्य श्रीशंकर । श्रुतिस्मृतीचा पूर्ण विचार । करोनि स्वयें ॥ ३९ ॥ येथेंही शंका करून । बोलतसे सुमित्रानंदन । कीं कर्म आणि ज्ञान । समानचि दोन्हीं ॥ ४० ॥ मोक्षरूप फलाप्रति । दोन्हीही निश्चयें देति । परस्परें साह्य होति । चक्रदंडादिकां परि ॥ ४१ ॥ ऐसें कांहि ह्मणसी जरी । सांगतों ऐक तुजसी तरी । फलेंकरुनही निर्धारीं । भिन्नत्वचि दोघां ॥ ४२ ॥ स्वर्गफलातें कर्म देत । ज्ञानेंचि असे मोक्ष होत । हा भेद असे प्रशस्त । या कारणास्तव ॥ ४३ ॥ ऐसें असतां स्वरूपेंकरुन । असिद्धचि त्वदुक्त कारण । हा अभिप्राय संपूर्ण । जाणून घ्यावा ॥ ४४ ॥ समकारकत्वेंही समान । कर्म ज्ञान नाहींच जाण । हेंचि आतां सीतारमण । सांगताहे ॥ ४५ ॥ मुख्य क्रतुलागुन । बहुकारकें जीं असती पूर्ण । ऐक त्याचेंही लक्षण । शास्त्रप्रसिद्ध जें ॥ ४६ ॥ अहंताममतारूप अभिमान । ज्यांचें स्वरूप असे पूर्ण । हीं अंतरंग कारकें जाण । असती कामादिक ॥ ४७ ॥ जे देहकालादि नियम । हीं बाह्य कारकें परम । याहीं-सर्वी तो क्रतूत्तम । साधिजेताहे ॥ ४८ ॥ या सर्वांचा जालिया नाश । ज्ञान पावतसे उदयास । एवं कर्म आणि ज्ञानास । नसेचि साम्य ॥ ४९ ॥ तस्मात् समुच्चय आणि केवल । कर्म टाकावेंचि सकल । होवोनिया विचारशील । ज्ञाननिष्ठ व्हावें ॥ ३५० ॥ २२ ॥

पुनः ह्मणे सुमित्रातनय । कर्म न केलिया प्रत्यवाय । होईल जो त्याचें भय । धरोनिया स्वयें ॥ ५१ ॥ कर्म करावेंचि आपण । ऐसें ह्मणसी जरीं तूं जाण । तरी न करावेंचि निश्चयेंकरून । श्रीराम ह्मणे ॥ ५२ ॥ प्रत्यवाय जो बोलिला । तोही सांगतों ऐक तुजला । जयाचा निश्चय पूर्ण जाला । देहच मी आहें ॥ ५३ ॥ मी आहें ब्राह्मणादि वर्ण । कर्म म्यां हें करावेंचि पूर्ण । न केलिया प्रत्यवायी जाण । होईन च मी ॥ ५४ ॥ ऐसी जे देहात्मबुद्धि । ती अज्ञानियासी च त्रिशुद्धि । कारण कीं तत्वज्ञान कधीं । न देखिलेंचि तेणें ॥ ५५ ॥ तत्वज्ञानियाच्या ठायिं । ऐसी बुद्धि कदापि नाहिं । यास्तव तो प्रत्यवायही । न घडे त्यासी ॥ ५६ ॥ यास्तव पापादिकासी । अनात्मधर्मता निश्चयेंशीं । असे वास्तवप्रसिद्धि अज्ञांसि । जाणोन घ्यावी ॥ ५७ ॥ शुद्धात्मस्वरूपाचे ठायीं । या द्वैताची वार्ता नाहीं । ते या स्वरूपाचे अंगें पाहें । तत्वज्ञ जाला ॥ ५८ ॥ तस्मात् बुध जे त्यांहि । कर्म टाकावेंचि सर्वथाहि । आतां कर्मफलाचे ठायिं । चित्त संसक्त ज्यांचें ॥ ५९ ॥ त्यांसी विधानेंकरुन । प्रकाशित हें कर्म जें पूर्ण । त्याच्या विधानाचेंही लक्षण । बोलिजेताहे ॥ ६० ॥ वेदें अधिकार पाहून । ये रिति करावें येणें पूर्ण । ऐशा कर्तव्यते करून । युक्त कर्म जें वर्ते ॥ ६१ ॥ हा विधी जो येण । अवश्य कर्तव्यतेकरुन । बोधितही कर्म पूर्ण । टाकावेंचि पैं ॥ ६२ ॥ प्राप्त जालिया पूर्ण विरक्ति । कर्म टाकावेंचि सुनिश्चिति । कारण कीं त्याचें पुढती । प्रयोजनचि नाहिं ॥ ६३ ॥ २३

श्रद्धान्वितस्तत्त्वमसीति वाक्यतो गुरोः सकाशादपि शुद्धमानसः ॥
विज्ञायचैकात्म्यमथात्मजीवयोः सुखी भवेन्मेरुरिवाप्रकंपनः ॥ २४ ॥
आदौपदार्थावगतिर्हि कारणं वाक्यार्थविज्ञानविधौ विधानतः ॥
तत्त्वंपदार्थौ परमात्मजीवकावसीति चैकात्म्यमथानयोर्भवेत् ॥ २५ ॥

---

आतां विरक्त जो तयासी । जें योग्य असे करावयासी । त्यातेंचि श्रीराम लक्ष्मणासी । स्वमुखें बोलताहे ॥ ६४ ॥ गुरु आणि शास्त्राचेठायीं । जो पूर्ण विश्वास असें पाहीं । तोचि जाणावा सर्वथाहि । श्रद्धारूपें ॥ ६५ ॥ ऐसिया श्रद्धेकरून । जो युक्त जालासे परिपूर्ण । आणि जाणावयालागुन । आत्मयातें ॥ ६६॥ जो तळमळी अनुदिन । जैसा मत्स्य जीवनेंविण । बुभुत्सु हें अभिधान । तयासीच असे ॥ ६७ ॥ निष्काम कर्माचें अनुष्ठान । करोनि केलें शुद्ध मन । ऐसा चतुःसाधनसंपन्न । होवोनिया स्वयें ॥ ६८ सद्गुरुप्रसादें करुन । तत्त्वमसि या वाक्याचा पूर्ण । विचार बरवा जाणुन । घेतला जेणें ॥ ६९ । तेणें विचारें आपण । जीव परमात्मा हे दोन । यांचें ऐक्य परिपूर्ण । जाणोनिया ॥ ७० ॥ मनन आणि निदिध्यासन । हें आचरावें साधन । यांच्या परिपाकेंकरुन । साक्षात्कारसिद्धि ॥ ७१ ॥ ऐसा स्वयेंचि प्रत्यग्ब्रह्म । होवोनिया आत्माराम । सकळदुःखातीत परम । होवोचि तो ॥ ७२ ॥ जैसा का मेरु पर्वत । सदा निश्चल असे स्वस्थ । तैसा निजरूपीं निश्चित । निश्चळ राहो ॥ ७३ ॥ विषयाभिलाषें करून । जैयाचें कदा अंतःकरण । क्षोभातें परतून । न पावेचि पुनः ॥ ७४ ॥ यारिति जो निश्चल स्वस्थ । अंगें जाला जीवन्मुक्त । तयासी कर्तव्य किञ्चित । उरलेंचि नाहीं ॥ ७५ ॥ २४ ॥

महावाक्य जें तयाप्रती । विवरण करावया यथार्थरीति । वाक्यार्थाचे जे निश्चिति । आहेत पदार्थ ॥ ७६ ॥ त्या पदार्थाचें जें ज्ञान । तत्पूर्वकत्व असे पूर्ण । त्यातेंचि आतां स्पष्ट करून । बोलताहे ॥ ७७ ॥ पदार्थज्ञानावांचून । नवडे वाक्यार्थ विवरण । यास्तव विचारार्थ तेंचि पूर्ण । साधावें आधीं ॥ ७८ ॥ भ्रमप्रमादराहित्यें करुन । वाक्यार्थाचें जें विज्ञान । त्याची उत्पत्ति निःसंशय पूर्ण । व्हावयाविषयीं ॥ ७९ ॥ मुख्यत्वें प्रथम तीप्रती । पदार्थाची अवगति । कारण असे ती सुनिश्चिति । प्रसिद्ध जाणा ॥ ८० ॥ त्या वाक्याचीं पदें तीन । 'तत् त्वं असि' ऐसीं जाण । त्यांमाजी तत्पदार्थ पूर्ण । परमात्मा ईश्वर ॥ ८१ ॥ जो सर्वज्ञ सर्वशक्ति । षड्गुणैश्वर्यसंपत्ति । ज्याची असे तोचि त्रिजगतीं । कर्ता भोक्ता ॥ ८२ ॥ त्वंपदार्थ जीव किंचिज्ज्ञ । तत्पदार्थ ईश सर्वज्ञ । त्या दोघांचें जें ऐक्य पूर्ण असिपद तेंचि जाणिजे ॥ ८३ ॥ हें ऐकोनी लक्ष्मण । श्रीरामासी बोले वचन । रामा जो सर्वज्ञत्वादिगुण । ईश्वर असे ॥ ८४ ॥ आणि जीव तो असे किंचिज्ज्ञ । अविद्याग्रस्त पराधीन । ऐक्य यां दोघां लागून । विरुद्ध दिसे ॥ ८५ ॥ ऐसें ऐकून शंकावचन । संतोषोनिया रघुनंदन । बोलता जाला स्वयें आपण । अनुजाप्रति ॥ ८६ ॥ २५ ॥

प्रत्यक्त्वपरोक्षादिविरोधमात्मनोर्विहाय संगृह्य तयोश्चिदात्मतां ॥
संशोधितां लक्षणया च लक्षितां ज्ञात्वा स्वमात्मानमथाद्वयो भवेत् ॥२६॥
एकात्मकत्वाज्जहती न संभवेत्तथा जहल्लक्षणता विरोधतः ॥

प्रत्यक्त्व हा जीवधर्म जाण । परोक्षत्व तो ईशधर्म पूर्ण । हे विरुद्ध जे धर्म-दोन । यांहि जो केला ॥ ८६ ॥ तोचि जीव परमात्मा यांसी । विरोध असे निश्चयेंसीं । त्यजोनिया यत्नें त्यासी । विचारयोगें ॥ ८७ ॥ सच्छास्त्रासी अनुसरून । तर्क जो करणें पूर्ण । तो युक्तिशब्दें करून । बोलिजेताहे ॥ ८७ ॥ त्या युक्तीनें विचारित । जी असे परम शोधित । आणि असे जी लक्षित । लक्षणा योगें ॥८८॥ त्या लक्षणेचें लक्षण । अग्रश्लोकीं असे जाण । तिच्या योगें चिदात्मता पूर्ण । घेऊनिया बरी ॥ ८९ ॥ सहज जी एकात्मता । ती अंगीकारावी सर्वथा । ह्मणजे प्रत्यग्ब्रह्म तत्वता । स्वयंचि व्हावें ॥ ९० ॥ या एकात्मज्ञानानंतर । अद्वय व्हावें चि साचार । पावे जैसा का इतर । चिद्रूपतेप्रति ॥ ९१ ॥ पूर्वींही तेंच आपण । असतांही परिपूर्ण । जैसें विस्मृत सुवर्ण । कंठगत असे ॥ ९२ ॥ तेणेंचि न्यायेंकरून । विसरला आपणा आपण । तेणें स्वप्राप्ति साधून । या रिती घ्यावी ॥ ९३ ॥ आतां प्रत्यक्त्व तें काय । परोक्षत्व कोणतें होय । तोहि आतां अभिप्राय । बोलिजेताहे ॥ ९४ ॥ तत्पदाचे अर्थ दोन । वाच्य आणि लक्ष्य जाण । त्यांमाजि मायोपाधि सर्वज्ञ । ईश्वर वाच्यांश ॥ ९५ ॥ मायेपासून तृणपर्यंत । जो उपाधी करोनि युक्त । जो नियंता अंतर्भूत । असे अलिप्तपणें ॥ ९६ ॥ तैसाच त्वंपदवाच्यांशहीं । सांगिजेल ऐक तोहि । किंचिज्ज्ञत्वादि गुणें पाहिं । जो युक्त सदा ॥ ९७॥ मायाकार्य जें अज्ञान । तद्युक्त जें अंतःकरण । तोचि उपाधि जया कारण । वर्त असे ॥ ९८ ॥ प्रत्यक्त्व आणि परोक्षपण । हेंच जाणावें वाच्यांश दोन । यां दोहींतेंही त्यजून । लक्ष्यांश जे उरति ॥ ९९ ॥त्या लक्ष्यांशाचें एकपण । मुळींच असे नलगे करण । तें प्रत्यग्ब्रह्माचि आपण । निर्बाध व्हावें ॥ ४०० ॥ दोन्हींही वाच्यांसी । भेद असे परस्परेंसी ।ऐक्य न संभवेचि त्यांसी।विरुद्ध धर्मास्तव ॥ १ ॥ परि दोहीं लक्ष्यांशांलागुन । ऐक्य असोचि परिपूर्ण । तेथें बाध कल्पील कोण । विरुद्धतेचा ॥२ ॥ टाकोनि व्यष्टिसमष्टींप्रति । जें उरे चिदानंदमूर्ति । तेंच आपण स्वयं ज्योति । अंगें व्हावें ॥ ३ ॥२६॥

उक्तलक्षणास्वरूपाप्रती । बोलताहे तो रघुपति। मुख्य लक्षणा निश्चिति । जाणिजे तीन॥ ४॥जहल्लक्षण अजहल्लक्षण ।तीसरें जहदजहल्लक्षण ।त्यांत पूर्वलक्षणें दोन । न घडती येथें ॥ ५ ॥ प्रथम जहल्लक्षण । त्याचें स्वरूप हेंचि जाण। गंगेमाजी - विराजमान। गोपग्राम आहे ॥ ६ ॥ तेथें गंगापदाचा अर्थ। प्रवाहाचि असे होत । यास्तव टाकोनि प्रवाहाप्रत । तीरीं घडे लक्षणा ॥ ७ गंगातीर जें त्याचे ठायिं । गोपग्राम तो असे पाहीं । ऐसी जहल्लक्षणा ही ।न घडे येथें ॥ ८ ॥ प्रवाहासी ग्रामाधारता । कदा न घडे गा सर्वथा । यास्तव प्रवाह सारोनि परता । तीरीं लक्षणा करावी ॥९ ॥ विशेष्यांश प्रत्यग्ब्रह्मासी । एकत्व असे निश्चयेंसीं । यास्तव येथें

**सोयं पदार्थाविव भागलक्षणा युज्येत तत्वंपदयोरदोषत : । २७।**
**रसादिपंचीकृतभूतसंभवं भोगालयं दुःखसुखादिकर्मणां ॥**

त्यागासी । संभवाचि नाहीं ॥ १० ॥ यास्तव उपयोगी येथें जहल्लक्षणा । नसेचि आतां दुजी अजहल्लक्षणा । ऐका करावें दधिसंरक्षणा । वचन जें हें ॥ ११ ॥ येथें स्वपदार्थातें रक्षून । जें अन्य पदार्थाचें ग्रहण । हेंचि अजहल्लक्षण । वोळखावें ॥ १२ ॥ ह्मणजे काक जो त्यापासून । करावें दधिसंरक्षण । ही लक्षणा होतसे पूर्ण । उपघातक काकादिकीं ॥ १३ ॥ तिचा ही येथें उपाय नाहींच गा निःसंशय । येथें स्वार्थ रक्षून दुजें काय । करावें ग्रहण ॥ १४ ॥ पाहातां येथें वस्तुविच्यार । विशेषणांश जे जीवेश्वर । यांचा त्यागाचि सपरिवार । मिथ्यात्वें होय ॥१५ ॥ उरलें जें प्रत्यग्ब्रह्म एक । तेथें घेतां नये दुजें आणिक । यास्तव हेही लक्षणा देख । न घडे येथें ॥१६ ॥ जरी करावा अंगीकार । तरि विरोध होतसे थोर । यास्तव तिसरेंचि साचार । अंगिकारावें ॥१७ ॥ विशेषणांशत्यागेंकरून । विशेष्यांशसंरक्षण । हें जहदजहल्लक्षण । उपयोगी येथें ॥१८ ॥ यास्तव तिचा अंगिकार । करोनि त्यजाव्या इतर । येथें निर्दोषत्व असे साचार - ययालागीं ॥१९ ॥ विशेषणांश जे जीवेश्वर । त्यांतें मिथ्यात्वें करोनि दूर । विशेष्य प्रत्यग्ब्रह्म साचार । स्वीकार करणें ॥२० ॥ हे जहदजहल्लक्षण । अंगिकाराचें यथार्थ पूर्ण । येविषयीं सांगेन । दृष्टांत तो ऐक ॥ २१ ॥ कोणी एक काशींत देखिला । तोचि अन्य स्थळीं अवलोकिला । तेथिल येथील समयही जाला । वेगळाचि पैं ॥२२॥ तो देश काळ टाकून । हाही देश काळ पूर्ण । टाकोनिया पुरुषाचि जाण । घेईजे जैसा ॥२३ ॥ तैसे दोपदींचें वाच्य टाकून । घेईजे प्रत्यग्ब्रम्ह पूर्ण । कारण कीं जीवेश्वरां लागुन । विरुद्ध विशेषण असे ॥२४ ॥ यास्तव ऐक्य दोघांसी । न संभवें निश्चयेसी । ह्मणून देशादि विशेषणांसी । त्यागाचि जाला ॥ २५ ॥ येणें पुरुषाचें ग्रहण । होय जैसें निःसंशयजाण ।तैसेंच लक्षणायोगें करुन । एकत्व घ्यावें ॥ २६ ॥ येथें इतर मिथ्यात्वें दूर जाले । एक सच्चिदानंदत्व उरलें । तेंच होऊन राहिलें । पाहिजे स्वयें ॥२७ ॥ २७ ॥

आतां त्याज्यत्वाकारणें । जीवोपाधीतें जाण । बोलताहे रघुनंदन । तेंचि ऐकावें ॥ २८ ॥ पृथिव्यादि पंचीकृत । महाभूतें जीं समस्त । त्यांपासून उद्भव होत । असे ज्याचा ॥ २९ ॥ भूतपंचीकरणावीण । स्थूळ नोहेचि निर्माण । यास्तव भूतपंचीकरण । ईश्वरें केलें ॥ ३० ॥ तेंचि आतां पंचीकरण । ऐक ताता तुज सांगेन । एक एक भूतातें जाण । करावें द्विधा ॥ ३१ ॥ त्यांमाजि ज्यांचें अर्द्ध त्यासी । देऊनिया निश्चयेंसी । उर्वरित अर्ध अर्ध भागासी । चतुर्धा किजे ॥ ३२ ॥ एक एक चौघांप्रति । भाग देऊनि यथार्थ रीती । एक एक भूत निश्चिती । पंचात्मक होय ॥ ३३ ॥ स्वकीय भाग संरक्षून । इतर चौघांचे च्यार भाग जाण । घेतां भागाधिक्य तेणें करून । पांचांसही झालें ॥ ३४ ॥ यास्तव भूम्यादिकांचा । व्यवहार होतसे साचा । आणि उद्भव शरीराचा । यांपासूनिच होय ॥ ३५ ॥

शरीरमाद्यं स्वकादिकर्मजं मायामयं स्थूलमुपाधिमात्मनः ॥ २८ ॥

पूर्वी सुखदुःखदायक । कर्मे जों केलां अशेख । तेणें झाला जो अनुभव दुख । सुख-दुःखांचा ॥ ३६ ॥ तयासी हा देह आश्रय भूत । असे उत्पत्तिनाशवंत । आणि पूर्वी जो निश्चित । कर्म केलें ॥ ३७ ॥ तेणेंचि याचा उद्भव होय । आणि असे हा मायामय । कारण कीं परंपराकार्य । मायेचेंच हा ॥ ३८ ॥ ऐसिया या शरीराप्रति । स्थूल उपाधि ऐसिया रिती । जीवात्म्यालागीं ह्मणती । महानुभाव योगी ॥ ३९ ॥ बोलिलें जें पंचीकरण । तेंच आतां विस्तृत करून । सांगतों करा श्रवण । स्वस्थ चित्तें ॥४०॥ किती भूतें कवण कवण । अर्ध भागही कोणते पूर्ण । आणि च्यार च्यार भागांचें अर्पण । आहे कैसें ॥ ४१ ॥ त्या सर्वांसी अभिधान । झालें असे कोण कोण । तें सर्व विस्तारें करुन । दाविजताहे ॥ ४२ ॥ निर्विकार वस्तूपासुन । सोहं ऐसें जें झालें स्फुरण । तोचि ओंकार सर्वेश्वर पूर्ण । नाना अवतारधारी ॥ ४३ ॥ चित्प्रतिबिंबातें घेऊन । उदय पावलें स्फुरण । स्फुरण तें प्रकृति जाण ।चित्प्रतिबिंब सर्वेश्वर ॥४४॥ दोन्हीं एकरूप असती। भिन्न कदापि न होती । शब्दार्थापरी संगती । दोघांसी असे ॥ ४५ ॥ तो सर्वेश्वर निमित्त कारण । आणि प्रकृति उपादान । नामरूपात्मक जग संपूर्ण । तीच झाली ॥ ४६ माया अविद्यारूपें करून । द्विधा झाली तीच आपण । मायोपाधि ईश्वर पूर्ण । जीव अविद्योपाधि ॥ ४७ ॥ तीच अविद्या बोलिजे व्यष्टि । माया तेचि जाणा समष्टि । दोन्हीं मिळून प्रकृतिरूप सृष्टी । पावे मूळ शब्द ॥ ४८ ॥ तयां पोटीं तीन गुण । राहती भूतांसहवर्तमान । अविद्या देह कारण । व्यष्टीमाजी ॥ ४९ ॥ देहद्वयासी कारण । यास्तव तीस कारणाभिधान । समष्टींत मायाच हे जाण । कारण देह ॥ ५० ॥ अविद्या मलिनसत्वप्रधान । शुद्धसत्वप्रधान माया जाण । या दोहींसीही कारण । तमःप्रधान प्रकृति ॥ ५१ ॥ तीपासून सूक्ष्म स्थूल । महाभूतें उपजती सकल । प्रथम सूक्ष्माचि केवल । जीं असती भूतें ॥ ५२ ॥ शब्द स्पर्श रूप रस गंध । हींच सूक्ष्म भूतें शुद्ध । हेचि झाले असती प्रसिद्ध । स्थूळ पंचमहाभूतें ॥ ५३ ॥ देहद्वयाची रचना । द्विविधभूतीं होतसे जाणा । सूक्ष्म भूतें करूनि नाना । सूक्ष्म देह होती ॥ ५४ ॥ त्या सूक्ष्म देहाचा प्रकार। पुढें बोलुं सविस्तर । आतां स्थूल जें शरीर । तदुत्पत्तीविषयीं ॥ ५५ ॥ बोलेलें जें पंचीकरण । तेंच ऐका निश्चळमन । आकाशाचा अर्ध भाग पूर्ण । अंतःकरण असे ॥ ५६ ॥ द्वितीय भागाचे जे भाग च्यार । ऐका त्यांचा नामोच्चार । व्यान श्रोत्र वाणी साचार । शब्द चौथा ॥ ५७ ॥ नभिं राहिलें अंतःकरण । समीरीं मिळता झाला व्यान । श्रोत्र तें तेजालागून । मिळतें झालें ॥ ५८ ॥ वाचा मिळाली अपासी । शब्द मिळाला त्या भूमीसी । एवं पंचधा नभासी । मिळणी झाली ॥५९॥ वायूचा अर्धभाग समान । तो स्वस्थानींच राहिला पूर्ण । इतर अर्धाचे असती जाण। च्यार भाग जे ॥ ६० ॥ मन त्वचा आणि पाणी । चौथा स्पर्श घ्या वोळखूनि । मन मिळतें जालें गगनीं । त्वचा तेजीं ॥ ६१ ॥ पाणि मिळे अपाचे ठायीं । स्पर्श

सूक्ष्मं मनोबुद्धिदशेंद्रियैर्युतं प्राणैरपंचीकृतभूतसंभवं ॥
भोक्तुः सुखादेरनुसाधनं भवेच्छरीरमन्यद्विदुरात्मनो बुधा ः । २९
अनाद्यनिर्वाच्यमपीह कारणं मायाप्रधानं तु परं शरीरकं ॥

पृथ्वीमाजि पाहिं । यारिती समीरही । मिळता जाला ॥ ६२ ॥ आतां चक्षू तेज्याचा अर्धभाग । तो तेथेंचि राहिला सांग । उरल्या भागाचे विभाग । च्यार ते ऐक । ६३ व्योमिं असे बुद्धि राहत । उदान मिळे समीरा आंत । पाद मिळे जलाप्रत । पृथ्वीसी रूप मिळे ॥ ६४ ॥ अपाचा अर्धभाग शिश्न । तो स्वस्थळीं राहे आपण । इतर अर्धाचे भाग जे जाण । असती च्यार ॥ ६५ ॥ व्योमामाजी मिळे चित्त । प्राण वायुमाजी राहत । जिव्हा तेजीं वास करीत । रस तो भूमिमाजी ॥ ६६ ॥ पृथ्वीचा अर्धभाग गंध । तो तेथेंचि राहे प्रसिद्ध । इतर अर्धाचे भाग जे शुद्ध । असती च्यार ॥ ६७ ॥ अहंकार मिळे गगनीं । अपान राहे प्रभंजनीं । घ्राण ते तेजस्थानीं । करितसे वास ॥ ६८ ॥ गुद तसें जळीं राहतें । या परि पंच महाभूतें परस्परें मिळती समस्तें । पंचीकरण हेंचि ॥ ६९ ॥ परस्परें जी भूतां मिळणी कर्दम बोलिजे तिजलागुनि । पिंडब्रह्मांडा उभवणी । येथूनचि होय ॥ ७० ॥ या पंचीकृत भूतां पासून । देह जाला जो निर्माण । तो जीवात्मया लागुन । उपाधि स्थूल ॥ ७१ ॥ आतां सूक्ष्म उपाधीप्रती ॥ बोलताहे श्रीरघुपती ॥ जाला असे जो निश्चिति ॥ अपंचीकृतें ॥ ७२ ॥ २८ ॥

स्थूल देहाहून विलक्षण । सूक्ष्म देह असे जाण । त्यालें आत्मयासि सज्ञान सूक्ष्म उपाधि म्हणती ॥ ७३ ॥ त्याचें स्वरूप ह्मणसी कोण । ऐक सांगतों तुज कारण । जें सप्तदशतत्वें करून । उत्पन्न जालें ॥ ७४ ॥ पंच भूतांचे सत्व गुण एकत्र होता अंतःकरण । उत्पन्न होतसे तेथून । द्विविध वृत्ति । ७५ । संकल्प विकल्पात्मक मन । निश्चयात्मक बुद्धि जाण । श्रोत्र त्वचा चक्षु रसन । घ्राण हीं ज्ञानेंद्रियें । ७६ । भिन्न भिन्न भूततत्वेंकरून । जीं जालीं स्वयें निर्माण । तैसेच प्राण कर्मेंद्रियगण । भूतरजें होतीं । ७७ । व्यान समान उदान । प्राण आणि अपान । हे जाणावे पंच प्राण । याच प्रकारें ॥ ७८ ॥ वाचा पाणी पाद शिश्न । गुद हा कर्मेंद्रियगण । एवं सप्तदश तत्वें करून । युक्त जो असे । ७९ । अपंचीकृतभूतोद्भूत । असे यास्तव अदृश्य होत । लिंग देह ही निश्चित । बोलिजे हाचि । ८० । भोक्ता जीव जो त्यालागुन । जो सुखदुःखाचा अनुभव पूर्ण । तयाचें असे साधन । स्वयें हाचि । ८१ । येणेंचि युक्त स्थूल शरीर । जालिया भोगाचें समग्र । साधन होतसे साचार । बोलती ज्ञाते ॥ ८२ ॥ याचा वियोग स्थूळ देहासी । जालिया मरण होतसे त्यासी । नाश जालिया यासी । जीव परब्रह्म ॥ ८३ ॥ २९ ॥

या रिति जीवोपाधि जे दोन । त्यांतें बोलोनिया पूर्ण । ईशोपाधीतें आपण बोलताहे ॥ ८४ ॥ जें स्वयें असे उत्पत्तिरहित । नानाविध परिणामें शोभत । परिणामरूपेंचि निश्चित । नश्वर असे ॥ ८५ ॥ सत असत सदसत । अथवा इत्यादि

॥ उपाधिभेदात्तु यतः पृथक्स्थितं स्वात्मानयात्मन्यवधारयेत् क्रमात्॥ ३०॥
॥ कोशेषु पंचस्वपि तत्तदाकृतिर्विभाति संगात्स्फटिकोपलो यथा ॥

विरहित । ऐसें बोलावया निश्चित । अशक्य जें असे ॥ ८६॥ अनिर्वचनीयत्वें क-रून । मिथ्या असे हें स्पष्ट पूर्ण। ऐसा हा देह कारण । अज्ञानाचि जाणा॥ ८७॥ मायेचेंही स्वरूप लक्षण । ऐसेंच असे ध्या जाणून । तीच असे देह कारण । समष्टीमाजी । ८८ । सकल प्रपंचाचें जनक । हें अज्ञानचि असे एक । ईश्वरासि संबंध देख । नाहींच याचा ॥ ८९ ॥ शुद्ध चैतन्य दोन्हीं ठायीं । अस्पष्टाचि असे सर्वथाहि । यास्तव ईशाचि असे तोहि । प्राज्ञनामा ॥ ९० ॥ ईश्वरास व्यवहार । संपादक असे हें साचार । यास्तव यातें बोलिजे पर । उत्कृष्ट ऐसें ।९१ । उपाधि-भेदें ऐसिया रिति । एक चैतन्यचि निश्चिति । राहिलें असे सर्वांप्रति । अदृश्य-पणें । ९२। स्वयें वेगळेंच राहून । जीवेश ऐशा नामें करून । भेदबुद्धीचा विषय पूर्ण । होतें जालें ॥ ९३ ॥ यास्तव लक्षणायोगें जाण । उपाधिपरित्यागें करून प्रत्यग्ब्रह्म आहें आपण । ऐसें अभेदें जाणावें ॥ ९४ ॥ श्रवण मनन निदिध्या-सन । अनुक्रमें हीं साधनें तीन । साधोनिया परिपूर्ण । परब्रह्म व्हावें ॥९५ ॥३०॥

आतां वाक्यविचाराचें फल । बोलतां ऐकावें सकल । आनंदमय जो केवळ । प्रथम कोश ॥ ९६ ॥ तो ब्रह्मानंदाचा भोक्ता । आणि ब्रह्मानंदासी भोग्यता । असे हें जाणावें सर्वथा । यथार्थचि पैं । ९७ ॥ विज्ञानमयादि कोश च्यार । जे अ-सती पैं साचार । मनोमय प्राणमय परिकर । अन्नमय चौथा । ९८ । या च्यार को-शांचे ठायीं । तत्तत्संगास्तवचि पाहीं । तत्तदाकृति सर्वथाहि । भासत असे । ९९ । आतां पंच कोशांचें लक्षण । सांगतों ऐका स्वस्थमन । जो अन्नरसें निर्माण । स्थूळ देह झाला ॥१०० तोचि अन्नमय कोश निश्चिति । आणि पंच प्राण जे बोलिजाती कर्मेंद्रियपंचक त्याच रिति । प्राणमय कोश ॥ १ ॥ ज्ञानेंद्रियांसहित मन । मनोमया-ची वाळखण । त्याच ज्ञानेंद्रियांसहित बुद्धि पूर्ण । विज्ञानमय कोश ॥ २ ॥ उरलें जें अंतःकरण । तोचि आनंदमय तूं जाण । येथें आत्मा प्रवेशतां पूर्ण । तत्त-दाकार भासे ॥ ३ ॥ जया कुसुमादिसंगेंकरून । नानाकार जैसा स्फटिक पाषा-ण । तैसा आत्मा कोशसंगें जाण । तदाकार भासे ॥ ४ ॥ आनंदमयासि ही जीवपण । जें बोलती वादी जन । तेथें तर्णेशीं सह वर्तमान । पांचही कोशांमाजि ॥ ५ ॥ तदाकाराचि होऊन । जीवात्मा राहे आपण । ऐसें हें ध्यावें जाणुन । साधक जनीं ॥ ६ ॥ हें महावाक्य पैं तत्वतां । उत्तम प्रकारें विचारिलें असतां । असंगरूपाचे सर्वथा । असे हा आत्मा ॥ ७ ॥ जो असंग असे निश्चित । तो कोठेंही नव्हे संसक्त । ऐसेंचि श्रुतीही बोलत । आत्मयालागीं ॥ ८ ॥ अवस्था-त्रय जें तयासी । व्यभिचार असे निश्चयेशीं । भेटि पाहतां परस्परासी । कदापि नाहीं ॥ ९ ॥ पंचकोशसंगरहित । अज अव्यय ज्या नसे द्वैत । परि अज्ञानाचा सिद्धांत । देहचि हा मी असें ॥ १० ॥ त्या त्या कोशसंगेंकरून । तैसीच प्रतीति त्यांलागुन । होत असे परिपूर्ण । स्फटिकाचे परि ॥ ११ । तत्ववेत्याची प्रतीति ।

॥ असंगरूपोऽयमजो यतोद्वयो विज्ञायतेस्मिन् परितो विचारिते ॥ ३१ ॥
॥ बुद्धेस्त्रिधावृत्तिरपीह दृश्यते स्वप्नादिभेदेन गुणत्रयात्मनः ॥
॥ अन्योन्यतोस्मिन् व्यभिचारतो मृषा नित्ये परे ब्रह्मणि केवले शिवे।३२॥
॥ देहेंद्रियप्राणमनश्चिदात्मनां संघादजस्रं परिवर्तते धियः ॥
॥ वृत्तिस्तमोमूलतयाज्ञलक्षणा यावद्भवेत्तावदसौ भवोद्भवः ॥ ३३ ॥

कदा न घडे तैसिया रीति । तो दुजें न देखे विजगति । आत्मया विना ॥ १२ ॥ एवं तत्तदुपाधिकृत । जे तत्तद्रूपता प्रतीत । तिचा निरासाचि निश्चित । विचार-फल हें ॥ १३ ॥ ३१ ॥

जागृदाद्यवस्थात्रयही । बुद्धिधर्मचि असें पाहीं । आत्मधर्म कदापिही । नाहीं-च तें ॥ १४ ॥ जागृति स्वप्न सुषुप्ति जाण । या त्रिविध भेदें करून । त्रिधा वृत्ति अवलोकन । करिजेताहे ॥ १५ ॥ तीही बुद्धीसाचि असे जाण । कारणकीं बुद्धिधर्म हा पूर्ण । कदापि आत्मया लागुन । नसे संबंध तिचा ॥ १६ ॥ सत्वर-जतमोरूप । गुणत्रय जिचें स्वरूप । यास्तव त्रिधा आपेंआप॥ तीच होते॥ १७ ॥ उक्त जें अवस्थात्रय । त्यासि बुद्धीच मूळ होय । यास्तव हें स्थानत्रय । तयेसीच असे ॥ १८ ॥ या अवस्थात्रयाचा वास । येथें असे जो सावकाश । व्यभिचारा-स्तव । निःशेष । मिथ्याचि तो ॥ १९ ॥ बुद्धिधर्माच्या आरोपास्तव। आत्मत्वीं दि-से हा भाव । परि कदापि वास्तव । नसेचि तो ॥ २० ॥ अन्योन्यव्यभिचारें करून । अवस्थात्रयालागुन। स्वरूपें मिथ्यात्व जाण। असे यास्तव ।२१। त्यांचिया प्र त्यालागुन । मिथ्यात्वाचि असे पूर्ण । कारण कीं जागृति स्वप्न । सुषुप्तीं नाहीं॥२२॥ सुषुप्ति आणि जागृति । दोन्हीहि स्वप्नीं नसाति । जागृतिमाजी स्वप्न सुषुप्ति । नाहीं ताचि दोन्हीं । २३ । हा परस्परें व्यभिचार। जाणोनि ध्यावा पैं साचार । आत्म-यालागीं आधार । नाहींच त्यांचा ॥ २४ ॥ हेंच विशेषणें करून । बोलताहे-रघुनंदन । जो गुणत्रयविहीन । असे आत्मा । २५ । जो उत्पत्तिनाशरहित । केवल व्यापक शाश्वत । असंग आनंद सदोदित । ब्रह्म परिपूर्ण ॥ २६ ॥ ऐशा सदे-करसाचे ठायीं । तो व्यभिच्यारी धर्म कदा नाहीं । कारण कीं त्यास कदापि ही। सत्यत्व नसे ॥ २७ ॥ ३२ ॥

आतां टीकावंया लागुन । संसारासी मूलकारण । वृत्ति असे तीतेंच पूर्ण । बो-लताहे ॥ २८ ॥ देह इंद्रियें प्राण मन । आणि चिदात्मा जो आपण । यांचा स-मुदाय हा संपूर्ण । एकत्र झाला ॥ २९ ॥ अध्यास यांचा परस्पर । होत असे निरंतर । यास्तव जोंकाल साचार । हा वर्तत असे ॥ ३० ॥ आणि जोंकाल ही बुद्धिवृत्ति । तमोमूलत्वें सुनिश्चिति । अज्ञत्व जें तयाप्रति । जाणवीतसे ॥ ३१ ॥ संसारोद्भव तावत्काल । होताचि असे पैं केवल। सारांश कीं रजस्तमःशलि। मुख्य जी बुद्धि ॥ ३२ ॥ तीचं संसारासी कारण । असे यास्तव तिजलागून । टाकावें सवप्रकारें करून । निश्चयरूप ३३ ॥ महावाक्याचा विचार । जेणें केला दृढत-र । तयाचें कर्तव्य साचार । बोलतों आतां ॥ ३४ ॥ ३३ ॥

॥ नेति प्रमाणेन निराकृताखिलो हृदा समास्वादितचिद्घनामृतः ॥
॥ त्यजेदशेषं जगदात्तसद्रसं पीत्वा यथांभः प्रजहाति तत्फलं ॥ ३४ ॥
॥ कदाचिदात्मा न मृतो न जायते न क्षीयते नापि विवर्धते नवः ॥

नेति नेति प्रमाणें करून । जें टाकिलें जग संपूर्ण । ह्मणजे मिथ्यात्वेंचि ग्रहण केलें असे जेणें ॥ ३५ ॥ या उपरि सत्वप्रधान । मन जें असे तेणें करून । जेणें केलें आहे सेवन । उत्तम प्रकारें ॥ ३६ ॥ चैतन्यलक्षण घनामृत । जेथें दुःखलेश असे किंचित । ऐसें सुख सदोदित । सेविलें जेणें ॥ ३७ ॥ स्वर्गादि सुखाचे ठायीं । परिणामीं दुःख असे पाहीं । यास्तव सुख तें सर्वथाहि । दुःखयुक्तचि असे ॥ ३८ ॥ यास्तव तेथें पूर्ण विरक्ति । जाली असे जयाप्रति । एवंभूत जो निश्चिति । साधक असे ॥ ३९ तो देहेंद्रियांसहित । संपूर्ण जें दृश्यजात । टाकोचि पैं सुनिश्चित । विचारयोगें ॥ ४० ॥ त्याचा करणें त्याग स्वीकार । हीं दोन्हीं करावीं दूर । कारण कीं त्यासि साचार । सत्यत्वं नाहीं ॥ ४१ ॥ त्यास्तव तेथें उदासीन । व्हावें सर्वथा परिपूर्ण । जरि कांहीं ह्मणसील अन । कल्पनायोगें ॥ ४२ ॥ कीं देहेंद्रियादिकें करून । तो ज्ञानलाभ होतसे पूर्ण । आणि जेणें होतसे उपजीवन । तें त्यागावें कैसें ॥ ४३ ॥ तरि येविषयीं दृष्टांतयुक्त । सांगतों तीं ऐक मात । जैसा कोणी तृषाक्रांत । पुरुष असे ॥ ४४ ॥ तो नारिकेल किंवा नारिंगादि फल । त्यांतील जें उदक निर्मल । त्यातें पान करोनि केवल । त्या फलातें टाकी ॥ ४५ ॥ ह्मणजे तेथें उदासीन । होत असे निश्चयें करून । तैसेंच दृश्य जें संपूर्ण । सारांश त्याचा ॥ ४६ ॥ जें परब्रह्म तत्वतां । त्याचा लाभ जाला असतां । निःसार द्वैतातें सर्वथा । न अंगीकारावें ॥ ४७ भयादिकसंभावना । जेयोनि होतसे आपणा । तें टाकावेंचि ऐसिया वचना । श्रीराम बोले ॥ ४८ ॥ ३४ ॥

आत्मयावांचूनि जें इतर॥ तें अनित्य असे साचार । तेथें वैराग्य दृढतर । व्हावयालागीं ॥ ४९ ॥ आत्म्याचेंच नित्यपण । बोलताहे रघुनंदन । कदापिहि आत्मा नूतन । जाला नसे ॥ ५० ॥ जो उत्पत्तीनंतर । विद्यमान असे साचार । तो नूतन ऐसें सर्वत्र । बोलताति लोक ॥ ५१ ॥ तेणें वचनें करून । जन्मानंतर अस्तित्वलक्षण । दूर करिजेलें संपूर्ण । तैसेंच पुढें ॥ ५२ ॥ नवत्वाभावेंचि करुन जीर्णत्व अभाव पावलें पूर्ण । यास्तव अवस्थांतराची जाण । प्राप्ति जे तद्रूप ही ।५३। परिणाम निरसला जाण । सारांश षड्विकारविहीन । अज अव्यय निरंजन । असे आत्मा ॥ ५४ ॥ जायते अस्ति विवर्धते । विपरिणमते अपक्षीयते । नश्यति या सांहा विकारांतें । नेणेचि आत्मा ॥ ५५ ॥ जन्म बालत्व तरुणपण । पोक्तपणा वृद्धत्व मरण । हे षड्विकार देहासि जाण । आत्म्यासि नाहीं ॥ ५६ ॥ आत्म्याहून जें भिन्न । बोलिलें द्वैत संपूर्ण । तें षड्विकारी या कारणें । अनित्य असे ॥५७॥ यास्तव तेथें व्हावी विरक्ति । ऐसें बोधी श्रीरघुपति । आत्मा असे स्वयं ज्योति। याचि लागिं ॥ ५८ ॥ देहादिकाचें मापण । जेणें त्यजिलेंचि संपूर्ण । स्वस्वरूपाचा जयालागुन ॥ लाभ जाला असे ॥ ५९ ॥ जयालाभाहून अपर । लाभ नाहींच

॥ निरस्तसर्वातिशयः सुखात्मकः स्वयंप्रभः सर्वगतोऽयमद्वयः ॥ ३५ ॥
॥ एवंविधे ज्ञानमये सुखात्मके कथं भवो दुःखमयः प्रतीयते ॥
॥ अज्ञानतोऽध्यासवशात्प्रकाशिते ज्ञाने विलीयेत विरोधतःक्षणात् ॥ ३६
॥ यदन्यदन्यत्र विभाव्यते भ्रमादध्यासमित्याहुरमुं विपश्चितः ॥
॥ असर्पभूते हि विभावनं यथा रज्ज्वादिके तद्वदपीश्वरे जगत् ॥ ३७ ॥

गा साचार । ऐशा श्रुतिस्मृति आधार । बोलताति ॥ ६० ॥ आनंदरूप स्वप्रकाश । आत्मा वोळखाव आपणास । दुःखरूपाचि निःशेष । देहेंद्रियादिक ॥ ६१ ॥ आत्मप्रकाशें प्रकाशमान । संपूर्ण ऐसें श्रुतिवचन । यास्तव देहादिकालागुन । परप्रकाश्यत्व असे ॥ ६२ ॥ आणि सर्वगत व्यापक । हा आत्माचि असे एक । अहंबुद्धीस आश्रय देख । प्रत्यगात्मा तोचि ॥ ६३ ॥ ब्रह्मचि असे प्रत्यगात्मा । प्रत्यगात्माचि ब्रह्मनामा । ब्रह्मचि असे हा आत्मा श्रुती वदे ऐसें ॥ ६४ ॥ ३५ ॥

ऐसें ऐकोनि लक्ष्मण । बोले साशंक तेव्हां वचन । या रिती जो विकारहीन आत्मा असे ॥ ६५ ॥ जन्ममरणादिप्रचुर । प्रवाहरूप हा संसार । याची प्रतीति साचार । त्या आत्म्यासि कैसी ॥ ६६ ॥ ऐसें ऐकोनि बंधुवचन । बोलता जाला रघुनंदन । ह्मणे एवंविध जो ज्ञानघन । सुखरूप आत्मा ॥ ६७ ॥ त्याचि ठायीं दुःखप्रचुर । भासताहे जो संसार । तयासि कारण जें साचार ! आहे तें सांगु ॥ ६८ ॥ या देहादिकाचे ठायीं अहंममतादि जो पाहिं अध्यास असे सर्वथाहि । तयाचेनि योगें ॥ ६९ ॥ ऐसी भ्रांतिरूप प्रतीति । होत असे सुनिश्चिति । ऐसे ऐकोनि महामति । लक्ष्मण बोले ॥ ७० ऐसियां त्या संसारासी । निवृत्ति पैं होईल कैसी । तोहि प्रकार आतां तुजसी । सांगतों ऐक ॥ ७१ ॥ प्रगट जालें असतां ज्ञान संसारनिवृत्तिस । होतसे पूर्ण । कारण की ज्ञान अज्ञानालागुन । विरोधी असे ॥ ७२ ॥ यास्तव तें ज्ञान उत्पन्न । ज्यक्षणीं होतसे पूर्ण । त्या क्षणींच संसारकारण । अज्ञान नाशे ॥ ७३ ॥ अज्ञानकार्य हा संसार ऐसे यास्तव संहार । पावताहेच सत्वर । कारणनाशें ॥ ७४ ॥ जैसें जालिया रज्जुज्ञान । सर्पत्व नाशेच परिपूर्ण । तैसा अज्ञाननाशेंचि पैं जाण । संसार नाशे ॥ ७५ ॥ ३६ ॥

आतां अध्यासाचें लक्षण । ऐक सांगतों तुज कारण । अन्य स्थानीं जें अन्यकल्पन । अध्यास तो हा ॥ ७६ ॥ स्थाणूतें देखणें पुरुष । कीं रौप्य पाहणें शुक्तीस । कीं सर्पभाव ते रज्जूस । भ्रमाचेनि योगें ॥ ७७ ॥ हाचि जाणावा अध्यास । आरोपही जाणिजे यास । ऐसें बोलती विद्वांस । सारासारवेत्ते ॥ ७८ ॥ जैसें रज्ज्वादिकाचें ठायीं । सर्पादिक कल्पना कांहीं । तें व्यर्थचि असे पाहिं । सर्वथा जाण ॥ ७९ ॥ रज्जु ही सर्प झाला नसून । तेथेंच जैसें सर्पभान । तैसेंच परमेश्वरीं भान । जगाचें या ॥ ८० ॥ ईश्वराचि सत्य असतां । जग पाहणें तेथें वृथा । परि भ्रमयोगें सर्वथा । देखणें घडे ॥ ८१ ॥ या भ्रमलागीं जनक । दोष असे जो अज्ञान एक । जो तें विपरीत भावना देख । होत असे ऐसी ॥ ८२ ॥ रज्जू-

॥ विकारमायारहिते चिदात्मकेऽहंकार एष प्रथमः प्रकल्पितः ॥
॥ अध्यास एवात्मनि सर्वकारणे निरामये ब्रह्मणि केवले परे ॥ ३८ ॥
॥ इच्छादिरागादिसुखादिधर्मिकाः सदा धियः संसृतिहेतवः परे ॥
॥ यस्मात्प्रसुप्तौ तदभावतः परः सुखस्वरूपेण विभाव्यते हि नः ॥३९॥

---

विषयीं जें अज्ञान । तें सर्पभ्रमासी कारण । तैसें ईश्वराविषयीं अज्ञान । मूळ जगद्भ्रमासी ॥ ८३ ॥ देहादि संसारात्मक । जग संपूर्ण जें असे देख । तें भाविजे तसे अवश्यक । परमेश्वरींही ॥ ८४ ॥ अज्ञान गेलिया संपूर्ण । होत असे यथार्थ ज्ञान । तेव्हां आद्यंत चिद्घन । परमात्माचि भासे ॥ ८५ ॥ ३७ ॥

त्या परमात्मयाचे ठायीं । जगद्भान जें तयाविषयीं । अध्यास जो कारण पाहीं । तो असे कैसा ॥ ८६ ॥ ऐसें कांहिं ह्मणसी जरि । ऐक सांगतों तेंहि तरि । सर्व विकल्पांस निर्धारीं । जी कारण असे माया ॥ ८७ ॥ तिचियाहि जें विरहित । ह्मणजे तत्संग ज्यासि कदाचित् । जालाचि नसे निश्चित । सत्यत्वें पाहतां ॥ ८७ ॥ जो चित्स्वरूप सर्वकारण । आणि निरामय परिपूर्ण । जयातें दुःखाचा लेश हि जाण । स्पर्शला नसे ॥ ८८ ऐसा आनंदमय केवल । ज्यासि षड्विकाररूप मल । नाहींच यास्तव अमल । ह्मणती ज्ञाते ॥ ८९ ॥ जो दृश्याहून विलक्षण । व्यापक असे परिपूर्ण । आत्मा ऐसा चिदानंदघन । तयाचिये ठायीं ॥ ९० ॥ जो प्रथम अहंकार कल्पित । तोचि अध्यास असे निश्चित । जीवशिवनामें विख्यात । असे तोचि ॥ ९१ ॥ जो अहंबुद्ध्यात्मक अध्यास । तोचि सर्व संसारास । कारण असे यास्तव त्यास त्यजावें आधीं ॥ ९२ ॥ ३८ ॥

बुद्धिनिष्ठचि हा संसार । आत्मनिष्ठ नाहींच साचार । या प्रकारें रघुवीर । बोलताहे ॥ ९३ ॥ यदर्थीं अन्वय व्यतिरेक । प्रमाण दावी रघुनायक । त्याचाहि प्रकार निष्टंक । सांगतों ऐक ॥ ९४ ॥ सर्वसाक्षी जो आत्मा पर । त्याचे ठायीं हा संसार । भासावया कारण साचार । तिन्हि काळींहि ॥ ९५ ॥ इछा उपेक्षा राग द्वेष । सुख दुःख हें निःशेष । इत्यादि द्वंद्व धर्म वास । करिती सदा जेथें ॥ ९६ ॥ बुद्धिवांचून द्वंद्वधर्मांसी । राहणें नसेचि निश्चयेंशीं । एवं बुद्धि असतां संसारासी । राहणें घडे ॥ ९६ ॥ हाचि तयाचा अन्वय । जाणोनि घ्यावा निःसंशय । आतां व्यतिरेकातेंहि अद्वय । श्रीराम बोले ॥ ९७ ॥ बुद्धिशब्दें उपलक्षित । लिंगदेह जाणावा निभ्रांत । तो लीन होतां समस्त । सुषुप्ति तेचि ॥ ९८ ॥ त्या सुषुप्तीचे ठायीं । बुद्धिवृत्तीचा अभाव पाहिं । होत असे सर्वथा हि । ययालागीं ॥ ९९ ॥ कांहींच न भासे संसार । यास्तव जाणावा हा तत्पर । ऐसा व्यतिरेकही रघुवीर । दाविता जाला ॥ १०० ॥ असो त्या सुषुप्तीमाजी जाण । आत्मा जो परात्पर पूर्ण । तो सुखस्वरूपमात्रत्वें करुन । भाविजेतसे आह्मीं ॥ १ ॥ तेव्हां संसारित्वें करुन । नाहीं भाविजेत तो परिपूर्ण । जो उठला सुप्तीपासून । तो स्वानुभव सांगे ॥ २ ॥ मीं निजलों होतों सुखयुक्त । ऐसी स्मृती

॥ अनाद्यविद्योद्भवबुद्धिबिंबितो जीवः प्रकाशोऽयमितीर्यते चितः ॥
॥ आत्मा धियः साक्षितया पृथक् स्थितो बुद्ध्या परिच्छिन्नपरः स एव हि ४०
॥ चिद्बिंबसाक्ष्यात्मधियां प्रसंगादेकत्र वासादनलाक्तलोहवत् ॥

असे तया होत । तस्मात् तेव्हां अनुभव निश्चित । सुखाचा असे त्यासी ॥ ३ ॥ ऐसा आत्मस्वरूपाचा निश्चय । तेव्हां असे निःसंशय । श्रुतिस्मृतींचेंही तात्पर्य । ऐसेंच असे ॥ ४ ॥ जालिया लिंगदेहाचें हनन । संसार नाशे संपूर्ण । मग आत्माचि सनातन । परब्रह्म असे ॥ ५ ॥ ३९ ॥

तत्पदार्थ आणि त्वंपदार्थ। यांचिया पुनरपि स्वरूपाप्रत । बोलताहे सीताकांत । काय तें ऐका ॥ ६ ॥ जी नाहींच पावली जनन । ऐसिया अविद्येपासुन । जीवा उद्भव असे जाण । तया बुद्धीमाजी ॥ ७ ॥ जो चित्प्रकाश प्रतिबिंबित । तो जीव असे बोलिजेत । परमात्मा तो निश्चित । असे बुद्धिसाक्षी ॥ ८ ॥ बुद्धिधर्म जे द्वंद्वादिक । त्याचा ज्यासि नाहींच संपर्क । या सर्वांहुनि वेगळाचि देख । जो राहिला असे ॥ ९ ॥ तोचि ईशरूपें करुन । अंतर्यामित्वातें पावून । राहत असे नारायण । कर्ता हर्ता भोक्ता ॥ १० ॥ मी सुखी मी दुःखी पूर्ण । इत्यादि प्रकारें करुन । धर्म असती जे संपूर्ण । अंतःकरणाचे ॥ ११ ॥ त्यांचा आरोप ज्याचे ठायिं । असे तो जीव जाणोनि घेइं । परमात्मा तो सर्वथाहि । नेणे नि गांतें ॥ १२ ॥ साक्षित्व जें तेणें करुन । सर्वत्राहि असोन विद्यमान । सदा राहे अलिप्तपणें । गगनाचिये परि ॥ १३ ॥ यालागींच तो आपण । बुद्धीकरून अपरिच्छिन्न । सदा राहे आनंदघन । यास्तव पराचि तो ॥ १४ ॥ एवं आत्मज्ञानें करुन । जो प्रतिबिंबासी आधार पूर्ण । तो लिंगदेह विलयातें जाण । पावला असतां ॥ १५ ॥ प्रतिबिंबाचा होतसे लय । यास्तव तो परमात्माचि होय । हा प्रसिद्ध अभिप्राय । ज्ञात्यांसि असे ॥ १६ ॥ एकवेळां ऐकतां विचार । नाहे साधकांसी दृढतर । यास्तव रघुपति वारंवार । बोले तेंचि ॥ १७ ॥ ४० ॥

आतां बुद्धि आणि चिदाभास । यांचा जो परस्परें अध्यास । असे त्यास्तव परस्परेधर्मास । भासणें घडे ॥ १८ ॥ ह्मणजे परस्परें करुन । तादात्म्यारोपास्तव जाण । प्रत्यया येतसे पूर्ण । विपरीत धर्म ॥ १९ ॥ जडत्व आत्मयालागून । ज्ञानत्व बुद्धिवृत्तीसी जाण । प्रत्यया येतसे पूर्ण । विपरीत भ्रमयोगें ॥ २० ॥ विचार योगें सुनिश्चित । भ्रम जालिया वाताहत । आत्मा असे मूर्तिमंत । सच्चिदानंद ॥ २१ ॥ अत एव विज्ञानाश्रय । आत्मा असे सदा निर्भय । हेंचि दृढ व्हावया निःसंशय । पुनः पुनः बोले ॥ २२ ॥ येथें तार्किकाचें ऐसें मत । कीं चिदात्मा जो सुनिश्चित । त्यापासूनचि समस्त । व्यवहारही घडे ॥ २३ ॥ तोचि आश्रय या ज्ञानासी । असे जाणिजे निश्चयेशीं । अनुव्यवसायी तयासी । बोलताति ते ॥ २४ ॥ जीव-चो त्याचिये ठायिं । जडात्मता बोलती पाहिं । कारण कीं विदित नाहिं । श्रुतिसिद्धांत त्यांसी ॥ २५ ॥ शास्त्रोक्त सर्व व्यवहार । परमात्मयासी च साचार ।

॥ अन्योन्यमध्यासवशात् प्रतीयते जडाजडत्वं च चिदात्मचेतसोः ॥४१॥
॥ गुरोः सकाशादपि वेदवाक्यतः संजातविद्यानुभवो निरीक्ष्य तं ॥
॥ स्वात्मानमात्मस्थमुपाधिवर्जितं त्यजेदशेषं जडमात्मगोचरं ॥ ४२ ॥
॥ प्रकाशरूपोऽहमजोऽहमद्वयोसकृद्विभातोऽहमतीव निर्मलः ॥

---

आहे ह्मणती दुराचार । न जाणतां श्रुति ॥ २६ ॥ आरोपासही अधिष्ठान। चिदात्माचि तो असे जाण । इत्यादि करिति वल्गनापूर्ण । व्यर्थचि ते ऐसी ॥२७॥ चिदाभास आणि इंद्रियांसहित । बुद्धि जी लिंगदेहस्थ । यांचा संग असे अत्यंत। एकेच ठायिं ॥ २८ ॥ बुद्धिशद्धें करून । वोळखावें अंतः करण । सहज जालें ग्रहण । लिंगदेहाचें ॥ २९ ॥ सतरा तत्वें एकत्र । होतां होय लिंगशरीर । त्यांत बुद्धिमाजी साचार । चिदाभास उगवे ॥ ३० ॥ यास्तव संग परस्पर । सदा होतसे एकत्र । यालागिं आरोप परस्पर । होत असेचि पैं ॥ ३१ ॥ यदर्थी असे एक दृष्टांत । तो ऐकावा दत्तचित्त । जैसा लोहगोळ अग्नितप्त । त्याचिये परि ॥ ३२ ॥ जैसें तप्तत्व लोहाचे ठायिं । आणि वर्तुलत्व अग्नीस पाहिं । हें निवडितां न निवडे कांहिं । विचारें विण ॥ ३३ ॥ येथें एकत्र वास कारण। यास्तव परस्परें एकत्वें करून । वर्तणूक होतसे संपूर्ण । दोघांचीही ॥ ३४ ॥ यास्तव बुद्धिधर्म आभासीं पाहिं । आभासधर्म बुद्धीचे ठायिं । हाचि परस्पराध्यासही । जाण बापा ॥ ३५ ॥ ।४१।

सांगितल्यानि अर्थाप्रति । दृढता व्हावया मुनिश्रिति । बोलताहे श्रीरघुपति । पुनरपि तोचि ॥ ३६ ॥ सद्गुरुमुखापासून । करावें महावाक्यश्रवण । विचारयुक्त परिपूर्ण । अनन्यभावें ॥ ३७ ॥ पुढें तयाचें मनन । करावेंचि स्वयें आपण । अनेक संशय खंडून । स्वविचार योगें ॥ ३८ ॥ त्या श्रवणमननें करुन । प्राप्त झालें जें आत्मज्ञान । तेणें आत्मा जो ज्ञानघन । त्यासि अनुभवावें ॥ ३९ ॥ ह्मणजे प्रत्यग्ब्रह्मचि आपण । ऐसें जाणोनिया परिपूर्ण । पुनः देहबुद्धीचें जनन । न व्हावेंचि कधींही ॥ ४० ॥ ऐसें हें निदिध्यासन । करावेंचि आळस टाकून । तेणें अंगींसमाधान । परिपूर्ण बाणे ॥ ४१ ॥ श्रवण गुरूचें अधीन । असे यास्तव तेथें शरण । व्हावें अनन्यभावें करून । प्रणिपातपुरःसर ॥ ४२ ॥ दोन साधनें आपुले हातीं । आहेत यास्तव बरव्या रीतीं । साधूनि स्वात्मानुभवाप्रति । करावें दृढ ॥४३॥ यारिति साधनें तीन । जेणें साधिलीं परिपूर्ण । तोचि अखंड दंडायमान । पूर्ण ब्रह्म होय ॥ ४४ ॥ जो सच्चिदानंदस्वरूप पूर्ण । उपाधिधर्मविहीन । प्रत्यग्ब्रह्म सनातन । हृदयस्थ असे सदा ॥ ४४ ॥ त्यातें अपरोक्ष करून । जड दृश्य हें संपूर्ण । स्फुरणादि तृणांत जाण । मिथ्या जाणुन त्यजावें ॥४६॥ ह्मणजे तेथें उदासीन । सर्वथाहि व्हावें परिपूर्ण । मग शोधून पाहतां दुजेपण । न दिसे कोठें ॥ ४७ ॥४२॥

जें जाणावया लागुन । योग्य असे परिपूर्ण । जेथें उपाधीचा लेशही जाण । नसेचि कांहिं ॥ ४८ ॥ ऐसिया शुद्ध स्वरूपाप्रति । बोलताहे तो रघुपति । हरावया साधकभ्रांति । श्लोकद्वयें करुनि ॥ ४९ ॥ मी स्वयंप्रकाश आहों पूर्ण ।

॥ विशुद्धविज्ञानघनो निरामयः संपूर्ण आनंदमयोऽहमक्रियः ॥ ४३ ॥
॥ सदैव मुक्तोऽहमचिंत्यशक्तिमानतींद्रियज्ञानमविक्रियात्मकः ॥
॥ अनंतपारोऽहमहर्निशं बुधैर्विभावितोऽहं हृदि वेदवादिभिः ॥ ४४ ॥
॥ एवं सदात्मानमखंडितात्मना विचारमाणस्य विशुद्धभावना ॥
॥ हन्यादविद्यामचिरेण कारकै रसायनं यद्वदुपासितं रुजः ॥ ४५ ॥

अन्य प्रकाशक मजवीण कोण ।मिथ्याजडासी प्रकाशकपण । न घडे माझें ॥ ९० ॥ मी घटादिका परि । नोहें परप्रकाश्य निर्धारिं । विच्यारें पाहतां मजविण उरी दुजिया कैंची ॥ ९१ ॥ मी अजन्मा जन्मादिहीन ।मी अद्वय परिपूर्ण । माझ्या जातीचें दुजें आन । सत्य आणावें कैचें ॥ ९२ ॥ तस्मात् भेदत्रयरहित । मीचि आहों सदोदित ।अन्य प्रकाशकें प्रकाशित । नोहेंच मी कदा ॥ ९३ ॥ सूर्य चंद्र अग्नि तारका । मज प्रकाशावया अविका । यांच्या अंगीं नाहींच देखा । मत्प्रकाशें हें प्रकाशित ॥ ९४ ॥ ऐसा बोलती श्रुति स्मृति । मी निर्मलचि आहों आद्यंतीं । द्वैतमल हा मजप्रती । स्पर्शलाचि नाहीं ॥ ९५ ॥ जे असती मायानिर्मित । आवरण विक्षेप त्यांविरहित । आवरण तें निश्चित । असे द्विधा ॥ ९६ ॥ असदावरण अभानावरण । हींचि त्यांचें द्विधा लक्षण । आत्मा नाहींच न भासे जाण । द्विधा हींचि ॥ ९७ ॥ परोक्षज्ञानें असदावरण । स्वयेंचि गेलें दग्ध होउन । तैसेंच गेलें अभानावरण । अपरोक्ष ज्ञानें ॥ ९८ ॥ पुनः देहबुद्धीचा उदय । हा विक्षेप मज कोठून होय । हें द्विधा मायामय । मजलागि कैचें ॥ ९९ ॥ विशुद्ध चिदेकरस । निरामय आहों निर्दोष । कर्तृत्वाभिमान लेश । नाहींच मजसी ॥ ६०॥ मीचि आहों हें संपूर्ण ।देशकालपदार्थें करुन ।परिच्छेद जो त्रिविध जाण। तो नाहींच मजसी ॥ ६१ ॥ सच्चिदानंद विराजमान । तेंचि माझें स्वरूप पूर्ण । अक्रिय मी परिणामहीन । केवल ब्रह्म ॥ ६२ ॥ ४३ ॥

मी कालत्रयींही आहों मुक्त । सर्वधर्मविरहित । धर्माधर्म जे त्यांची मात । मजपुढें कैंची ॥ ६३ ॥ माझी असे अचिंत्यशक्ति । मीचि परमात्मा सुनिश्चिति । इंद्रियातीत जे ते चिति । तें स्वरूप माझें॥६४ ॥ जेथें वेद मुके जाले । मन ही पांगुळ-होऊन ठेलें । अविक्रिय जें ब्रह्म उरलें । तें स्वरूप माझें ॥ ६५ ॥ मज कैंचें अवतार घेणें । आणि निजधामासि कैंचे जाणें । माझा अंत पार कोणें । जाणावा कैसा ॥ ६६ ॥ देशकालें करुन । नाहीं अंत पार मज लागुन । अनंत मी परिच्छेदहीन । परमात्मा मी ॥ ६७ ॥ ज्याचें हृदयीं सदा चिंतन । विबुध करिताति अनुदिन । तो मी आत्माराम पूर्ण । परब्रह्म आहों ॥ ६८ ॥४४॥

ऐसी भावना जी केवल । तिचें सांगतों आतां फल । आत्मयातेंचि सार्वकाल । उक्त प्रकारें ॥ ६९ ॥ जें कदापि विषयें करुन । आकर्षित नव्हे मन । त्या अखंड मनें साधक जन । चिंतिताति ॥ ७० ॥ त्यांचें ब्रह्माकार-वृत्ति । अंतःकरण पावे निश्चिति । उदय जाहल्या तयेप्रति । होय तें ऐका ॥ ७१ ॥ जीं देहांतरप्राप-

॥ विविक्त आसीन उपारतेंद्रियो विनिर्जितात्मा विमलांतराशयः ॥
॥ विभावयेदेकमनन्यसाधनो विज्ञानदृक् केवल आत्मसंस्थितः ॥ ४६ ॥
॥ विश्वं यदेतत्परमात्मदर्शनं विलापयेदात्मनि सर्वकारणे ॥
॥ पूर्णश्चिदानंदमयोऽवतिष्ठते न वेद बाह्यं न च किंचिदांतरं ॥ ४७ ॥

---

क । कर्मे असती सकळिक । त्यांसहित शीघ्रचि देख । ती अविद्येतें नाशी ॥ ७२॥ जैसें सेवित रसायन । रोग नाशितसे संपूर्ण । तैसी वृत्तीही अज्ञान । सहज कर्म नाशी ॥ ७३ ॥४५ ॥

ध्यानाविषयीं जी कर्तव्यता । ती सांगतों ऐक आतां । एकांतस्थानींच तत्वतां । बैसावें सुखें ॥ ७४ ॥ पद्मासनादि यथोचित । स्वयें घालोनि नेमस्त । इंद्रियव्यापार समस्त । करावा दूर ॥ ७५ ॥ शमदमादिसंपन्न । स्वयें होवोनि आपण । प्राणायाम प्रत्याहारें करुन । अंतःकरण जिंकावें ॥ ७६ ॥ ऐसा जाला जो शुद्धचित्त । तेणें आत्मरूपींच नेमस्त । दृष्टि ठेवावी निश्चित । जो विचारयुक्त पैं असे ॥ ७७ ॥ पाहता पाहणें संपूर्ण । करोनिया हें दोन्ही लीन । दर्शनमात्राचि आपण । होवोनि राहावें ॥ ७८ ॥ हीचि निर्विकल्प समाधी । बरी साधावी सदृढ बुद्धि । तत्वज्ञानावीण कधीं । न लभेचि ही ॥ ७९ ॥ अन्यसाधनें जीं असतीं उक्त । त्यांच्या आहेपणाचा निश्चित । भ्रम जो तेणेशीं विरहित । विचारें व्हावें ॥ ८० ॥ केवल व्हावें संगरहित । असावेंचि आत्मसंस्थित । आत्मरूपींच आपणातें । करावें लीन ॥ ८१ ॥ कदापिहीं अन्यविषयीं ॥ चित्तसंचार ज्याचा नाहीं । मग तेणें ध्यान जें तें हि । टाकावें सुखें॥ ८२ ॥ ऐसा जाला जो ब्रह्मसंपन्न । तेणें त्यजावीं सकळ साधनें । फलप्राप्ति जालिया पूर्ण । मग साधनां कोण पुसे ॥ ८३ ॥ ४६ ॥

जें भूत भविष्य वर्तमान । त्रिधा जग हें संपूर्ण । त्याचा प्रकाशक आनंदघन । परमात्माचि असे ॥ ८४॥ ज्याचिया प्रकाशें करुन । हें प्रकाशे जग संपूर्ण । ऐसिया श्रुतिवचनातें जाण । बोलताहे ॥ ८५ ॥ तस्मात् हा सर्व कारण। परमात्मा असे पूर्ण । जें मायेचें सान्निधान । जालें यास्तवाचि ॥ ८६ ॥ सर्वोपादानत्वें करुन । बोलिला जो आत्मा पूर्ण । तेथेंचि करावें हें लीन । संपूर्ण जग ॥ ८७ ॥ ह्मणजे उपादानाहून । तत्कार्य न देखावें भिन्न । ऐसा जाला जो ब्रह्म पूर्ण । लक्षण सांगतों तयाचें ॥ ८८ ॥ तयाचा काम जो समस्त । तो जाला असे त्यासि प्राप्त । यालागिं इच्छावया किंचित । त्यासी उरलेंचि नाहीं ॥ ८९ ॥ तो सच्चिदानंदमय । राहताहे निःसंशय । तो दृश्य जें अंतर्बाह्य । न जाणेचि त्यातें ॥ ९० ॥ सर्वत्रहि ब्रह्मदर्शन । ज्यासि झालें परिपूर्ण । त्यासि ब्रह्मवेत्ता ह्मणेल कोण । ब्रह्मचि तो असे ॥ ९१ ॥ ४७ ॥

हा निर्विकल्प समाधि जाण । जंव प्राप्त नसे ज्या कारण । तों काल कर्तव्य त्यालागुन । काय असे पूर्वकालीं ॥ ९२ ॥ तेंचि आतां लक्ष्मणा । तुज सांगतों

॥ पूर्वं समाधेराखिलं विचिंतयेदोंकारमात्रं सचराचरं जगत् ॥
॥ तदेव वाच्यं प्रणवोहि वाचको विभाव्यते ज्ञानवशान्न बोधतः ॥ ४८
॥ अकारसंज्ञः पुरुषोहि विश्वको ह्युकारकस्तैजस ईर्यते क्रमात् ॥
॥ प्राज्ञो मकारः परिपठ्यतेऽखिलैः समाधिपूर्वं न तु तत्वतो भवेत् ॥ ४९ ॥
॥ विश्वं त्वकारं पुरुषं विलापयेदुकारमध्ये बहुधा व्यवस्थितं ॥

---

करीं श्रवणा । आदौ समाधिलक्षणा । श्रवण करी ॥ ९३ ॥ सकलविषयरूप व्यापार । तो सर्वही व्हावा दूर । आणि वृत्ति ब्रह्माकार । तत्पूर्वक व्हावी ॥९४॥ हाचि बोलिजे समाधि पूर्ण । याचिया पूर्वकालीं जाण । चराचर जग संपूर्ण । चिंतावें ओंकारमात्र ॥ ९५ ॥ हा बोधकत्वें करून । परिच्छेदक जगा लागुन । यास्तव हें तद्रूपाचि पूर्ण । वोळखावें ॥ ९६ ॥ तयाचेंचि आतां विवरण । करितों बरें करी श्रवण । जग तें वाच्यचि असे जाण । प्रणव त्याचा वाचक पैं ॥ ९७ ॥ ऐसी हीं भावना जाण । अज्ञानावस्थेचि असे पूर्ण । जालिया अपरोक्ष ज्ञान । निर्विशेष पैं ॥ ९८ ॥ हाचि ब्रह्मसाक्षात्कार । म्हणोनि ध्यावा सविस्तर । याचिया प्राप्तीनंतर । न उरेचि कांहिं ॥९९॥ सर्ववृत्तिसी उपमर्दक । समाधी असे हा एक । यास्तव कांहिं न उरे देख । तदुत्तरकालीं ॥ ७०० ॥ ४८ ॥

सांगीतल्याचि अर्थाप्रति । विशद करोनि श्रीरघुपति । सांगताहे अनुमात्रनी । काय तें ऐका सविस्तर ॥ १ ॥ मुख्य प्रणवाची साचार । प्रथम मात्रा जो अकार । तेणें शब्दें चि उच्चार । होत असे ज्याचा ॥ २ ॥ तेणें स्थूळ देहाभिमान । धरितां विश्व होय अभिधान । हा जागृत्साक्षी रजो गुण । व्यष्टीमाजी असें ॥ ३ ॥ हाचि पुरुष विराट देहीं । सृष्टिसाक्षी वैश्वानर पाहीं । समष्टीमाजी सर्वथाहि । जाणोनि ध्यावा ॥ ४ ॥ तैसाचि हिरण्यगर्भ सूक्ष्मशरीरी । सूत्रात्मा तैजस निर्धारि । पालन स्वप्नाचेंहि करी । साक्षित्व स्वयें ॥ ५ ॥ तोचि सत्वगुण उकार । द्वितीयमात्रा हा निर्धार । आतां तिसरा जो मकार । तमोगुण असे ॥ ६ ॥ कारण आणि अव्याकृत । येथें अहंता असे ज्यांप्रत । सुषुप्ति प्रळयांचें करीत । साक्षित्व स्वयें ॥ ७ ॥ एवं मात्रात्रयें करून । प्रणव पावे विस्तार संपूर्ण । ऐसें वदाचि तो आपण । बोलत असे ॥ ८ ॥ मी ब्रह्म आहों ऐसिया रिति । जी जाणीवरूप उदेली वृत्ति । हेंचि सगुण ब्रह्म विस्ताराप्रति । पावलें सर्व ॥ ९ ॥ यासि प्रत्यग्ब्रह्म अधिष्ठान । तेंच मी आहों सनातन । या समाधीपूर्वींच जाण । भावना ही ऐसी ॥ १० ॥ जालिया तत्त्वसाक्षात्कार । हेही भावना करावी दूर । कारण कीं ब्रह्मीं लय साचार । जाला सर्वांचाहि ॥ ११ ॥ हा उपक्रमाचा प्रकार । बोलिला तुज सविस्तर । आतां विलयाचाहि या उपर । प्रकार सांगूं ॥ १२ ॥ ४९ ॥

धरोनि स्थूलदेहाभिमान । राहिला पुरुष जो विश्वसंज्ञ । त्याचें अकारासहित विलापन । करावें उकारांत ॥ १३ ॥ पुढें लिंगदेहाभिमानी पुरुष । आणि तद्वाचक द्वितीय उकारास । मकारीं न्यावें विलयास । भावनायोगें ॥ १४ । समष्टि व्यष्टि

॥ ततो मकारे प्रविलाप्य तैजसं द्वितीयवर्णं प्रणवस्य चांतिमे ॥ ९०॥
॥ मकारमप्यात्मनि चिद्घने परे विलापयेत्प्राज्ञमपीह कारणं ॥
॥ सोहं परं ब्रह्म सदा विमुक्तिमद्विज्ञानदृङ्मुक्त उपाधितोऽमलः ॥ ९१ ॥
॥ एवं सदा जातपरात्मभावनः स्वानंदतुष्टः परिविस्मृताखिलः ॥
॥ आस्ते स नित्यात्मसुखप्रकाशकः साक्षाद्विमुक्तोचलवारिसिंधुवत् ॥९२॥

करोनि एक । अनुक्रमें लयातें देख । करितां गेलें सकळिक । अन्यथा ज्ञान ।१५।९०।

पुढें तैजस उकारयुक्त । प्राज्ञ असे जो ईश्वरसहित । जो कारणाभिमानी आ व्याकृत । पुरुष असे ॥ १६ ॥ त्याचा सगुण ब्रह्मीं लय । करावाचि निःसंशय - मग सर्वांतील जो आत्मा अद्वय । चिद्घन असे ॥ १७ ॥ त्याचे ठायीं सगुणात्म-ति । लया न्यावें मिथ्यारिति हा आरोपचि पैं निश्चिति । त्यजावा अपवा-दें ॥ १८ ॥ त्यावरि जो आपण । तो सर्व विलापा अधिष्ठान । पर ब्रह्म परिपूर्ण। भावावें तें ॥१९॥ तो मी आहीं हेही वृत्ति । टाकोनि उरे जो स्वयंज्योति । तोचि हो उनि सहजस्थिति । असावें सुखें ॥ २० ॥ आतां हेंचि विशेषें करुन । दाविता-ऐ त्याचें लक्षण । नित्यमुक्त परिपूर्ण । ब्रह्म मी आहीं ॥२१॥ हें ऐकोनि लक्ष्मण । बोले श्रीरामासी वचन । ह्मणे रागद्वेषादिकें करुन । मलिन जो जीव ॥ २२ ॥ तयालागीं ब्रह्मभावना । कैसी होईल रघुनंदना । ऐसिया ऐकून त्याचिया वचना । श्रीरामबोले ॥ २३ ॥ अहंपदार्थ उपाधीपासुन । मुक्त जालिया परिपूर्ण । निर्मल-चि असे जाण । परब्रह्म तो ॥ २४ ॥ त्या ब्रह्मभावनेसी साधन । सांगतों ऐक तुज लागून । तदर्थ मुख्य निदिध्यासन । साधन असे साचें ॥ २५ ॥ याच साधनें करून । ब्रह्म होतसे तो पूर्ण। जेथें मी आणि माझेंपण। उरलेंचि नाहीं ॥२६॥९१॥

ऐसी भावना प्राप्त ज्यासि । ऐक त्याचिया लक्षणासि । उक्त प्रकारें अखंड ज्यासि । आत्मबोध झाला।२७।मी एक आणि आत्मा एक ।हा नाहींच जेथें कळंक परिवारेशीं जे देहादिक । विसरला त्यांसी ॥२८॥ देहादि हा समुदाय । असतांहि यथान्वय । परि नाहींत निःसंशय । ऐसें ज्यासि जालें ॥२९॥ जो स्वरूपानंदें करु-न । जाला असे आनंदघन । या निर्विकल्प समाधीत भान । द्वैताचें कैचें ॥३० ॥ विषयानंदाचें भान । त्यासि उरेल मग कोठुन । कारण कीं परिणामीं पूर्ण । दुःख असे जेथें ॥ ३१ ॥ यास्तव तेथें विरक्त । पूर्वीच जाला जो निश्चित । जो नित्यानंद मूर्तिमंत । ब्रह्म जाला ॥ ३२ ॥ आनंदरूप जो नित्य प्रकाश । तोचि जाला जो निःशेष । नामरूपात्मक भेदास । टाकिलें समूळ ॥ ३३ ॥ ऐसा जीवन्मुक्त जो निर्धारिं । वर्ते तो सिंधुचिये परि ।जयाचे असे निश्चल वारि । तद्वताचि तो ॥ ३४॥ विषयसंबंधलहरी । जेथें नाहींच तिळभारि । चराचर सर्व निर्धारि । आपण-चि जाला ॥ ३५ ॥ ९२ ॥

जो माझा भक्त ऐसिया रितिं । जाला असे अनन्यभक्ति ।तयासींच होय माझी प्रा-प्ति । श्रीराम ह्मणे ॥ ३६ ॥ अगा सांगितला जो प्रकार । तेणेंचि जो नि-

॥ एवं सदाभ्यस्तसमाधियोगिनो निवृत्तसर्वेंद्रियगोचरस्य हि ॥
॥ विनिर्जिताशेषरिपोरहं सदा दृश्यो भवेयं जितषड्गुणात्मनः ॥ ९३ ॥
॥ ध्यात्वैवमात्मानमहर्निशं मुनिस्तिष्ठेत्सदा मुक्तसमस्तबंधनः ॥
॥ प्रारब्धमश्नन्नभिमानवर्जितो मय्येव साक्षात् प्रविलीयते ततः ॥ ९४ ॥
॥ आदौ च मध्ये च तथैव चांततो भवं विदित्वा भयशोककारणं ॥
॥ हित्वा समस्तं विधिवादचोदितं भजे त्स्वमात्मानमथाखिलात्मनां ॥ ९५

रंतर । अभ्यासीत असे सादर । समाधियोग । ३७ ॥ तेणें ज्याचिया मनापासून । दूर जाले विषय संपूर्ण । तेणें सहाही शत्रु जाण । जिंकिले सहज ॥ ३८ ॥ तोंव-रीच हे कामादिक । जंव देखिलें नाहि समाधिसुख । त्यांपुढें हे बापुडे रंक । करि-ती न कांहिं ॥ ३९ ॥ समाधींत बुडालें मन । राहिली बाह्य आठवण । सहजच्च त्याची खुंटली जाण । प्रवृत्ति विषयीं ॥ ४० ॥ अतएव सर्वज्ञत्वादि सहा गुण । ज्याचे ठायीं असती पूर्ण । तें मनीष जेणें जिंकुन । स्वाधीन केलें ॥ ४१ ॥ ते सहा गुण ह्मणसी कोण । ऐक त्यांचेंही विवरण । सर्वज्ञत्व नित्यतव पूर्ण । नित्य तृप्तत्व तिजें ॥४२॥ बोधरूपत्व आणि स्वतंत्रता । तैसीच नित्य अलुप्तता । हे षड्गुण ज्या-चे तत्वतां । असती अनंतरूप ॥ ४३ ॥ ऐसा असे जो माझा भक्त । त्यास दृश्य मी होईन सतत । तो जें जें कांहीं अवलोकित । तेथें तेथें मीच त्यासी ॥ ४५ ॥ येणें वचनें करून । सुचविता जाला रघुनंदन । मी भक्तासीच दृश्य पूर्ण । अभक्तां नसे कोठें ॥ ४६ ॥ जैसा भाव ज्यापाशीं ।मी ही तैसाचि असें त्यासी । भक्तीविण मत्प्राप्तीसी । उपाय अन्य नाहीं ॥४७॥९३॥

रात्रंदिवस आत्मध्यान । ऐसें केलें असे जेणें । तो जीवन्मुक्तचि पूर्ण । होतसे मुनि ॥४८॥समस्त बंधनापासून ।तो मुक्तचि असे सदा पूर्ण । जें ज्यासमयीं प्रारब्धें करुन होत असे प्राप्त ॥ ४९ ॥ त्यातें सेवी अभिमानरहित । परि हर्षखेद नाहीं किंचित । मद्रूपचि तो माझा भक्त । होत असे ध्यानें । ९० । अंतींहि तो माझेंच ठायीं । लीन होत असे पाहीं । स्फुरणादि उपाधी सर्वही । टाकोनि मिथ्या ।९१। जैसें लवण सि-ळतां जीवनीं । तत्काळचि तें होय पाणी । तैसा मद्भक्त माझे मीळनीं । मीचि होय ॥ ९२ ॥ ९४ ॥

सकलही धर्मांहून । हाचि धर्म श्रेष्ठ पूर्ण । हेंच आतां रघुनंदन । स्वमुखें बोले ॥९३ ॥ आदिमध्यांतांचें ठायीं ।भयशोकांसीच कारण पाहीं ।संसार असे सर्वथाहि। जाणोनि ऐसें ॥ ९४ ॥ त्या संसारासी कारणभूत । कर्ममार्ग जो श्रुतिबोधित । त्यातें टाकोनि काम्यसहित । भजावा परमेश्वर ॥९५ ॥ जो सकल जीवासी स्वरूपभूत ।प-रमात्मा असे नित्यतृप्त । त्याते भजोनिया होत । स्वयें तोचि पैं ॥ ९६ ॥ जैसें धना-तें संपादितां । आदौं दुःखचि होय तत्वतां । मध्येंही पालन करितां । भय असे रा जादिकें ॥९७॥ अंतीं जालीया नाश जाण ।शोकदुःखचि होय दारुण। ऐसेंच पदार्थ संपूर्ण । जाणावे दुःखदायी ॥ ९८॥ येथिल सुखाचिये परि । स्वर्गसुखही निर्धारिं ।

॥ आत्मन्यभेदेन विभावयन्निदं भवत्यभेदेन मयात्मना तदा ॥
॥ यथा जलं वारिनिधौ यथा पयः क्षीरे वियद् व्योम्न्यनिले यथानिलः ॥५६॥
॥ इत्थं यदीक्षेत हि लोकसंस्थितो जगन्मृषैवेति विभावयन्मुनिः ॥
॥ निराकृतत्वाच्छ्रुतियुक्तिमानतो यथेंदुभेदो दिशि दिग्भ्रमादयः ॥ ५७ ॥

---

दुःखप्रद साचोकारि ॥ जाणोनि स्वयें ॥ ५८ ॥ तदर्थ जें कर्माचरण ॥ तें टाकिलें जेणें संपूर्ण ॥ अनन्यभावें माझें भजन ॥ करितां जो मीचि झाला ॥ ५९ ॥ ५५ ॥

अभेद भावनें करून ॥ माझें ठायीं हें विश्व संपूर्ण ॥ भावित असे तो सदा जाण॥ नामरूपत्यागें ॥ ६ ॥ हेचि भावना आपणा सहित ॥ अभेदें ज्यासि झाली प्राप्त ॥ मद्रूपचि तो असे होत ॥ आत्माराम स्वयें ॥ ६१ ॥ येविषयीं तुज दृष्टांत ॥ सांगतों ऐक दत्तचित्त ॥ जैसें समुद्रीं प्रवेशत ॥ नद्यांचें जल ॥ ६२ ॥ तें सिंधूच होतसे पूर्ण ॥ अथवा दुग्धामाजी जाण ॥ प्रवेशतां दुग्ध आपण ॥ दुग्धचि होय ॥ ६३ ॥ जैसें महदाकाशीं घटाकाश ॥ प्रवेश करितां निर्विशेष ॥ घटभंगें तें अविनाश ॥ नभचि होय ॥ ६४॥ जैसा भात्यांतील समीर ॥ वायुमाजी प्रवेशतां किर ॥ वायुच होतसे साचार ॥ नामरूप त्यागें ॥ ६५ ॥ तैसा नामरूपात्मक भेद टाकून ॥ जो मिळे मजमाजी येऊन ॥ तो मद्रूपचि पूर्ण ॥ आत्माराम होय ॥ ६६ ॥ ५६ ॥

या रितीं जो आत्मतत्ववेत्ता ॥ त्याचा जगाचेठायीं सर्वथा ॥ सत्यत्वभ्रमचि तत्वतां ॥ दूर होय स्वयें ॥ ६७ ॥ तो जीवन्मुक्तिदशेचे ठायीं ॥ प्रारब्धवशें लोक व्यवहारही ॥ करीत असतां तो भावी ॥ जग मिथ्याचि ऐसें ॥ ६८ ॥ आणि आपण जो प्रत्यगात्मा ॥ आणि तत्पदार्थ जो परमात्मा ॥ यांच्या ऐक्यातें तो महात्मा ॥ पावला असे ॥ ६९ ॥ मग जगासहीत आपण ॥ सर्वथा नाहींच करून ॥ आकारनामरूप जग संपूर्ण ॥ मिथ्यात्वें त्यजिलें ॥ ७० ॥ श्रुतियुक्ति प्रमाणें करून ॥ जग मिथ्यात्वें त्यजून ॥ शुक्तिरजताचे परि संपूर्ण ॥ दिसतांही असे ॥ ७१ ॥ येविषयीं दृष्टांत ऐक ॥ नभीं चंद्र असतांही एक ॥ दोन दिसताति देख ॥ भ्रमास्तव जैसे ॥ ७२ ॥ जालिया पूर्ण चंद्रज्ञान ॥ भ्रम तो जाय दग्ध होऊन ॥ मग शोधितांही दुजेपण॥ न दिसे चंद्रीं ॥ ७३ ॥ किंवा ज्यासि जाला दिशाभ्रम ॥ तो पूर्व तेचि म्हणे पश्चिम ॥ हें भ्रमकार्याचें परम ॥ जाणावें तैसें ॥ ७४ ॥ नौकेंत बैसतां आपण ॥ देखे वृक्ष करिती भ्रमण ॥ भ्रमांतीं म्हणे वृक्ष संपूर्ण ॥ ठायींच असती ॥ ७५ ॥ तैसेंच आत्मज्ञानें करून ॥ अज्ञान गेलिया निपटून ॥ जगद्भ्रमही हा संपूर्ण॥ न उरेचि कोठें ॥ ७६ ॥ मग आपुलेच ठायीं आपण ॥ तो सर्वदा असे रममाण ॥ सर्व व्यवहारींही जाण ॥ अकर्ताचि तो ॥ ७७ ॥ ऐसिया ज्ञानप्राप्तीविषयीं ॥ माझें आराधनचि पाहीं ॥ उपाय असे सर्वथाहि ॥ श्रीराम म्हणे ॥ ७८ ॥ ५७ ॥

॥ यावन्न पश्येदखिलं मदात्मकं तावन्मदाराधनतत्परो भवेत् ॥
॥ श्रद्धालुरत्यूर्जितभक्तिलक्षणो ॥ यस्तस्य दृश्यो हमहर्निशं त्हादि ॥ ५८ ॥
॥ रहस्यमेतच्छ्रुतिसारसंग्रहं मया विनिश्चित्य तवोदितं प्रिय ॥
॥ यस्त्वेतदालोचयतीह बुद्धिमान्स मुच्यते पातकराशिभिः क्षणात् ॥ ५९ ॥
॥ भ्रातर्यदीदं परिदृश्यते जगन्मायैव सर्वं परिहृत्य चेतसा ॥
॥ मद्भावनाभावितशुद्धमानसः सुखी भवानंदमयो निरामयः ॥ ६० ॥

---

मी जगासि अधिष्ठान ॥ विवर्तरूप जग संपूर्ण ॥ माझे ठायीं असे जाण ॥ कल्पितचि हें ॥७९॥ मजसि वेगळें करून ॥ पाहतां जग हें दिसे कोठून ॥ मद्रूपेंचि हें संपूर्ण ॥ रूपा आलें ॥ ८० ॥ ऐसें जो काळ अवलोकन ॥ नाहींच ज्या नराकारण ॥ तों काल सगुणाराधन ॥ करावें माझें ॥ ८१ ॥ हें हरीचेंचि आराधन ॥ ज्ञानप्रापक असे पूर्ण ॥ ऐसा पूर्ण विश्वास जाण ॥ जयासि झाला ॥ ८२ ॥ मग तो अतिशयें वाढती ॥ करीत असे माझी भक्ती ॥ मजहून पूज्य आणिकांप्रति ॥ न देखेचि तो ॥ ८३ ॥ माता पिता गुरू देवता ॥ सर्वस्व ज्याचें मीचि तत्वतां ॥ रात्रंदिवस मातें भजतां ॥ मज वश्य केलें ॥ ८४ ॥ ऐशिया चिन्हें पूर्ण मंडित ॥ जो कां असे माझा भक्त ॥ मदाराधननिष्ठ सतत ॥ होवोचि तो ॥ ८५ ॥ ऐसा जाला जो माझे ठायीं ॥ मी तया भक्तांचे त्हदयीं ॥ दृश्य होत असे पाहीं ॥ रात्रंदिवस पैं ॥ ८६ ॥ जो जैसा मातें भजत ॥ मीही तैसाचि त्यासि प्राप्त ॥ यास्तव भजन प्रेमयुक्त ॥ करावेंचि माझें ॥८७॥५८॥

आतां तोचि रघुनाथ ॥ स्वकीय जें वचनजात ॥ तें श्रुतिसमान असे निश्चित ॥ ऐसें म्हणे ॥ ८८ ॥ लक्ष्मणा तूं अत्यंत प्रिय ॥ आहेस मजसी निःसंशय ॥ यास्तव हें रहस्य काय ॥ वंचावें तुजसीं ॥ ८९ ॥ श्रुतिसारसंग्रह तो येथ ॥ उघड दाविलासे निश्चित ॥ यास्तव हें गुप्तचि बहुत ॥ राखावें तुवां ॥ ९० ॥ म्यां यारितीं निश्चयें करून ॥ बोलिलें असे तुज कारण ॥ शंका कलंकातें त्यजून ॥ अप्रमाणतेच्या ॥ ९१ ॥ जो या रहस्यातें बुद्धिमंत ॥ सदा विचारें असे पाहत ॥ तो पापराशींपासून क्षणांत ॥ मुक्तचि होय ॥ ९२ ॥५९॥

आतां तोचि रघुनाथ ॥ जो षड्गुणैश्वर्यें विराजित ॥ सांगितल्याचि अर्थाप्रत ॥ पुनरपि सांगे ॥ ९३ ॥ व्हावया तें दृढतर ॥ संक्षेपें श्रीरघुवीर ॥ बोलता जाहला सादर ॥ अनुजाप्रति ॥ ९४ ॥ अगा बंधुराया लक्ष्मणा ॥ जें हें जग दिसतें नाना ॥ तें सर्व जाण कल्पना ॥ मिथ्याचि ऐसी ॥ ९५ ॥ आकार आणि नामात्मक ॥ मायाच पावली विस्तार एक ॥ यास्तव जाणें हें मायिक ॥ मिथ्याचि ऐसें ॥ ९६ ॥ याकारणें उदासीन ॥ येथें व्हावेंचि परिपूर्ण ॥ मदैक्यभावनेकरून ॥ असावें युक्त ॥ ९७ ॥ मिथ्यात्वें जगत्परित्याग ॥ करोनिया चित्तें सांग ॥ मद्रूप भावना अभंग ॥ साधावी तुवां ॥ ९८ ॥ तिच्या योगें शुद्ध मानस ॥ होऊन वर्तावें सावकाश ॥ ऐसा श्रीराम उपदेश ॥ अनुजासि करी ॥ ९९ ॥ तूं निरामय होत्साता ॥ सुखी होयगा सर्वथा ॥ पूर्ण ब्रह्म होय तत्वतां ॥ आनंदमय तं ॥ ८०० ॥ सर्व दुःखांची निवृत्ति ॥ करोनि राहें अंतर स्थिती ॥

॥ यः सेवते मामगुणं गुणात्परं हृदा कदा वा यदि वा गुणात्मकं ॥
॥ सोहं स्वपादांचितरेणुभिः स्पृशन् पुनाति लोकत्रितयं यथा रविः ॥ ६१ ॥
॥ विज्ञानमेतदखिलं श्रुतिसारमेकं वेदांतवेद्यचरणेन मयैव गीतं ॥

आनंदरूपचि जरि निश्चितीं ॥ आहेस पूर्वींही ॥ १ ॥ तथापि ही माझी प्राप्ती ॥ होईल तुज ऐसिया रीतीं ॥ कोणी कंठस्थ भूषणाप्रती ॥ विसरली पूर्वीं ॥ २ ॥ पुन्हा त्याचिया लाभापरि ॥ तुजलागी ही गा निर्धारीं ॥ माझी प्राप्ति साचोकारी ॥ होईल पुनः ॥ ३ ॥ ६०॥

ऐशा रितीं जो माझा भक्त ॥ तो सकलही लोकांप्रत ॥ पावन कारितसे निश्चित ॥ तरोनिया स्वयें ॥ ४ ॥ यदा कदाचित तो आपण ॥ निर्मल अंतःकरणें करून ॥ मायातीत जो मी पूर्ण ॥ प्राकृतगुणरहित ॥ ५ ॥ सच्चिदानंद अनंत ॥ सत्व रज तमातीत ॥ त्या मातें जो असे सेवित ॥ अनन्यभावें ॥ ६ ॥ अथवा सर्वज्ञत्वादि लोकोत्तर ॥ लावण्यादि गुण अपार ॥ वर्त्तती जेथें निरंतर ॥ ऐसी मूर्ति ज्याची ॥ ७ ॥ जो सर्वांसी दृश्यमान ॥ अहो सदृढ भक्तीकरून ॥ त्या मज सगुणरूपालागून ॥ भजताहे जो ॥ ८ ॥ तो द्विविधही उपासक ॥ मत्स्वरूपचि असे एक ॥ तो मजसी प्रिय अत्यंतिक ॥ मीहि त्यासि अतिप्रिय ॥ ९ ॥ त्याचें माझें भिन्नपण ॥ नसे कांहींच उरलें जाण ॥ भजनबळें मीचि होऊन ॥ राहिला असे तो ॥ १० ॥ तो स्वपादलग्नरजें करून ॥ स्पर्श करितां आपण ॥ पवित्र करी लोक तीन ॥ श्रीराम म्हणे ॥ ११ ॥ करोनिया अज्ञाननाश ॥ मत्पदप्राप्ती दे सर्वांस ॥ ही पवित्रता इतरास ॥ कोठून घडे ॥१२॥ जैसा रवि स्वकिरणें करून ॥ जगाचे अंधारें दवडून ॥ प्रकाश करीत असे पूर्ण ॥ तैसाचि हाहि ॥ १३ ॥ हरोनिया अज्ञानतम ॥ स्वयें भेटवी आत्मा राम ॥ ऐसा मद्भक्त उत्तमोत्तम ॥ मद्भजनें होय ॥ १४ ॥ ६१ ॥

आतां जो या ग्रंथाचा अर्थ ॥ अवलोकावया नव्हे समर्थ ॥ त्यासि पाठमात्रेंचि यथार्थ ॥ महत्फळ जोडे ॥ १५ ॥ ऐसें स्वमुखें रघुनंदन ॥ बोलता जाला आपण ॥ अगा लक्ष्मणा हें विज्ञान ॥ अतिदुर्लभ असे ॥ १६ ॥ हें विचारयुक्त बुद्धीकरून ॥ जाणिजे तसे संशयहीन ॥ जोडे मद्भक्तांचि लागून ॥ इतरां न मिळे ॥ १७ ॥ उपनिषद्वाक्यें करून ॥ जगज्जन्मादिलक्षण ॥ कर्म ज्याचें संपूर्ण ॥ जाणिजेत असे ॥ १८ ॥ तया म्यांचि स्वमुखें करून ॥ गायिजेलें तुजकारण ॥ हें श्रुतीचें सार संपूर्ण ॥ एकचि असे ॥ १९ ॥ होवोनिया गुरुभक्त ॥ जो पठन करिल श्रद्धायुक्त ॥ तो मद्रूपातेंचि माझा भक्त ॥ पावताहे ॥ २० ॥ म्हणसील पाठमात्रेंचि करून ॥ हा महालाभ घडेल कोठून ॥ तरी सांगतों करी श्रवण ॥ स्वस्थ चित्तें ॥२१॥ माझ्या वचनाचिये ठायीं ॥ जरि भक्ति आहे पाहीं ॥ तरि मद्रूपाचे सर्वथाही ॥ होत असे तो ॥ २२ ॥ सद्गुरुवचनीं पूर्ण विश्वास ॥ प्राप्त असे ज्या सदैवास ॥ सकळही फलप्राप्तीस ॥ तोचि एक पावे ॥ २३ ॥ हें जाणोनि निजमानसीं ॥ श्रीरामें सुमित्रासुतासी ॥ उपदेशिलें गुह्य ज्ञानासी ॥ परिपूर्ण रूपें ॥ २४ ॥ पाहोनि त्याचा अधिकार ॥ उघड दाविलें उपनिषत्सार ॥ तें सेवोनि सौमित्रवीर ॥ घनानंद झाला ॥ २५ ॥ हेंच गुह्य कैलास पर्वतीं ॥ शिवें दिधलें गौरीप्रति ॥ पाहोनि

॥ यःश्रद्धया परिपठेद्गुरुभक्तियुक्तो मद्रूपमेति यदि मद्वचनेषु भक्तिः ॥ ६२॥
हरिःॐ तत्सदिति श्रीरामगीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां
अध्यात्मरामायणे उत्तरकांडे पंचमः सर्गः ॥

तिची सदृढभक्ति ॥ आपुलें ठायीं ॥ २६ ॥ गौरी अथवा लक्ष्मण ॥ या दोघांचें मिष करून ॥ शिव आणि सीतारमण ॥ बोलते जाले ॥ २७ ॥ भाविक जन व्हावे कृतार्थ ॥ गुह्य प्रगटिलें तिहीं तदर्थ ॥ यास्तव हा गीतार्थ ॥ आदरें घ्यावा ॥ २८ ॥ अनंत जन्मांचें सुकृत ॥ जयाचें येईल उदयातें ॥ तोचि सेवोनि हें गीतामृत ॥ अजरामर होईल ॥२९॥ हें एक अध्याय वेदांतशास्त्र ॥ बोलिला श्रीराम अति पवित्र ॥ देखोनि ग्राहक सत्पात्र ॥ लक्ष्मण तेव्हां ॥३०॥ येथें अनुबंधचतुष्टय॥ दाविलें ऐका निःसंशय ॥ अधिकारी सुमित्रातनय॥ जाणोनि घ्यावा ॥ ३१ ॥श्रीराम जो परब्रह्म॥ तोचि येथें विषय उत्तम ॥आतां संबंधही सांगु सुगम ॥ श्रीरामरामगीतेचा ॥३२॥ रामगीता हें प्रतिपादक ॥ प्रतिपाद्य तो रघुनायक॥ हा संबंध अति सम्यक ॥ ओळखावा ॥ ३३ ॥ येथें प्रयोजनें असती दोन ॥ व्हावें जन्ममरणनिवारण ॥ आणि पूर्ण ब्रह्मचि आपण ॥ श्रीराम व्हावें ॥ ३४ ॥ हा अनुबंध चतुष्टय प्रकार ॥ येथें बोलिला असे सविस्तर ॥ सूक्ष्मदृष्टीनें पाहतां विचार ॥ अनुभवासि येतो ॥ ३५ ॥ ही आदिशिवापासून ॥ गीता गंगा भूतळीं पूर्ण ॥ उतरती जाली सिंधु लक्षून ॥ श्रीराम एक ॥ ३६ ॥ तेथें गौरी आणि सुमित्रासुत ॥ स्नानें जाले अति पुनीत ॥ तैसाच श्रीपूर्णानंद नाथ ॥ स्नानें कृतार्थ जाहला ॥ ३७ ॥ मजलागीही तेथें स्नान ॥ तेणेंचि करविलें दयेकरून ॥ योगानंद म्हणे पूर्ण ॥ समाधान जालें ॥ ८३८ ॥ ॥६२॥ श्रीमदध्यात्मरामायणीं ॥ ब्रह्मविद्यानिरूपिणी ॥ अद्वयानंदसुरत्नखाणी ॥ श्रीरामगीता ॥ ३९ ॥ उत्तर कांडीं पंचमाध्याय ॥ तो हे श्रीरामगीता होय ॥ एकाग्रमनें जो इतें ध्याय ॥ तो जीवन्मुक्त ॥ ४० ॥ हे गीता नोहे ऐशी तैशी ॥ जी दशोपनिषदांसरसी ॥ तत्प्रतिपादित ब्रह्मरसीं ॥ हो साधकांसी समाधान ॥ ४१ ॥ इति श्रीमद्रामगीता ॥ वेदांतसारसंग्रहभूता ॥ श्रवणें पठणें तत्वतां ॥ शुद्धि चित्ता करीतसे ॥ ४२ ॥ मननें जी निवटी संशय ॥ निजध्यासें बाणवी अद्वय ॥ ते हे प्रकटवी यतिराय ॥ श्रीयोगानंद॥८४३॥

इतिश्रीमत्पूर्णानन्दयतीन्द्रानुचरश्रीयोगानन्दसरस्वतीविरचिता श्रीरामगीता महाराष्ट्र व्याख्या समाप्ता ॥ ॐ तत् सत् ॥ श्रीगुरुभ्यो नमः ॥

शके सत्राशें ब्यायशी ॥ रौद्रनाम संवत्सराशी ॥ श्रीरामगीता पौषमासीं कृष्णद्वादशीस संपूर्ण ॥ १ ॥ ग्रं० सं० श्लोक ६२ ओंव्या ८४३ एकूण ९०५.

समाप्त.

# प्रस्तावना.

---

जगांतील नाना प्रकारांच्या ज्ञेय वस्तूंचा—ह्म० विद्या, कला, इतिहास इत्यादिकांचा बोध होण्याचें मुख्य साधन काव्य होय. याविषयीं कांहीं विवाद नाहीं. पहा; व्याकरणशास्त्र, न्यायविद्या, ज्योतिःसिद्धान्त अथवा वैद्यकचिकित्सा इत्यादि अनेक विषय परंपरेनें प्रचलित राहण्यास हें काव्यच अत्यन्त उपयोगीं पडलें आहे. जर-विविध शास्त्रांतील अभियुक्त पंडितांनीं त्या त्या विषयांवर उपयुक्त ग्रंथरचना केली नसती तर आमचा प्राचीन आर्यप्रणीत विद्यादिकांचा मागमूसही राहिला नसता हें अगदीं उघड आहे.

एवंच ज्ञानपरंपरेच्या अविच्छिन्न प्रवाहास आदिकारण काव्य आहे, यांत शंका नाहीं. अशा या काव्याच्या रचनेस व ज्ञानास जीं अनेक अंगें, उपांगें आहेत, त्यांत वृत्तविज्ञान हें पहिलें व आवश्यक अंग आहे. काव्याची रचना करणारास तर या वृत्तज्ञानाची अत्यावश्यकता आहेच, परंतु नुसतें अध्ययन करणारास देखील आपाततः तरी तें ज्ञान लागतें. कारण, त्यावांचून वाचनास उल्हासानें प्रवृत्तिच होत नाहीं. तेव्हां पूर्वोक्त काव्यरत्नमंदिरांत सुखानें प्रवेश करून देणारा हा वृत्तज्ञानरूपी मोठा भव्य जिना आहे. हा यद्यपि फार जुनाट ( ऋषिप्रणीत ) आहे तथापि अभंग असून विस्तीर्ण व सुखावहही आहे.

वृत्त अथवा छंद हा विषय जुनाट किंवा अनादि आहे असें जें ह्मटलें आहे त्याची सिद्धता करण्यास प्रयास मुळींच नाहीं. कारण सर्व शास्त्रादिकांस मूलभूत जो अनादि वेद त्याच्या सहा अंगांपैकीं एक अंग वृत्त ( छंद ) आहे हें प्रायः सर्वश्रुत आहे. व याविषयीं वेदांगांमध्येंच असा उल्लेखही आहे.

> " ॥ छंदः पादौ तु वेदस्य हस्तौ कल्पोऽथ पठ्यते ॥
> ॥ ज्योतिषामयनं चक्षुर्निरुक्तं श्रोत्रमुच्यते ॥ १ ॥
> ॥ शिक्षा घ्राणं तु वेदस्य मुखं व्याकरणं स्मृतम् ॥
> ॥ तस्मात्सांगमधीत्यैव ब्रह्मलोके महीयते ॥ २ ॥ "

" शिक्षा, व्याकरण, ( अष्टाध्यायी ) कल्प ( सूत्र ) निरुक्त, ज्योतिष आणि छंद हीं सहा वेदाचीं अंगें होत. त्यांत छंद हे वेदपुरुषाचे पाय आहेत. कल्प हे

हात होत. ज्योतिष हें चक्षु ( नेत्र ), निरुक्त हें श्रोत्र ( कान ), शिक्षा हें घ्राण आणि व्याकरण हें मुख होय. यामुळें सांग वेदांचें अध्ययन केलें तरच ब्रह्मलोकाची प्राप्ति होते. " यावरूनही विचार केला तर असें मनांत येतें कीं, जसें कोणास एखाद्या अभीष्ट स्थानीं जावयाचें असल्यास त्याला पायांची अवश्य अपेक्षा आहे त्याच प्रमाणें वेदार्थरूपी रत्नमय महामंदिरांत प्रवेश करण्यास छंदःशास्त्राची अत्यंत आवश्यकता आहे.

एकंदरींत ज्ञानप्राप्तीच्या मुख्य साधनांत ( काव्यांत ) प्रवेश होण्याचें **प्रथम द्वार छंदःशास्त्र** होय असें ह्मणण्यास चिंता नाहीं. असें असून या अत्युपयुक्त शास्त्राचा प्रचार आपल्या महाराष्ट्र—भाषेंत ह्मणण्यासारखा नाहीं. आतां शास्त्राचा प्रचार नाहीं यावरून त्याची गरजही नाहीं असें मात्र ह्मणतां येणार नाहीं. कारण, **वामनपंडित मोरोपंत, रघुनाथपंडित** इत्यादिकांनीं बऱ्याच वृत्तांतर कविता केल्या आहेत, तेव्हां त्यां वृत्तांचें ज्ञान होण्यास छंदःशास्त्राची मराठी भाषेंत फार आवश्यकता आहे हें कोणीही कबूल करील. व तद्विषयक ग्रंथ असला ह्मणजे महाराष्ट्र कवींकडून विविध-वृत्तमय नवीन काव्येंही महाराष्ट्र भाषेंत पुष्कळ होण्याचा संभव आहे, अशी कल्पना केल्यास निष्फल होणार नाहीं.

ही वृत्तांच्या संबंधाची उणीव मनांत आणून कै. वा. **परशुरामपंत तात्या गोडबोले** यांणीं एक **वृत्तदर्पण** नांवाचें पुस्तक रचिलें आहे व तेवढेंच कायतें या विषयाचें ज्ञान होण्यास प्रस्तुत मराठी भाषेंत उपलब्ध साधन आहे. त्यावरून बऱ्याच लोकांना कांहीं निवडक वृत्तांचें ज्ञानही होत आहे; परंतु तो प्रथम यत्न असल्यामुळें अथवा एकाच ग्रंथाच्या आश्रयानें तें रचिलें असल्यामुळें त्यांत असावा तसा वृत्तसंग्रह नाहीं. त्यांत एकंदर वृत्तें सुमारें ७५ आहेत आणि त्यांतही रचनाविशेषामुळें, संक्षिप्तता ह्मणून जी शास्त्रीय ग्रंथांस अत्युपयुक्त मानिली आहे तिला बराच प्रतिबंध झालेला आहे. तथापि सुबोधतेच्या संबंधानें सांप्रत नवाभ्यासी लोकांस तें पुस्तक पुष्कळ उपकारक झालें आहे, यांत संदेह नाहीं; तथापि प्रथम यत्नच शेवटला होऊन राहणें ज्ञानप्रसाराचे कामीं अगदीं अनिष्ट आहे. व त्या अन्वयें प्रस्तुत विचार केला असतां वृत्तविषयक ग्रंथाची ही महाराष्ट्रभाषेंत अतिविरलता मोठी शोचनीय आहे असें मनांत आणून व प्रौढ जिज्ञासूंस उद्देशून आह्मी हें '**वृत्तमणिमाला**' नांवाचें पुस्तक रचिलें आहे. याचीं विषयभेदास अनुसरून, पांच प्रकरणें केलीं आहेत व त्यांस, गुंफ असें नांव दिलें आहे.

**वृत्तमणिमाला** रचतांना आह्मीं **छंदोमंजरी, वृत्तरत्नाकर, पिंगलछंद** या ग्रंथांचें साहाय्य घेतलें आहे ; त्यांत हीं उदाहरणें रचतांना **पिंगल-छंदावरील** वृत्तिकार जो भट्ट **हलायुध** त्याचें व 'छंदोमंजरी' कर्त्याचें विशेष अनुकरण केलें आहे. हें सांगणें येथें उचित आहे. या **वृत्तमणिमालेंत** पहिल्यापासून जीं प्रकरणें आलीं आहेत त्यांचा अनुक्रम असा आहेः–प्रथम गुंफांत मंगलाचरण झाल्यानंतर संज्ञाप्रकरण सांगितलें आहे–दुसऱ्यांत एक अक्षरापासून सव्वीस अक्षराच्या चरणापर्यंत विविध वृत्तें पूर्वोक्त ग्रंथांत असलेलीं व दंडक हे सांगितले आहेत. तिसऱ्यांत अर्धसम वृत्तें, चवथ्यांत विषम वृत्तें आणि पांचव्यांत मात्रावृत्तें व वैतालीय वृत्तें सांगितलीं असून आणखीही भिन्न लक्षणांच्या व पूर्वीं न आलेल्या कांहीं वृत्तांचें दिग्दर्शन केलें आहे.

या प्रमाणें पंचगुंफात्मक ही **मणिमाला** असून इजमध्यें वरील ग्रंथांचा विषयसंग्रह प्रायः सर्व आला आहे. ही माला सुगम संक्षिप्त आणि रमणीय करण्याविषयीं आरंभापासून व मनःपूर्वक यत्न केला आहे– इजमध्यें एकंदर वृत्तें सुमारें ३५० पर्यंत उदाहरणांसह आलीं आहेत. या वृत्तांची रचना केली आहे, ती अशीः– प्रथम जें वृत्त लिहावयाचें त्याचें लक्षण– गण व यति– त्याच वृत्ताच्या एका चरणांत वृत्तनाम. निर्देशपूर्वक सांगितलें आहे. आणि नंतर उदाहरणाचा पूर्ण श्लोक लिहिला आहे. उदाहरणांच्या सर्व श्लोकांत प्रायः श्रीकृष्णवर्णन हाच एक विषय धरिला असून त्या संबंधानेंच त्या त्या वृत्ताचें नांवही त्या त्या श्लोकांत आणिलें आहे. यामुळें प्रत्येक श्लोक रसिक वाचकांस चमत्कारोत्पादक वाटण्यासारखा आहे. तसेंच सर्व उदाहरणांच्या रचनेंत संस्कृत काव्यांतून प्रचुर आढळणारें पदलालित्य व अर्थसौष्टव सरलतेस बाध न येतां येईल तितकें आणण्याचा यत्न केला आहे.

येथें आणखीही एक गोष्ट सांगितली पाहिजे, ती ही कीं– वृत्तांचीं उदाहरणें जशीं आह्मीं रचिलीं आहेत त्याच रचनाविशेषाचा स्वीकार करून मराठींत रामचंद्र शास्त्री कोल्हापूरकर-- यांणीं रचिलेली छंदोमंजरी आह्मांस येथील प्राचीन शास्त्रीमंडळीं पैकीं एकापासून मिळाली होती व ती ज्यांपासून मिळाली ते गृहस्थ वेदशास्त्रसंपन्न बाळशास्त्री देव यांचे शिष्यवर्गांतील असून त्यांनीं ती समग्र छापण्याविषयीं आह्मांस सांगितलें होतें ; परंतु आह्मी पांच च्यार ग्रंथांचा संग्रह करून हा स्वतंत्र ग्रंथ लिहिण्याचा निश्चय केला असल्यामुळें आह्मांस तो ग्रंथ समग्र छापतां आला नाहीं ; तथापि आह्मी त्यांतील कित्येक निवडक श्लोक आपल्या उदाहरणाखालीं अवतरणचिन्हांत घेतले आहेत. त्यांजमध्यें वरील ग्रंथकारानें आणखी एक विशेष प्रयत्न केला आहे, तो हा कीं, श्लोकांतील प्रथम चरणांत जीं पदें घातलीं आहेत त्यांत

त्या त्या गणाचे सूचक प्रथमाक्षर येईल अशी योजना केली आहे. ही योजना चातुर्या-ची व बऱ्याच खटपटीची आहे यांत शंका नाहीं.

आतां या ( **वृत्तमणिमालेंत** ) जीं बरींच अप्रसिद्ध वृत्तें आहेत तीं एकद-म सुश्राव्य अशीं ह्मणतां येत नाहींत; परंतु, त्यांचे विरामावर लक्ष ठेवून ह्मणूं लागलें असतां चांगलीं ह्मणतां येतात इतकेंच नाहीं तर तें विरामस्थान हें अवसान समजून सुस्वर व तालांत जर ह्मटलीं तर तीं अगदी सुरेख व सप्रमाण ह्मणतां येत असून फार-च आनंददायक वाटतात, याची प्रतीति गायकांच्या साहाय्यानें आह्मीं स्वतां घेऊ-न पाहिली आहे.

अस्तु याप्रमाणें छंदःशास्त्राविषयीं हें नवीन पुस्तक महाराष्ट्र भाषेंत प्रकृत विष-याचा विशेष प्रचार होण्याच्या इच्छेनें आह्मीं रचिलें आहे, तर सर्व कवि व रसिक जन या पुस्तकाचा अनुभव घेऊन ग्रंथकाराच्या इच्छेचें व प्रयत्नाचें साफल्य करितील-अशी आशा प्रकट करून हा बराच लांबलेला प्रस्तावनालेख पूर्ण करितों.

ग्रंथकर्त्ता.

# ॥ अथ वृत्तमणिमाला प्रारभ्यते ॥

## ॐ नमः पिङ्गलाय

### मंगलाचरणम्.

( प्रहर्षिणी. )

॥ नागास्यं नगतनयामनोविनोदं नत्वा तामथ वरदां गिरं गुरुंच ॥
॥ छात्राणां विबुधतरुं, तता सुवृत्ता सेयं मे भवतु कृतिः **प्रहर्षिणी वः** ॥ १ ॥

( रथोद्धता. )

॥ लक्ष्मणा**मया**विहारिणं प्रभुं राघवं धृतर**सं** सुकण्ठके ॥
॥ वातजप्रणयिनं सुभान्वितं नौम्यहं **नलस**खं जगद्गुरुम् ॥ २ ॥

( स्रग्धरा. )

॥ **धीः श्रीः स्त्री** ते **वरा सा** क्व वसतिरधुना भूभृतः **का गुहा** ते ॥
॥ केनाक्रान्ता त्वदीया रघुवर **वसुधा** किं च **सा ते** क्व माता ॥
॥ कान्तारं त्वं **कदा स** प्रिय इदमविशः किं **वदा**स्मिन्निदानं ॥
॥ भिल्लीवाग्भल्लतुन्नास्त्विति **न ह स** वदंल्लज्जितः पातु रामः ॥ ३ ॥

---

१ " पर्वतराजकन्येच्या ( पार्वतीच्या ) मनास आनंद देणाऱ्या गजाननाप्रत, **वरदा सरस्वतीस** आणि विद्यार्थिजनांस केवळ कल्पतरू ( इष्टदाता ) **सद्गुरूस नमन** करून रचिलेली ही माझी कृति ( ग्रंथरूप. ) तुह्मांस [१]**प्रहर्षिणी** ह्मणजे हर्षदायक **होवो**" ( २ ) [२]**लक्ष्मणाचें** दुःख निवारण करणारा, सुग्रीवावर प्रीति ठेवणारा, **मारुती-विषयीं** परम कृपाळु, कांतिमान्, **नलवानराचा** मित्र आणि गुरु अशा प्रभु **श्रीरामचं-द्रास** मी स्तवितों " ( [३]३ ) हे रामचंद्रा ! तुझी ती श्रेष्ठ बुद्धि, लक्ष्मी आणि **स्त्री** कोठें **आहे ?** हल्लीं कोणत्या पर्वताची गुहा तुझी निवासभूमि आहे? तुझी पृथ्वी ( राज्य. ) कोणी हरण केली ? तशीच तुझी माता सांप्रत कोठें आहे? तूं आपल्या

---

१ येथें ' प्रहर्षिणी ' हा शब्द श्लिष्ट आहे. याचा दुसरा अर्थ ' एक वृत्त ' असा असून वरील श्लोक त्याच वृत्तांत असल्यामुळें हा 'मुद्रा' अलंकार आहे. २ या श्लोकांत रामचंद्राच्या वर्णनांत क्रमानें 'म य र स त ज भ न ल' आणि 'गुरु' हीं गणांचीं नांवें आणिलीं आहेत. ह्मणून हा 'रत्नावलि' अलंकार होय. ३ यांत ' म ' ' य ' इत्यादि गणांचीं उदाहरणें जीं वैदिक छंदांत आहेत तीं क्रमानें शबरीच्या प्रश्नांत साधि-ल्यामुळें वरीलच अलंकार होतो,

## अनुबंधवर्णनम्.

( आर्या. )

॥ आश्रित्य हलायुधबुधवरविरचितवृत्ति पैङ्गलं सूत्रम् ॥
॥ संगृह्य वृत्तरत्नाकरमपि छंदः सुमंजरीं चित्वा ॥ ४ ॥
॥ ललितोज्वलमधुरतनु र्हृदयचमत्कारिणी च संक्षिप्ता ॥
॥ कविकण्ठभूषणार्थं वितन्येत वृत्तमणिमाला ॥ ५ ॥

( उपजाति. )

॥ सुखेन वै लौकिकवृत्तबोध–प्रलब्धये वाक्परिशुद्धये च ॥
॥ साहित्यलालित्ययुतं निबन्धं कुर्वे महाराष्ट्रविशुद्धवाचा ॥ ६ ॥

( अनुष्टुप्. )

॥ हन्त यद्यपि भूयांसश्छंदोबंधाः पुरातनाः ॥
॥ माहाराष्ट्रियबोधाय तदप्येष ममोद्यमः ॥ ७ ॥

( इति प्रस्तावना )

---

प्रियेसहित या अरण्यांत प्रवेश कधीं केलास आणि तो करण्याचें कारण काय हें सर्व मला सांग. याप्रकारें शबरीच्या प्रश्नरूपी वाग्बाणांनीं टोंचलेला व लज्जित झाल्यामुळें कांहीं एक प्रत्युत्तर न देणारा राम आमचें रक्षण करो. ( ४ ) महापंडित हलायुध यानें ज्यावर वृत्ति ( टीका ) केली आहे अशा पिंगल-रचित सूत्राचा ( 'छंद' नामाचा आर्ष सूत्रग्रंथ, पक्षीं दोरक ) आश्रय करून, तसेंच वृत्तरत्नाकरा ( एक ग्रंथ, पक्षीं वृत्तरूप रत्नांचा समूह ) चा संग्रह करून आणि छंदोमंजरी ( एक ग्रंथ पक्षीं छंदरूपी दिव्य तुरा ) चाही संचय करून; (५) कवींच्या कंठभूषणाकरितां, लालित्ययुक्त, शुद्ध व मधुर जिची तनु आहे आणि जी संक्षिप्त असून ऱ्हदयास आल्हाद करणारी अशी वृत्तरूपी रत्नांची माळ मी गुंफितों. ( ६ ) सुखानें लोकप्रसिद्ध वृत्तांचें परिज्ञान वाचकांस व्हावें, आणि आपल्या वाणीची सर्वप्रकारें शुद्धता व्हावी यासाठीं साहित्य ( अलंकार ) शास्त्रोक्त लालित्य ज्यामध्यें आहे असा हा वृत्तविषयक ग्रंथ अत्यंत शुद्ध अशा महाराष्ट्रभाषेनें मी रचितों. ( ७ ) आतां यद्यपि छंदाविषयींचे प्राचीन संस्कृत ग्रंथ पुष्कळ आहेत तथापि महाराष्ट्रभाषा जाणणाऱ्या लोकांस वृत्तज्ञान होण्याकरितां हा माझा उद्योग आहे, म्हणून सफल आहे.

( ही प्रस्तावना झाली. )

---

१ येथें 'वृत्तमणिमाला' या श्लिष्ट शब्दावरून प्रस्तुत 'वृत्तमणिमाला' नांवाच्या ग्रंथावर म-ल्हानमंजरीयुक्त रत्नमाला असा आरोप असून तिचीं अंगें ह्म० सूत्र, रत्नें, मंजरी, हीं 'पिंगलसूत्र' 'वृत्तरत्नाकर' व 'छंदोमंजिरी' या ग्रंथांवर आरोपित केलीं आहेत, ह्मणून हा श्लिष्टपरंपरित व सांग असा 'रूपक' अलंकार होय.

## संज्ञाप्रकरण.

( आर्या. )

॥ हें **मयरसतजभनलग** दशगणपरिगणित शास्त्र जगीं ज्याचें ॥
॥ तो **पिंगल** नाग जयें वर्ते गिरिशप्रसादपद साचें ॥ १ ॥
॥ जाणा जो त्रिगुरु **मगण** आदिलघुहि तो **यकार** तैसाच ॥
॥ लघुमध्यम **रगण** गणा अंतीं गुरु **सगण** होय तो साच ॥ २ ॥
॥ अंतीं लघु **तगण** तसा मध्यें गुरु तो **जकार,** आदिगुरु ॥
॥ **भगण,** तसा सर्वलघुचि **नगण** गणी **पिंगलाख्य** आदिगुरु ॥ ३ ॥
॥ आदीं मध्यें अंतीं पावति हे **य र त** लाघवातेंच ॥
॥ भजती **भ ज स** गुरुत्वा **म न** गौरव लाघवा क्रमें साच ॥ ४ ॥
॥ दीर्घप्लुतसंयोगप्राग्गत कीं व्यंजनान्त जो वर्ण ॥
॥ सविसर्गानुस्वाराहि गुरुचि विकल्पें पदान्तलघु पूर्ण ॥ ५ ॥
॥ एक गुरूस ग म्हणती एक लघूहि जाण तरि लकारा हो ॥
॥ रेषा सरळ लघूची वक्र गुरूचीहि खूण मानें राहो ॥ ६ ॥

### अक्षरमात्रागणांचीं उदाहरणें:—

( आर्या. )

॥ '**मांधाता**' **म** '**यशोदा**' **य** '**राधिका**' **र** '**सरमा**' **स** '**ताटंक**' ॥
॥ **त** '**जलौघ**' **ज** '**भारत**' **भ**हि '**नकुल**' **न** गण जाण अष्ट निष्टंक ॥७॥
॥ हे अक्षरगण परिसें बा मात्रागणाहि पांच '**माया**' **म** ॥
॥ '**सरमा**' **स** '**जलौघ**' **ज** '**भारत**' **भ**हि नरपति **न** पंचमा नाम ॥ ८ ॥
॥ अक्षरगण तो त्र्यक्षर लघुगुरुपदविनिमयेंचि अष्टविध ॥
॥ मात्रागण मात्र,चतुर्मात्र गणिति पंचधा तयास बुध ॥ ९ ॥
॥ लघुवर्ण एकमात्रक गुरुवर्णों धरिति दोन जन मात्रा ॥
॥ हे अक्षरमात्रागण आश्रय छंदाचिया विषयमात्रा ॥ १० ॥

### परिभाषा.

॥ **पद्यीं** चतुष्पदें, वदती तें द्विविधचि **वृत्त जाति** या नामें ॥
॥ अक्षरगणभव वृत्तचि मात्रागणभूति जाति ती नामें ॥ ११ ॥
॥ **सम अर्धसम**हि विषमहि वृत्त असें तें असे जनीं त्रिविध ॥
॥ चारी चरण जयाचे समान **समवृत्त** त्यास म्हणति बुध ॥ १२ ॥
॥ प्रथम तृतीय जया सम द्वितीयसा तुर्य तेंचि **अर्धसम** ॥

---

१ शिव. २ आदलाबदल. ३ कांहीं ग्रंथांत या गणांची प्रथम योजना केली असतां त्यांचीं भिन्न भिन्न फळें सांगितलीं आहेत. त्यांवरून प्रथम योजनेस 'म' 'य' 'भ' आणि 'न' हे गण प्रशस्त आहेत. आणि बाकीचे 'र' 'स' 'त' आणि 'ज' हे प्रशस्त नाहींत. ४ श्लोक. ५ च्यार चरणांचा. ६ दोन प्रकारांचें. ७ होणारें. ८ झालेली.

॥ ज्यांतहि पद भिन्न जया सत्कविवर म्हणति वृत्त तें **विषम** ॥ १३ ॥
॥ जिव्हेस इष्ट जें कीं विश्रामस्थान त्यासि म्हणति **यति** ॥
॥ विच्छेदविरामादिक संज्ञा[1]हि यथेच्छ तीस कवि देती ॥ १४ ॥

**शिखरिणी.**

॥ जयां कांहीं छंदां यति नियमिती प्राक्तन[2] कवी ॥
॥ पदांतीं शोभे ती स्वरुचि[3] पदभंगीं न मिरवी ॥
॥ जरी ते तेथेंही स्वरविहितसंधी[4] तरि बरी ॥
॥ जसें:—होवो नंदात्मज सरूप मंदा मजवरी ॥ १५ ॥

**आर्या.**

॥ हे यतिनियंति[5] पुरातन **मांडव्य श्वेतमुख्य** नादरिती ॥
॥ अनुसरती काव्यपथा **जयदेव मुरारि माघ** त्याच रितीं ॥ १६ ॥
॥ एकाक्षर चरणातें आरंभुनि वाढवूनि एकैक ॥
॥ उक्तादिसंज्ञ[6] छंदें षड्विंशति[7] होति जाण निःशंक ॥ १७ ॥
॥ **उक्तात्युक्ता मध्या** तशी **प्रतिष्ठा**हि **सुप्रतिष्ठा** ती ॥
॥ **गायत्र्युष्णिगनुष्टुप् बृहती** ती **पंक्ति त्रिष्टुभा**हि **जगती** ॥ १८ ॥
॥ **अतिजगती शक्करि अतिशक्करि** ती **अष्टि** तेंवि **अतिपूर्वा** ॥
॥ **धृति अतिधृति कृति प्रकृति**हि **आकृति विकृति** प्रसिद्ध ते सर्वा ॥ १९ ॥
॥ तैशी **संस्कृति अतिकृति उत्कृति** षड्विंशतीच या जाती[8] ॥
॥ यांत विशेषाहि बहुविध[9] अनुक्रमें तेचि वर्णिले जाती ॥ २० ॥

इति **वृत्तमणिमालायां** संज्ञापरिभाषादिवर्णनः प्रथमो गुंफः संपूर्णः

---

# गुंफ २.

## समवृत्तें.

### उक्ता.

( प्रस्तार. २ )

( एकाक्षरी वृत्तें. १. )

लक्षणः— ॥ १ ॥ **गश्री.** ॥ १ ॥

उदाहरणः— ॥ **श्री[10] ते** ॥ तूंतें ॥ १ ॥

---

१ नांव. २ प्राचीन. ३ शोभा. ४ स्वराशीं संधि केला असल्यास. जसें—'नंद' याचा 'आत्मज' यांतील 'आ' शीं संधि असल्यामुळें पदान्त नसूनही यति आहे. ५ नियम. ६ 'उक्ता' 'अत्युक्ता' इत्यादि पुढील तीन आर्यांत सांगितलेल्या ७ सव्वीस. ८ संज्ञा ( नांवें ) ज्यांस आहेत अशीं. ९ वर्ग सामान्यप्रकार. ९ अनेक प्रकारांचें. १० लक्ष्मी. पक्षीं वृत्താचें नांव. याचप्रमाणें पुढील सर्व उदाहरणांत अर्थाच्या संबंधानें वृत्तांचीं नांवें आणिलीं आहेत.

अत्युक्ता. ( प्र० ४ )

( द्व्यक्षर वृत्तें. १. )

॥ १ ॥ गा स्त्री. ॥ २ ॥

॥ गोपस्त्रीशीं ॥ खेळे हौसी ॥ २ ॥

मध्या ( ८ )

( त्र्यक्षरवृत्तें. २ )

॥ १ ॥ मा नारी. ॥ ३ ॥

॥ गोपाची नारी ते ॥ आलिंगी शौरी तें ॥ ३ ॥ अथवाः—

'॥ श्रीवाणी वाखाणी॥ संसारीं ही नारी ॥ १ ॥'

॥ २ ॥ रा मृगी. ॥ ४ ॥

॥ ती मृगी—लोचना ॥ राधिका ये मना ॥ ४ ॥ अथवाः—

'॥ हा मुनी पाहुनी ॥ का उगी हे मृगी ॥ १ ॥'

प्रतिष्ठा. ( १६ )

( चतुरक्षरवृत्तें. २ )

॥ १ ॥ मा गा कन्या ॥ ५ ॥

॥ भास्वत्कन्या । ती कीं धन्या ॥ जीच्या तीरीं । खेळे शौरी ॥ ५ ॥ अथवाः—

'॥ विद्या येती । धान्यें शेतीं ॥ त्या या धन्या । द्यावी कन्या ॥ १ ॥'

॥ २ ॥ न ग सती. ॥ ६ ॥

॥ यदुपती । तुजप्रती ॥ प्रणत ती । व्रजसती ॥ ६ ॥

सुप्रतिष्ठा. ( ३२ )

( पंचाक्षरीवृत्तें. २ )

॥ १ ॥ भाग ग पंक्ति. ॥ ७ ॥

॥ वत्सकपंक्ति । श्रीहरिसंगें ॥ काननिं चाले । अत्यनुरागें ॥ ७ ॥ अथवाः—

'॥ शेवतिखालीं । तो वनमाली ॥ सांगुनि युक्ति । बैसवि पंक्ति ॥ १ ॥'

॥ २ ॥ सलगीं प्रिया. ॥ ८ ॥

॥ व्रजवासिनी । तरुणस्त्रिया ॥ बहु जाहल्या । हरिला प्रिया ॥ ८ ॥

गायत्री ( ६४ )

( षडक्षरी वृत्तें. ९. )

॥ १ ॥ तें यें तनुमध्या ॥ ९ ॥

॥ नीलाभ नभीं ते । जैसी नवसंध्या ॥ कृष्णीं धरि रागा । राधा तनुमध्या ॥ ९ ॥

॥ २ ॥ न य शशिवक्त्रा. ॥ १० ॥

॥ शशिवदना त्या । व्रजवनितांची ॥ अधरसुधा तो । मधुरिपु याची ॥ १० ॥

---

१ दोन गुरु. २ कृष्णास. ३ यमुना. ४ वृंदावनांत. ५ निळ्या रंगाचें. ६ सांजवेळ. ७ प्रीति व रक्तता. ८ कुशाकाठि पक्षीं एकवृत्त.

॥ ३ ॥ य यीं सोमराजी. ॥ ११ ॥

॥ हरी **सोमराजी** । परी त्वद्यशोभा[1] ॥ हरी ध्वांततोपा[2] करी **सद्यः**[3] शोभा ॥११॥

॥ ४ ॥ ता सा वसुमती. ॥ १२ ॥

॥ कृष्णांघ्रिकमलें । जीमाजिं विमलें ॥ मोदें भ्रमति ती । धन्या **वसुमती** ॥ १२॥

॥ ५ ॥ विद्युल्लेखा मागा. ॥ १३ ॥

॥ भक्तांच्या संतोषा॥ सोडी इच्छावर्षा॥ मेघश्यामीं देखा ॥ राधा **विद्युल्लेखा**॥१३॥

उष्णिक् ( १२८ )

( सप्ताक्षरी वृत्तें. ४ )

॥ १ ॥ न न ग मधुमती ॥ १४ ॥

॥ रविदुहितृतटीं[4] ॥ सुखवि **मधुमती**[5] ॥ यदुपतिहृदया । नवकुसुमततती[6] ॥ १४ ॥

॥ २ ॥ कुमारललिता ज् स् गीं ॥ १५ ॥

॥ मुरारितनुवल्ली । **कुमारललिता**[7] ते ॥ प्रमोद बहु देते । वनांत वनितांतें॥१५॥

॥ ३ ॥ मा सा गा मदलेखा. ॥ १६ ॥

॥ **हस्तीशीं** लढतानां । त्याची ती **मदलेखा** ॥ लागे श्रीपति देहीं । कस्तूरीसम **देखा** ॥१६॥

॥ ४ ॥ सरगा हंसमाला. ॥ १७ ॥

॥ **बघुनी मेघकाला** । त्वरिता जावयाला ॥ निघते मानसाला । विमला **हंसमाला** ॥१७॥

अनुष्टुप् ( २५६ )

( अष्टाक्षर वृत्तें. ९ )

॥ १ ॥ चित्रपदा भ भ गागा. ॥ १८ ॥

॥भानुसुता तटदेशीं। गोपवधू रतिलोला॥ श्रीपतिची गति रक्षी। **चित्रपदा**[8] जगवाला॥१८॥

॥ २ ॥ भा त ल गा माणवक. ॥ १९ ॥

॥ चंचलचूडा[9] चपला ॥ वत्सकुलाच्या रसिका ॥
॥ ध्याइं सख्या हास्यमुखा ॥ नन्दसुता **माणवका**[10] ॥ १९ ॥

॥ ३ ॥ मा मा गा गा विद्युन्माला ॥ २० ॥

॥ वस्त्रीं शोभे **विद्युन्माला** ॥ पिच्छश्रेणी[11] चापश्रीला ॥
॥ दावी ज्या, तो मेघश्याम ॥ गायी चारी सद्विश्राम ॥२०॥

॥ ४ ॥ रा ज गा समानिकाल ॥ २१ ॥

॥ ज्यास कृष्णपादपद्म ॥ होय हृत्तडागसद्म[12] ॥
॥ धी **समानिकाच** त्यास ॥ योग्य तो न मत्सरास ॥ २२ ॥

**अथवाः**— ' ॥ पंढरीस जावयास ॥ ते स्थळीं रहावयास ॥
॥ चाल होय दुःखहानि.॥ सांगतों तयांस **मानि** ॥ २ ॥ '

---

१ तुझ्या यशाची कांति. २ अंधकार व तापयांस. ३ तत्काळ. ४ यमुना. ५ मध जींत आहे ती. पक्षीं वृत्ताचें नांव, ६ नव पुष्पांचा समूह. ७ बाळ व सुंदर १० एक वृत्त ८ चमत्कारिक पदन्यास जींत आहे अशी पक्षीं वृत्त. ९ लहान शेंडी. १० बालकपक्षी. वृत्त. ११ मोरांच्या पिसांची ओळ. १२ हृदयजलाशयांत राहणारे.

**॥ ५ ॥ ज रा ल गा प्रमाणिका ॥ २३ ॥**

॥ करो पवित्र अच्युतांघ्रिपद्मभक्ति अच्युता[1] ॥
॥ श्रुति–स्मृति–**प्रमाणिका** भवांबुराशि[2]तारिका ॥ २३ ॥ **अथवाः—**
'॥ घरांत सासु एकली ॥ तिशीं करून ये कली ॥
॥ हरी तुलाचि राधिका ॥ वरी दिसे **प्रमाणिका** ॥ १ ॥ '

**॥ ६ ॥ न भ ल गा गजगती ॥ २४ ॥**

॥ रविसुतामलतटीं ॥ हारिस लोचनपुटीं ॥
॥ बहु सुखावहचि ती ॥ व्रजवधू **गजगती** ॥ २४ ॥

**॥ ७ ॥ माना हंसरुत गागा ॥ २५ ॥**

॥ शौरीच्या पारिसतांना ॥ वेणूतें व्रजसतींना ॥
॥ कैसें **हंसरुत**[3] खासें ॥ कर्णांतें कटुचि भासे ॥ २५ ॥

**॥ ८ ॥ नाराचिका त रा लगा ॥ २६ ॥**

॥ वृंदावनांत लाघवी ॥ वेणूंत गीति वाजवी ॥
॥ गोपीहृदब्जकुड्मलीं[4] ॥ **नाराचिकां**[5]चि भासली ॥ २६ ॥

**॥ ९ ॥ वितान यांहूनि अन्य ॥ २७ ॥**

॥ कलिंदजा[6]तीरभूमी ॥ सुमंचिका फार नामी ॥
॥ **वितान**[7] तें चंद्रकान्ती ॥ व्रजांगना सौख्य घेती ॥ २७ ॥

बृहती.( ५१२ )

( नवाक्षरवृत्तें. ९ )

**॥ १ ॥ भुजगशिशुभृता ना म ॥ २८ ॥**

॥ न्हद[8]तटनिकट क्षोणी ॥ **भुजगशिशुभृता**[9] होती ॥
॥ अहिपति[10] दमितां कृष्णें ॥ व्रजजनसुखदा हो ती ॥ २८ ॥

**॥ २ ॥ त्या मणिमध्यातें भ म स ॥ २९ ॥**

॥ कालियभोगीं तुल्य नभा ॥ तन्मणि[11]बंधीं कृष्ण उभा ॥
॥ चित्र जयाचे पाद सुखें ॥ नृत्य करी तो हास्यमुखें ॥ २९ ॥

**॥ ३ ॥ सजरीं भुजंगसंगता ॥ ३० ॥**

॥ तरला तरंगरिंगिता ॥ यमुना **भुजंगसंगता**[12] ॥
॥ तिजला सदा कसा स्वतां ॥ हरि जाय वत्स चारितां ॥ ३० ॥

**॥ ४ ॥ रानसा तरि हलमुखी ॥ ३१ ॥**

॥ वेणुनाद मधुर वनीं ॥ ऐकतांचि तरल मनीं ॥
॥ नंदसूनुसुरतसखी ॥ ये प्रसाद**बहलमुखी**[13] ॥ ३१ ॥

---

१ अखंडित. २ संसार–समुद्र. ३ हंसाचा शब्द, पक्षीं वृत्त. ४ हृत्कमळाची कळी. ५ बाण पक्षीं वृत्त. ६ यमुना. ७ छतपक्षीं वृत्त. ८ डोह. ९ सर्पांच्या पिलांनीं युक्त. १० कालिय. ११ त्याच्या मणकर्यांच्या संधींत. १२ सर्प व जार. १३ प्रसन्नमुख.

अथवा:— ' ॥ रोमशानन पसरलें ॥ वांकडे कर न सरले ॥
॥ पाहुनी नचि वधु सुखी ॥ होतसे नर हलमुखी ॥ १ ॥ '

॥ ५ ॥ रानरा ह्मणति भद्रिका ॥ ३२ ॥

॥ ती विलासिजनभद्रिका ॥ पाहुनी धवल चंद्रिका ॥
॥ पातली विपिनिं राधिका ॥ श्रीहरिप्रियसुसाधिका ॥ ३२ ॥

पंक्ति ( १०२४ )

( दशाक्षरी वृत्तें ३३ )

॥ १ ॥ रुक्मवती ती भामसगांही ॥ ३३ ॥

॥ ऊर्जित ज्या वाणीत नुचित्तीं ॥ संतत कंसारीवरि भक्ति ॥
॥ राज्यपदीं सौधावलि माना ॥ रुक्मवती त्या विघ्नसमाना ॥

अथवा:— ॥ भूषण माथ्यापासुनि तीचें ॥ भास्वर रत्नीं युक्त सतीचें ॥
॥ पीतचि राधा स्वर्ण नगानीं ॥ रुक्मवती ती गाइलि गानीं ॥ १

॥ २ ॥ जाणा मत्ता मभसग—युक्ता ॥ ३४ ॥

॥ ती भृंगाली मधुरस प्याली ॥ कालिन्दीच्या सुविमल कूलीं ॥
॥ मत्ता गोपींप्रति रतिकालीं ॥ अत्यासक्ता करि घननीलीं ॥ ३४ ॥

अथवा:—॥ " माध्वी कुंभांतुनि सखि घेते ॥ क्रीडास्थाना डुलत निघे ते ॥
॥ कामाग्नीची लहरि शमाया ॥ मत्ता गोपी हरिशिं रमाया " ॥ १

॥ ३ ॥ न ज न गुरु त्वरितगति ॥ ३५ ॥

॥ त्वरितगति व्रजयुवति ॥ अजि यमुनावनगत ती ॥
॥ रतिगुरुनें मुरदमनें ॥ रमविलि हो मुदितमनें ॥ ३५ ॥

॥ ४ ॥ न र ज गीं मनोरमा जरी ॥ ३६ ॥

॥ तरणिजातटीं विहारिणी ॥ व्रजवधूविलासकारिणी ॥
॥ हरितनू तुझी अनुत्तमा ॥ कुशलदा असो मनोरमा ॥ ३६ ॥

॥ ५ ॥ होतें शुद्धविराट् म सा ज गा ॥ ३७ ॥

॥ वर्णावें बहु ज्यास आगमें ॥ तो नंदा निजवाळसा गमे ॥
॥ योगी शुद्धविराट मानिती ॥ त्या राधा प्रिय जार मानि ती ॥

अथवा:—" ॥ मानी जो सकला जना हरी ॥ ज्ञानें संचित भाव संहरी ॥
॥ जो स्वात्मानुभवांत राहिला ॥ तेणें शुद्धविराट पाहिला ॥ १

॥ ६ ॥ कामदा शरीं रा य जा गुरू ॥ ३८ ॥

॥ काय चित्र हें कीं जनार्दना ॥ वांछिती तुला गोकुलांगना ॥
॥ देवकीसुता देव कीं सदा ॥ सेविती तुझी मूर्ति कामदा ॥ ३८

---

१ मुखिंमत. २ राजवाड्यांची पंक्ति. ३ सुवर्णयुक्त, प० वृत्त.

**॥ ७ ॥ मा ना या पणवचि गा नामें ॥ ३९ ॥**

॥ आकाशीं **पणव[1]मुखें** तूर्यें ॥ देवांचीं निरखुनि **चातुर्यें** ॥
॥ श्रीशौरी अनुसरुनी त्यातें ॥ सर्पाच्या शिरिं करि नृत्यातें ॥ ३९ ॥

अथवाः— “ ॥ मोहाशा न धरिं यदुश्रेष्ठा ॥ चित्तीं त्यावरिच वरी निष्ठा ॥
॥ साधूच्या पदिं झिजवीं देहा ॥ त्वत्कीर्तिपणवचि वाजो हा ॥ १ ॥

**॥ ८ ॥ रा ज रा मयूरसारिणी गा ॥ ४० ॥**

॥ निश्चला करूनिया मतीतें ॥ जो हरीवरी धरी रतीतें ॥
॥ अंबुदीं[3] **मयूरसारिणी** तो ॥ देव साक्कार त्या गणीतो ॥ ४० ॥

**॥ ९ ॥ ता जा ज गुरूहि उपस्थिता ॥ ४१ ॥**

॥ पाहूनि निशा शुभ चांदणी ॥ श्रीकृष्ण उभा सदनांगणीं ॥
॥ कामें जंव आठवि त्द्गत्स्थिता ॥ राधा तंव होय **उपस्थिता[4]** ॥ ४१ ॥

**॥ १० ॥ दीपकमाला भा म जा गुरू ॥ ४२ ॥**

॥ श्रीहरि रात्रीं गोपिकालया ॥ जाय जेंवें दध्यादि ब्यावया ॥
॥ तें मणि[6]माला कंठिं जी भली ॥ **दीपकमाला** तेंवि शोभली ॥ ४२ ॥

**॥ ११ जाणा हंसी म भ न ग युता ॥ ४३ ॥**

॥ श्रीकृष्णाची रतिचतुरता ॥ पाहूनीया मदननिरता ॥
॥ राधा लुब्धा कमलनयनीं ॥ जैसी **हंसी** सरसिजवनीं ॥ ४३ ॥

---

# त्रिष्टुप्. ( २०४८ )

( एकादशाक्षरी वृत्तें. २५ )

**॥ १२ ॥ स स जा गुरु एकरूप गा तें ॥ ४४ ॥**

॥ जरि या स्थिरजंगमांत नाना-॥ विध दीसति भेद हे जनांना ॥
॥ तरि आश्रय वस्तु जें जगातें ॥ सुखचिद्घन **एकरूप** गा तें ॥ ४४ ॥

अथवाः— “ ॥ सुमना सरळ जरी मतीतें ॥ धरिसील **न** होय काम तीतें ॥
॥ सखि लोपति दृष्ट जैं पसारे ॥ मग पाहसि **एकरूप** सारें ॥ १ ॥”

**॥ २ ॥ ती इंद्रवज्रा त त जा ग गां हीं ॥ ४५ ॥**

॥ जो **इंद्रवज्रा[10]**तियुक्त वृष्टि ॥ होतां करीं शैल **धरून**, कष्टीं ॥
॥ त्या गोकुला गोपकुलाहि रक्षी ॥ रक्षो मला तो हरि सर्वसाक्षी ॥ ४५ ॥

अथवाः—

॥ “ती ऐकतां वेणुजगन्निवासा-॥ पाशीं त्वरें धांवुनि ये सुवासा ॥
॥ तीतें ह्मणो जा, न भजें तुला गे ॥ तो **इंद्रवज्रा**परि शब्द लागे” ॥ १ ॥

---

१ एक वाद्य. २ वाद्यें. ३ मेघाचे ठिकाणीं. ४ समीप उभी राहिलेली. ५ वगोनें. ६ रत्नमाला ७ श्रीकृष्णाविषयीं. ८ कमलवनीं. ९ अनेक प्रकाराचें. १० विद्युत्पात.

**॥ २ ॥ उपेंद्रवज्रा ज त जा ग गां हीं ॥ ४५ ॥**

॥ **उपेंद्रवज्रा**[1]दि मणिप्रभांही ॥ धरी सुरम्या तनु दिव्य पाहीं ॥
॥ उपास्य ती गोपवधूसमूहें ॥ सुरद्रुमाच्या तळिं खेळताहे ॥ ४५ ॥

अथवा जसें:—

'॥ जया न तो काम जगांत ठावा ॥ वधू तया धाडि करी उठावा ॥
॥ कुचैले[2] तो त्यास बसावयास ॥ **उपेंद्र वज्रासन** दे तयास ॥ १ ॥'

॥ ३॥ जयांस पूर्वोदितें[3] लक्षणें तीं ॥ येतीं पदीं त्या उपजाति[4] होती ॥
॥ जाती दुज्यां मिश्रित होति ज्या कीं ॥ तयांस हें नांवचि सिद्ध लोकीं ॥४६ ॥
॥ हरी उडी सर्प[6]ह्रदांत टाकी ॥ ऐकूनि साऱ्या यमुनातटाकीं ॥
॥ जाती जवें त्या **उपजाति** जाती ॥ हरे हरे माधव हेंचि गाती ॥ ४६ ॥

**॥ ४ ॥ न ज ज ल गा सुमुखी ह्मणती ॥ ४७ ॥**

॥ तरणिसुतातटिं कुंजवनीं ॥ व्रजवनिता स्मरतप्त मनीं ॥
॥ हरिस विलोकुनि ते **सुमुखी** ॥ मुखशशि चुंबुनि होय सुखी ॥ ४७ ॥

**॥ ५ ॥ मा ता ता गा शालिनी चारसातीं ॥ ४८ ॥**

॥ पापा नाशी ज्ञानवृद्धी करीते ॥ धर्मा अर्था तेविं कामाहि देते ॥
॥ निष्कामत्वें सेवितां देइ मुक्ति ॥ जीवा श्रिद्धा[8]—**शालिनी** विष्णुभक्ति ॥४८॥

अथवाः—'॥ मारी दैत्या तारि तो भक्तलोकां ॥ द्रव्यें देतो वारितो सर्व शोका ॥
॥ रक्षी आह्मां काननीं आणि गांवीं ॥ त्या कृष्णाची **शालिनी** कीर्ति गावी ॥१॥'

**॥ ६ ॥ वातोर्मी ते म भ ता गा ग होते ॥ ४९ ॥**

॥ ध्यातां मूर्ति क्षणही अच्युताची ॥ नामश्रेणी[9] वदतां तेविं साची ॥
॥ या संसारीं [10]दुरितातें निवारी ॥ **वातोर्मी**[11] ते उडुगा[12] जेविं पूरीं ॥ ४९ ॥

---

१ हीरकादिक. २ कुत्सित वस्त्र धारण केलेला ( सुदामा. ) ३ पूर्वी सांगितलेलीं, अर्थात् 'इंद्रवज्रा' व 'उपेंद्रवज्रा' या दोन वृत्तांचीं. ४ ह्या 'उपजाति' चरण भेदावरून प्रस्तारक्रमानें चवदा होतात. जसें:—

" ॥ वेणुध्वनी नो सुरगायकांनीं ॥ त्यांच्या विमानांतचि वायकांनीं ॥
॥ आश्चर्य कानीं पडतांचि केलें ॥ न तृप्त ज्यानें मन हें भुकेलें ॥ १ ॥
॥ खगेंद्र खांदा धरि भुरुहानें ॥ हातें धरी पादसरोरुहानें ॥
॥ त्यातें स्मरा नाशिल तो अनत्या ॥ सत्यापती दाविल नित्य सत्या ॥ २ ॥
॥ आतां तरी क्षत्रिय तू भला गे ॥ वरीं जयाचा तुज लोभ लागे ॥
॥ जेणें तुला साधति लोक दोनी ॥ आह्मीं वृथा काय बहू वदोनी ॥ ३ ॥
॥ न तीपुढें सेतुकथा वदावी ॥ ह्मणोनि सीतेप्रति भाव दावी ॥
॥ बोलूनही सावरिजे स्वभावा ॥ हा शब्द तो सूचवि लाघवाचा ॥ ४ ॥" इत्यादि
( वामन पंडित. )

५ ज्यांत अल्प भेद आहे अशा वंशस्थ, इंद्रवंशा इत्यादिक ६ कालियाच्या डोहांत. ७ यमुना. ८ श्रद्धेनें ( विश्वासबुद्धीनें ) शोभणारी. ९ पंक्ति. १० पापास. ११ वायूची लहरी. १२ होडीस.

अथवा:—'॥ मोठी शोभा दिसते चांदण्याची ॥ स्वारी येना अझुनी कां धण्याची ॥
॥ जाती-मल्ली-सुमना-नीरजांची[1] ॥ वार्तो **मी** हे मजला फार जाची ॥ १॥'

**॥ ७ ॥ मा भा न ल्गा भ्रमरविलसिता ॥ ५० ॥**

॥ मुग्धे[2] मान द्रुततरचि सरो ॥ त्वत्तारुण्या हरि सफळ करो ॥
॥ फुल्ला वल्ली **भ्रमरविलसितां**[3] ॥ जी वर्जी ती जगति न ललिता ॥ ५० ॥
अथवा जसें:—' ॥ माथा शोभे सु सुमन अस्ति ते ॥ कंठीं लावी मृगमद[4] नुसतें ॥
॥ आस्या[5] झांकी कचभर पुरतें ॥ जैसें पद्म **भ्रमरविलसितें** ॥ १ ॥

**॥ ८ ॥ ती अनुकूला भ त न ग गां हीं ॥ ५१ ॥**

॥ बल्लववेषा मुरहरमूर्ति[6] ॥ गोपवधूंची करि रतिपूर्ति ॥
॥ वांच्छितदानीं प्रणतिपरांला[7] ॥ ती जगीं कोणास न **अनुकूला** ॥ ५१ ॥

**॥ ९ ॥ रा न रा लघु गुरू रथोद्धता ॥ ५२ ॥**

॥ **राधिका** दधि गृहांत मंथितां ॥ नंदनंदन मनो**रथोद्धता**[8] ॥
॥ वेणुनाद परिसूनि चंचला ॥ ती निघे रविसुतातटीं जला ॥ ५२ ॥
अथवा:—'॥राग मान विसरे रडे वरी । कुंडिनेश[9] सुत बांधिल्यावरी ॥
॥तद्विहीन पृतना[10] न साजरी ॥ वाजिवारण-**रथोद्धता** जरी ॥ १ ॥'

**॥ १० ॥स्वागता र न भ ग द्वय युक्ता ॥ ५३ ॥**

॥ बल्लवीजनविलास विलोल[11] ॥ ज्याचिया मनिं सदा यदुपाल ॥
॥ तो जरी सुरपुराप्रति जाय ॥ **स्वागता** करि तया सुरराय ॥ ५३ ॥

**॥ ११॥ भत्रय गद्वय दोधक लोकीं ॥ ५४ ॥**

॥ आगमिं वर्णित सत्कविवृंदीं ॥ अक्षर-भास्वर[12] चारु अनादी ॥
॥ गोपवधू-स्मर-बोधक लोकीं ॥ हें भगवद्वपु[13] **दोधकसें** कीं ॥ ५४ ॥
अथवा:— '॥ भूपति भूहर भीषण लोकां ॥ द्रव्य हरी बहु दाखवि शोका ॥
॥ साधु जना बहु लाविहि धाका ॥ या परिचा नर **दोधक** टाका ॥ १ ॥

**॥ १२ ॥ ह्या मोटनकीं त ज जा ल ग कीं ॥५५॥**

॥ [14]रंगीं अजि मल्लकलारसिका ॥ चाणूर महाभट-**मोटनका**[15] ॥
॥ तूं खेळत खेळत जो करिशी ॥ संसार रिपूसि कधीं हरिसी ॥५५॥

**॥ १३ ॥ श्येनिका जिथें र जा र ला गुरू ॥ ५६ ॥**

॥ श्रीधरा ! तुझी कृपा कृपालया ॥ भक्त ताप सर्व लाविती लया ॥
॥ जन्महेतु पातका कपोतकां[16] ॥ [17]**श्येनिकाचि** ती भवाब्धिपोतका[18] ॥ ५६ ॥

---

१ जाई, मोगरा, मालती, व कमळ यांचों. २ अगे वेडे. ३ भुंग्याचे विलास. ४ कस्तुरी. ५ मुख. ६ गोपाळ. ७ नम्रजनास. ८ कृष्णाच्या मनोरथानें उद्धट. ९ भीष्मक राजा. १० सेना. ११ चंचल. १२ अविनाशी व तेजस्वि पक्षीं अक्षरांनीं शोभणारें. १३ कृष्णाचें शरीर. प० भगण ३ व दोन गुरू ज्यांत आहेत असें (वृत्त.) १४ मल्लसभेंत. १५ नाश. १६ कपोत पक्षी. १७ श्येन (ससाणा) पक्षीण. १८ भवसमुद्रांतील नौका.

॥ १४ ॥ **ता जा ज ग गा** हि उपस्थिता ते ॥५७॥

॥ वृंदावनिं पाहुनिया विविक्तीं[1] ॥ नंदात्मज आठवि आत्मभक्ता ॥
॥ चंद्रोदयिं वाजवि वेणु तो कीं ॥ गोपी तंव होति **उपस्थिता** कीं ॥ ५७ ॥

॥ १५ ॥ **सांद्रपदा** ते **भ त न ग ल घु हि** ॥ ५८ ॥

॥ रासविहारीं रसिक यदुपति ॥ गुप्त वसे तैं पशुपति–युवति[2] ॥
॥ शोध कराया सकळहि निघती ॥ **सांद्रपदां**[3] त्या वनिं वनिं बघति ॥ ५८ ॥

॥ १६ ॥ **न न स ग ग** विरचिता **वृत्ता** ॥ ५९ ॥

॥ पशुपतिसुत मुदित स्वांतीं ॥ यदुपति-सहित वना जाती ॥
॥ व्रजिं परतुनि सगळे येतां ॥ विविरति घरिं हरिच्या **वृत्ता** ॥ ५९ ॥

॥ १७ ॥ **न न र ल गुरूनींहि भद्रिका** ॥ ६०॥

॥ शरदृतु-समयीं स्मरातुरा ॥ परिसुनि हरि–वेणुच्या स्वरा ॥
॥ बघुनि उदित पूर्ण चंद्रिका ॥ व्रजसति वनिं जाति **भद्रिका**[4] ॥ ६० ॥

॥ १८ ॥ **मौक्तिकमाला भ त न ग गां हीं** ॥ ६१॥

॥ मस्तकिं लेतो रुचिर पिसारे ॥ पाहुनि मोहे त्रिभुवन सारें ॥
॥ गोकुळिं खेळे विजित-विकुंठीं[5] ॥ **मौक्तिकमाला**–धर हरि कंठीं ॥ ६१ ॥

॥ १९ ॥ **उपचित्रचि तें स स सा ल गा** ॥ ६२॥

॥ अजनी[6] हरि गोपजनीं कसा ॥ अजि चित्र[7] गमे मम मानसा ॥
॥ करुनीहि रती मग तो व्रती[8] ॥ **उपचित्र**[9]चि हें मज सांप्रतीं॥ ६२ ॥

॥ २० ॥ **कुपुरुषजनिता न रा गा गा** ॥ ६३ ॥

॥ शिशुगदित[10] गिरा[11] जगीं सूक्ता[12] ॥ अशुचि-पदगता[13] शुची मुक्ता ॥
॥ गरलभव सुधा बुधां मान्या ॥ **कुपुरुषजनिता**[14] सुता धन्या ॥ ६३ ॥

॥ २१ ॥ **अनवसिता गा ना य भ गा गा** ॥ ६४ ॥

॥ करणगणांचे[15] जे अभिमानी ॥ सुरवर कांतायुक्त विमानीं ॥
॥ व्रजिं वनिताही नित्य लुटीती ॥ **अनवसिता**[16] ती श्रीपतिकांती ॥ ६४ ॥

॥ २२ ॥ **चंद्रांकमाला त ता ता ग गां हीं** ॥ ६५ ॥

॥ कंठीं स्थिती मौक्तिका इंद्रनीळा ॥ कीं कीर्ति शुभ्रा परी वर्ण काळा ॥
॥ चंद्रान्वयीं[17] अन्वयें मेघनीळा ॥ हे आश्रयी चंद्र**चंद्रांकमाला**[18] ॥ ६५ ॥

---

१ एकांत. २ गोपस्त्रिया. ३ दाट पावलें. ४ कल्याणरूपा ५ ज्यानें 'विकुंठ'–वैकुंठ जिंकलें अशा गोकुळांत. ६ अजन्मा. ७ आश्चर्य. ८ ब्रह्मचारी. ९ दुसरें आश्चर्य. १० बालकानें बोललेली. ११ वाणी. १२ सुभाषित. १३ अपवित्र स्थानीं असलेली. १४ वाईट पुरुषापासून जन्मलेली. १५ इंद्रियसमूहाचे. १६ अक्षयी अविनाश. १७ वंश. १८ चंद्र व त्याचा कलंक.

॥ २३ ॥ शिखंडित ज सा ता गा गुरुंहीं ॥ ६६॥

॥ गळां विलसते ज्या वैजयंती ॥ निळा तनुवरी जो दिव्य–कांति ॥

॥ अखंडित उरीं लक्ष्मी धरीतो ॥ शिखंडित[1] शिरीं शोभे हरी तो ॥ ६६ ॥

॥ २४ ॥ न र र ला ग हे शुद्धकामदा ॥ ६७ ॥

॥ विटवि या भवीं वित्त–वैभवीं ॥ नचि गृहादिकीं चित्त लोभवी ॥

॥ स्मृति तुझी हरी देइ संमदा ॥ भय हरी खरी शुद्धकामदा ॥ ६७ ॥

॥ २५ ॥ रा ज सा ल गा ललित पांच सा ॥ ६८ ॥

॥ गोकुळांतल्या गवळियां फळे ॥ भूरि भाग्य तें भुवनिं नाढळे ॥

॥ मूर्ति पाहती मुदित अंतरीं ॥ लाभदा तुझी ललित[2] साजिरी ॥ ६८ ॥

---

# जगती ( ४०९६ )

( द्वादशाक्षर वृत्तें ३६. )

॥ १ ॥ चंद्रवर्त्म ह्मणती र न भ स–ही ॥ ६९ ॥

॥ चंद्रवर्त्म[3] भरलें घनतिमिरीं ॥ राजवर्त्म त्यजिलें पुरुषवरीं ॥

॥ इष्ट वर्त्म तरि शोभवि सरसे ॥ कुंज-वर्त्मिं हरि तो रमत असे ॥६९ ॥

॥ २ ॥ ह्मणाचि वंशस्थ जरी जता जरा ॥ ७० ॥

॥ विलासें वंशस्थविला[4] मुखानिलें ॥ भरूनि जेणें मृदु गीत गायिलें ॥

॥ व्रजांगनामानधनास तें हरी ॥ सदाहि रक्षो जगिं तो तुह्मां हरी ॥ ७० ॥

अथवा:–

## गुंफ. २

"जिची पतीच्या भजनांत राहटी ॥ घरांतुनी जाय कधीं न ते हॅटीं[5] ॥"

"पतिव्रता आणि उदारलक्षणी ॥ पहावि वंशस्थभवा[6] मृगेक्षणी" ॥ १ ॥

॥ ३ ॥ जाणा त ता जा राहि इंद्रवंशा ॥ ७१ ॥

॥ दैत्येंद्रवंशानल[7] दीप्त तो हरि ॥ पीतांबरी जो जगतीं तमा हरी ॥

॥ तेथें उडया घालुनि टोळसे किती ॥ ते कंसचाणूरमुखारि आटती ॥ ७१ ॥

अथवा:–

" तीर्थी रती साधुजनांत राहती ॥ आत्मा सदा एक असेंचि पाहती ॥

---

१ मयूरपिच्छयुक्त. २ सुंदर. ३ चंद्राचा मार्ग. ( आकाश ) ४ पाव्याचे छिद्रास. ५ बाजारांत. ६ कुलीन. ७ दैत्येंद्र हेच वंश ( वेळू ) त्यांस अनळ ( अग्नि. )

॥ ज्याच्या कुळीं सत्पथ नित्य वागला ॥ तो इंद्रवंशाहुनि वंश चांगला ॥ १ ॥

**॥ ४ ॥ घडे ज स ज रीं जलोद्धतगति ॥ ७२ ॥**

॥ यदीय[1] हलजा[2] रुजा बघुनिया ॥ **जलोद्धतगती**[3] कलिंदतनया[4] ॥
॥ विलासविपिनीं शिरेचि यमुना ॥ करो कुशल तो हली त्रिभुवना ॥ ७२ ॥

अथवा जसें:—

॥ " जनांचि सखि लाजही विसरली ॥ पतिव्रतपणांतुनी घसरली ॥
॥ नसे नवल ऐकतांचि मुरली ॥ 'जलोद्धतगती' परंतु फिरली ॥ १ ॥ "

**॥ ५ ॥ यकारींच चारीं भुजंगप्रयात ॥ ७३ ॥**

॥ विलोकूनि ज्याच्या सुदुर्वृत्ततासी ॥ शिरीं आदरी श्रीहरी नर्तनासी ॥
॥ भिऊनी अघाचा निघे सा[6]गि राशी ॥ **भुजंग प्रयाता** करी सागरासी ॥७३॥

अथवा:—"यदूनायका बायका पापदावा ॥ अम्ही कृत्रिमी हा मनीं नागि दावा !
॥ तुझे ठायिं चित्तें सुवृत्तें पहा तीं ॥ 'भुजंगप्रयातें' ऋजू रीघ्रं होती" ॥१ ॥

**॥ ६ ॥ जरि च्यार सकाराचि तोटक तें ॥ ७४ ॥**

॥ अजि गोकुळिं गौळणिशीं रमतां ॥ जगिं ज्या विलसे मदनोत्तमता ॥
॥ हरि **तो टक** लावुनियां बघतां ॥ हरितो सकलाहि महा दुरिता ॥ ७४ ॥
" सखया समयास अळास जरी ॥ हरि लाज तगेल सभेंत तरी ॥
द्रुपदात्मभवा मृत अन्य परी ॥ मग **तोटक** बांधुनि काय तरी " ॥ १ ॥

**॥ ७ ॥ च्यार रेफीं गणीं जाण ते स्रग्विणी ॥ ७५ ॥**

॥ इंद्रनीलद्रवानेंचि कीं निर्मिली । कांचनाच्या रसें भूषिता शोभली ॥
॥ नीलमेघापरी पीत पीतांबरीं | **स्रग्विणी** शौरिची मूर्ति ते साजिरी ॥७५॥"
"॥ राधिका रात्रि दारीं उभी राहिली ॥ श्रीधरानें शरत्कालिं ती पाहिली
॥ पूर्णचंद्रानना ध्वान्तविद्राविणी[10] ॥ पूर्णमासी जशी मौक्तिक स्रग्विणी "॥ १॥

**॥ ८ ॥ मा मा या या ती वैश्वदेवी शराश्वीं ॥७६ ॥**

॥ अन्या देवांच्या सोडुनी पूजनातें ॥ अद्वैतत्वें तूं राधिकारंजनातें[11] ॥
॥ पूजीं सर्वाल्या अर्चितां त्या सुभावीं॥अर्चा होते कीं बा सख्या **वैश्वदेवी**[12] ७६

**॥ ९ ॥ प्रमिताक्षरा सजससीं घडते ॥ ७७ ॥**

॥ अमृतद्रवासि[13] जणुं पाझरली ॥ रदमौक्तिकांशुधवला[14] मुरली ॥
॥ **प्रमिताक्षरा** मति हरी हरिची ॥ व्रजवासिनी सकळ सुंदरींची ॥ ७७ ॥

---

१ ज्याच्या नांगरापासून होणारी. २ पीडा. ३ जलानें उद्धत आहे गति अशी. ४ यमुना. ५ बळराम. ६ अपराशी ७ प्रयागास. ८ सरळ. ९ माळा धारण करणारी. १० अंधकार नाशणारी. ११ श्रीकृष्णास १२ सर्व देवांचीं. १३ रस. १४ दंतरूपमौक्तिकांच्या किरणांनीं शुभ्र.

॥ १० ॥ **द्रुतविलंबित** होय नभीं भरीं ॥ ७८ ॥

॥ रविसुतातटिं कामुक–गोपिका ॥ जनसमेत रमे धरि कौतुका ॥
॥ [१]**द्रुतविलंबित** दावि विहार तो ॥ हरि मदीय मतींत सदा रतो ॥ ७८ ॥

॥ ११ ॥ न न र र रचिताहि **मन्दाकिनी** ॥ ७९ ॥

॥ बलिदमन करी हरी जेधवां ॥ चरण कमळिं त्याचिया तेधवां ॥
॥ सुरनिहित सि[२]ताब्जसी ते जनीं ॥ निरखिलि चिरकाळ **मन्[३]दाकिनी** ॥ ७९ ॥

॥ १२ ॥ न य न य युक्ता **कुसुमविचित्रा** ॥ ८० ॥

॥ विपिन विहारीं **कुसुमविचित्रा** ॥ सु[४]कुतुकगोपीस्तुतसुचरित्रा ॥
॥ मदनसमाना मुरहरमूर्ति ॥ परिहरि माझ्या सकळहि आ[५]र्ती ॥ ८० ॥

॥ १३ ॥ न ज ज य **तामरसाख्यचि** जाणा ॥ ८१ ॥

॥ [६]स्फुट मकरन्द समा द्युति ज्याची ॥ व्रजजलना भ्रमरी पिति साची ॥
॥ तव मुख**तामरस** प्रभु तें हो ॥ त्त्वदय-तडागिं विकासित राहो ॥ ८१ ॥

॥ १४ ॥ ह्मणति कवी **नजजार मालती** ॥ ८२ ॥

॥ मृदुपवनें तरुसंघ हालती ॥ कुसुमसमूह पडेहि खालती ॥
॥ निरखुनि ते अतिफुल्ल **माळती** ॥ व्रजशिशु मन्द सकृष्ण चालती ॥ ८२ ॥
॥ मृदुपवनें तरुसंघ हालती ॥ पशुगण ते चरतात खालती ॥
॥ हरिसह गोप सुमंद चालती ॥ वान फुलल्या निरखूनि **मालती** ॥ १ ॥

॥ १५ ॥ **ता या त य** साहीं छिन्ना **मणिमाला** ॥ ८३ ॥

॥ जी कीं तुळसीची कंठीं धरि माळा ॥ तीदे सुख तैसी शोभाहि तयाला ॥
॥ जाणों निजभक्तस्मृत्यर्थचि घाली ॥ लोलों **मणिमाला** अन्या वनमाली ॥ ८३ ॥

॥ १६ ॥ **मा भा सा मा 'जलधरमाळा'** चारीं ॥ ८४ ॥

॥ जी भक्तांच्या हरि दुरिताख्या शल्या ॥ तापा च्छेदी **जलधर[७]मालातुल्या** ॥
॥ धन्याकारा दिनकरकन्या[१०]कूलीं ॥ दिव्या खेळे हरितनु भव्या केली[११] ॥ ८४ ॥

॥ १७ ॥ **न न म य** वसु चारी त्या **पुटासी** ॥ ८५ ॥

॥ मधुवनिं नवनारी श्रीहरीतें ॥ निरखुनि मनिं कामा आदरी ते ॥
॥ न मिटुनि तयिं पाहे दकू[११]पुटातें ॥ मग धरि तनु चेतः संपुटां ते ॥ ८५ ॥

॥ १८ ॥ **प्रमुदितवदना न ना र–द्वयीं** ॥ ८६ ॥

॥ परिसुनि विपिनांत वेणुध्वनी ॥ बघुनिहि विधुची [१२]रुची काननीं ॥
॥ त्वरितगति निघे विलासाधिका ॥ **प्रमु[१३]दितवदना** प्रिया राधिका ॥ ८६ ॥

---

१ त्वरित व सावकाश. २ शुभ्र कमळासारखी. ३ आकाशगंगा. ४ कौतुकयुक्त. ५ पीडा. ६ स्पष्ट. ७ कपाळ. ८ चंचल. ९ मेघ. १० तटीं ११ नेत्रपुटांस. १२ कांति. १३ हर्षित.

॥ १९ ॥ न-भ-जरीं वदति ते **प्रियंवदा** ॥ ८७ ॥

॥ मधुवनीं सुनवनीतलंपटा ॥ निरखुनी कटिलसत्तडित्पटा[1] ॥
॥ सुखकरा मुरहरा वशंवदा ॥ रमविती व्रजवधू **प्रियंवदा**[2] ॥ ८७ ॥

॥ २० ॥ ख्याता जगांत **ललिता** तभीं जरीं ॥ ८८ ॥

॥ पिच्छें शिरीं रुचिर जीस साजती ॥ कर्णावतंस[3] सुमनें विराजती ॥
॥ जी पाहतां सुख करी अघा हरी ॥ लावण्यमूर्ति **ललिता**[4] तुझी हरी ॥८८ ॥

॥ २१ ॥ न-न-भ-र-सहिता तरि **उज्ज्वला** ॥ ८९ ॥

॥ अहिपतिदमना सुमनोहरा ॥ रतिपतिरुचिरा त्रिजगद्वरा ॥
॥ व्रजजन-रतिदा अतिनिर्मला ॥ हरितनु सुख दे मज **उज्ज्वला** ॥ ८९ ॥

॥ २२ ॥ जगिं **नवमालिका** न-ज-भ-यांहीं ॥ ९० ॥

॥ सुरभि वसन्त शान्त सुखदाता ॥ मलयसमीर-मित्रयुत येतां ॥
॥ वनिं **नवमालिका**[6] फुलति भारी ॥ निरखुनि तो रमे प्रभु मुरारी ॥ ९० ॥
" नमन जयास भूरि भय नाशी ॥ स्मरण सदैव तोषवि मनासी ॥
॥ निजजन-काम पूरवि हरी तो ॥ वनिं 'नवमालिका' उरिं धरीतो ॥ १ ॥ '

॥ २३ ॥ भा म स सा हे पंच मुनी **ललना** ॥ ९१ ॥

॥ कामजवानें प्रेमभरीं भरल्या ॥ वेणुरवानें ज्या ह्रुदयीं विरल्या ॥
॥ चिंतिति चित्तीं शील तसें कुल ना ॥ जाति वनातें गोकुळिंच्या **ललना** ॥९१ ॥

॥ २४ ॥ **ललित न न म रीं** लोकीं बोलती ॥ ९२ ॥

॥ सकल तनुवरी गुंजा वाहसी ॥ श्रवणयुगिं हरी पुष्पें घालिशी ॥
॥ धरिति यदुपते पिच्छें हीं शिरीं ॥ **ललित** परि तुझी मूर्ती साजिरी ॥९२ ॥

॥ २५ ॥ द्रुतपद प्रकट **नभनयांहीं** ॥ ९३ ॥

॥ व्रजवधू मृगशिशुनयना ते ॥ जंव निघे गृहिं जलनयनातें ॥
॥ स्वपशुंच्या सहसख अँवनातें[7] ॥ **द्रुतपद** प्रभु तंवचि वनातें ॥ ९३ ॥

॥ २६ ॥ चारी मा जेथें जाणा तो **विद्याधार** ॥ ९४ ॥

॥ नाहीं जेथें वाणीचित्तांही संचार ॥ कीं लागेना वेदां शास्त्रां ज्याचा पार ॥
॥ सर्वात्मा जो सर्वव्यापी सर्वाधार ॥ श्रीशौरी तो [9]गोष्ठीं खेळे **विद्याधार** ॥९४॥

---

१ ज्याच्या कवरेस विद्युल्लतेसारखा पीतांबर शोभत आहे अशा. २ प्रिय बोलणाऱ्या. ३ कर्णभूषणें. ४ मनोहर. ५ कालिय. ६ एक वल्ली. ७ रक्षण. ८ लोकर पावलें टाकीत. ९ गोकूळांत.

॥ २७ ॥ लघू गुरू सुमिश्र **पंचचामरीं** ॥ ९५ ॥

॥ जनीं मनींहि सर्वदा जया हरी ॥ प्रकाशुनी प्रपंचताप संहरी ॥
॥ तया वनींहि सौख्य जें निजान्तरीं ॥ नसे तसें नृपास **पंचचामरीं** ॥ ९५ ॥

॥ २८ ॥ **सारंग** तें वृत्त चारीं तकारींच ॥ ९६ ॥

॥ ज्याच्या स्मृतीनेंचि यज्ञादि तें सांग ॥ यत्संग व्हायासि तो योग अष्टांग ॥
॥ **सारंग**[1]नेत्रांसि पाहूनि तो दंग ॥ **सारंग**[2]पाणी करी काननीं रंग ॥ ९६ ॥

॥ २९ ॥ समस्त जकारचि **मौक्तिकदाम** ॥ ९७ ॥

॥ सुरम्यतनू नयनां अभिराम ॥ मुकुंद गळां धरि **मौक्तिकदाम** ॥
॥ स्वयंप्रभ सूचवि यामधिं हेंच ॥ मला बहु मुक्त[3]गण प्रिय साच ॥ ९७ ॥

॥ ३० ॥ सर्व भकारहि **मोटक** नामक ॥ ९८ ॥

॥ तूं चलसौल्हद जाणतसें मनिं ॥ षट्[4]पद जेविं सरोरुहकाननिं ॥
॥ सत्यचि मी नचि इच्छि अशाप्रति ॥ बांधिसि **मोट**—कसा हरि सांप्रतिं ॥ ९८ ॥

॥ ३१ ॥ द्विदश लघुचि **तरलनयन** ॥ ९९ ॥

॥ व्रजपतिसुत सवनिं[6] सवनिं ॥ रमुनि सुखवि शिशु वनिं वनिं ॥
॥ मुरलि-निनदसुमुदित-मन ॥ मृगगण तइं **तरलनयन** ॥ ९९ ॥

॥ ३२ ॥ **यूथिका** रनभरीं त्रिनवीं खरी ॥ १०० ॥

॥ आकृती जरि लहानचि साजिरी ॥ कोमळें परिमळें ल्हदया भरी ॥
॥ जाणुनी त्यजुनि अन्य सुवल्लरी ॥ **यूथिका**[10]वळि गळां हरि तो धरी ॥ १०० ॥

---

## गुंफ. ( २ )

### अतिजगती. ( ८१९२ )

( त्रयोदशाक्षरी वृत्तें. )

॥ १ ॥ तीदार्दीं म न ज र गा **प्रहर्षिणी** हे ॥ १०१ ॥

॥ कालिन्दी विमल तुषार-वर्षिणी जी ॥ वायूची लहरिहि चित्तकर्षिणी जी ॥
॥ [11]ज्योत्स्नाही निरखुनि ता[12]पमर्षणी ते ॥ ये राधा मधुरिपुल्हत्**प्र**[13]**हर्षिणी** ते ॥ १०१ ॥
“ मोठे ते नयन जरी हरी पहाती ॥ ते साधू खलजन–शब्द जे सहाती ॥
वाणी वाणिल जरि सच्छिरोमणींतें ॥ जाणावी त्रिदशपति **प्रहर्षिणी** ते ” ॥ १ ॥

॥ २ ॥ ज भा स जा गुरु **रुचिरा** चहूं नवीं ॥ १०२ ॥

॥ विलोकुनी जनसुखदा घ[14]नां नभीं ॥ [15]नटे हटें मुदित मनीं जनां न भी ॥
॥ मयूर तो गणुनि कृतज्ञ आदरी ॥ पिसें धरी **रुचिर** हरी शिरीं बरीं ॥ १०२ ॥

---

१ मृगनेत्रा. २ कृष्ण. ३ सत्समूह, मोती. ४ भ्रमर. ५ कमलवनांत. ६ वेळोवेळीं ७ मुरलीस्वरानें ज्याचें मन आनंदित आहे ८ सा. ८ चंचलनेत्रांचा. ९ चांगल्या वळी. १० जुईची माळ. ११ चंद्रिका, चांदणें. १२ ताप शांत करणारी. १३ कृष्णाहृदयास हर्ष देणारी. १४ मेघ. १५ नाचे.

"जया सभा बहु सदनें जशीं तशीं ॥ गजां हयां नचि गणना, गुरें म्हशी ॥
जगामधें सुख-धन-युक्त तो तरी ॥ भली प्रिया गृहिं **रुचिरा** असे जरी" ॥ १ ॥

॥ ३ ॥ चारीं अंकीं ( ९ ) **म त य स गा मत्तमयूरी** ॥ १०३ ॥

॥ ग्रीष्मीं ऊष्मीं तप्ततनू होउनि भारी ॥ उत्कंठेनें जों वरता कंठ उभारी ॥
॥ मेघश्यामा पाहुनि तैं काननिं दूरी ॥ नाचे साचें हृष्टमना **मत्तमयूरी** ॥ १०३ ॥

अथवा जसें:—

"॥ मातें कांता! सांडियलें या समयासी ॥ मारी बाणा काम शकें जिंकु न यासी ॥
॥ हांका मारी जाणुनि केल्या अपराधा ॥ कुंजामध्यें **मत्तमयूरी**परि राधा ॥ १ ॥

॥ ४ ॥ **न युग सयुग गुरु** बोलति **चंडी** ॥ १०४ ॥

॥ इतर निरत हरि जाणुनि राधा ॥ सुकपटपटु मनिं होय रुषांधा[१] ॥
॥ मग गल[२]कुसुमसुदामचि **चंडी**[३] ॥ मधुरिपुसि हणुनि नेत्र भिवंडी ॥ १०४ ॥

॥ ५ ॥ **स ज सा जगा**हि तरि **मंजुभाषणी** ॥ १०५ ॥

॥ [४]अमृतांशुकांति विमला विलोकितां ॥ मलयानिलें परिमलाहि फोकितां ॥
॥ वनिता वनांतगत **मंजुभाषिणी** ॥ रजनींत होय हरि चित्ततोषिणी ॥ १०५ ॥

॥ ६ ॥ न न त त गुरु हे **चंद्रिका** सात सा ॥ १०६ ॥

॥ अविरहि-जन-संताप संहारिका ॥ यदुपति बघतां निर्मला **चंद्रिका** ॥
॥ वनिं मनिं निज-हृत्तोष-संसाधिका ॥ मनो[५]सिज-वश तो आठवी राधिका ॥ १०६ ॥

॥ ७ ॥ **स ज सा स गा हि कलहंस** ह्मणा गा ॥ १०७ ॥

॥ जडचेतनोदकपयांस विवेची ॥ [६]भवमुक्तसक्त न जडांस शिवेचि ॥
॥ अजि साधुमानस[८]निवास हरी तो ॥ व्रजिं रम्य [९]केलि **कलहंस** करीतो ॥ १०७ ॥

॥ ८ ॥ **स ज सा ज गा** ह्मणति ते **प्रबोधिता** ॥ १०८ ॥

॥ त्यजुनी [१०]जवें स्वगृहकृत्य चंचला ॥ व्रजसुंदरी ह्मणति गे वना चला ॥
॥ नचि मानिती गुरुजनोक्ति रोधितां ॥ हरिवेणुमंजुनि[११]नदें प्रबोधिता ॥ १०८ ॥

॥ ९ ॥ ह्मणति **मृगेन्द्रमुखा न जा ज रा गा** ॥ १०९ ॥

॥ जरि सुख वांछिसि दुःखसिंधुमाजी ॥ तरि परिसें सुखदा सदुक्तिमाजी ॥
॥ भज मनि **सिंहमुखा**[१२] नरा नरासी ॥ नुरतिलशैल समान दुःखराशी ॥ १०९ ॥

॥ १० ॥ **न न त त ग-युना** सात साहीं **क्षमा** ॥ ११० ॥

॥ अपवचनशता मानभंगा जनीं ॥ न गणुनि रतला शौरिच्या पूजनीं ॥
॥ हरिपरिचरणीं सर्व साहे शमा ॥ अचळ धरि मनीं बोलिजे ती **क्षमा** ॥ ११० ॥

॥ ११ ॥ **य मा रा रा** ख्याता **चंचरीकावली** गा ॥ १११ ॥

॥ मुकुंदास्येंदूतें[१३] पाहुनी धांवली हो ॥ गणी त्या अंभोजां[१४] **चंचरीकावली**[१५] हो ॥

१ क्रोधयुक्त. २ कंठांतील पुष्पांची माळ. ३ रागीट. ४ चंद्र. ५ मदन ६ साधु व मोती. ७ अचेतन पक्षीं जळ ८ मन व एक सरोवर. ९ क्रीडा १० वेगानें. ११ मंजुल शब्दानें. १२ नृसिंहास १३ कृष्णाच्या मुखचंद्रास. १४ कमळ १५ भ्रमरपंक्ति.

॥ सुनासावंशातें भाविते कुड्मलातें[1] ॥ मनी मानी मीना कानिंच्या कुंडलातें॥१११॥

**॥ १२ ॥ न स र र गुरू चंद्ररेखा रसागीं ॥ ११२ ॥**

॥ जरि तुज यशोवृद्धि संपत्ति हावी ॥ प्रतिपदिभवा **चंद्ररेखा** पहावी ॥
॥ परिसुनि हरी राधिकेची गिरा हे ॥ वदन पदरीं झांकि तद्वाल पाहे॥ ११२॥

**॥ १३ ॥ ऋतुमुनियति विद्युत् न ना ता त गा ॥ ११३ ॥**

॥ नवजलधरनीला हरीच्या उरीं ॥ सुनिहिततनु राधा गमे सुंदरी ॥
॥ रतिरसभरिं ती कांचनांगी खरी ॥ जलदिं अचल **विद्युत्** जशी अंबरीं[2] ॥११३ ॥

**॥ १४ ॥ ह्मणा कंदुका जेथ चारी यकारीं गा ॥ ११४ ॥**

॥ चरायास सोडूनि धेनू तृणप्रान्तीं ॥ करायास चित्ता विहारीचि विश्रान्ति॥
॥ हरी बाळगोपाळमेळीं मिळूनी जी ॥ करी **कंदुकें** खेळ वृन्दावनामाजी॥११४ ॥

**॥ १५॥ उपस्थित ज सा ता सा जरि गुरूही ॥ ११५ ॥**

॥ निजालयगता राधा मनिंच मानी ॥ हरी मम गृहा येना जरिहि मानी ॥
॥ तरी धरिन मी त्याशीं दृढ विरोधा॥ उपस्थित[3] विभू तोंची शमवि बाधा॥११५॥

**॥ १६ ॥ ज ता स जा गा ह्मणाति मंजुहासिनी ॥ ११६ ॥**

॥ विधूदयीं ती बघुनि रात्रि चांदणी ॥ स्मरोदयें हृच्चलन गोपिकागणीं ॥
हरीवरी त्या रिझुनि **मंजुहासिनी** ॥ वनांतरीं तैं रमति हो विलासिनी॥ ११६ ॥

**॥ १७ ॥ अजि नंदिनी स ज स सा गुरुयोगें ॥ ११७ ॥**

॥ जरि नेणती हरिस ईशपणानें ॥ तरि सेविती मनिं अनन्यपणानें ॥
॥ कुल**नंदिनी** व्रजसती अनुरागें ॥ यमुनातटीं विहरती हरिसंगें ॥ ११७ ॥

**॥ १८ ॥ कुटजगती न जा मा ता गा सा त सा ॥ ११८ ॥**

॥ स्फुट जगतीं सुरांची ती, सौधावली ॥ उटजें[4] गती मनें इच्छी त्या गोकुळीं ॥
॥ सुरतरु तो तटीं कृष्णेच्या पावनीं ॥ **कुटज**[5]**गति** स्वयें वांछी वृंदावनीं ॥ ११८॥

**॥ १९ ॥ प्रभावती ज भ स ज गा चहूं नवीं ॥ ११९ ॥**

॥ स्वभावतां बहु रुचिरा **प्रभावती** ॥ सुरां जिचा जागें सुखद प्रभाव, ती ॥
॥ नरीं जरी हरितनु हीन प्रभावती ॥ करूनिया गणिति खरें नभा विती॥ ११९॥

**॥ २० ॥ न भ ज जा गुरु हि तीच विभावरी ॥ १२० ॥**

॥ सुधवला बघुनि शौरि **विभावरी** ॥ मधुवनीं मुरलि-गीति उभा वरी ॥
॥ व्रजसती परिसतां बहु बावरी ॥ सुटलिया स्ववसनाहि न सांवरी ॥ १२० ॥

**॥ २१ ॥ न न न स म गणयुत तरि गौरी ॥ १२१ ॥**

॥ निरखुनि विकसित सुतरुवल्ली ॥ हृदयीं खुपति जणुं मदनभल्ली[6] ॥
मुरलिरव मधुवनिं करि शौरी ॥ व्रजयुवति निघति तंवचि **गौरी**[7] ॥ १२१ ॥

---

१ कळीस. २ आकाशांत. ३ प्राप्त, समीपस्थित. ४ पर्णकुटी. ५ कुड्याचें झाड. ६ भाले. ७ गौरवर्ण किंवा मुग्धा.

## अथ शक्वरी. ( १६३८४ )

( चतुर्दशाक्षरीं वृत्तें. )

**॥ १ ॥ मा ता ना सा गा, ग शर नवि असंबाधा ॥ १२२ ॥**

॥ कालिन्दीची ती तटि बघुनि **असंबाधा**[1] ॥ कामाग्निज्वालात्हृदिं उदित करी बाधा ॥
॥ लोला तैं झाली सकल विसरली **संधा** ॥ मोहें गोविंदा वानें अनुसरली राधा ॥१२२॥

**॥ २ ॥ जाणा वसन्ततिलका त भ जा ज गा गा ॥ १२३ ॥**

॥ **उद्धर्षिणी**[2] जनमनां स्तनभारनम्या ॥ नीलोत्पलोपम-विलोचन-युग्म-रम्या ॥
॥ **सिंहोन्नता** त्रिकुटिला[3] कुटिलालकांतीं[4] ॥ स्वांतीं[5] **वसंततिलका** रमवी सुकांता ॥१२३॥
॥ आला **वसंत–तिलकांस**[6] बहार आला ॥ झाला विकास सकला तरुच्या वनाला ॥
॥ गेला सबालक हरी विहरावयाला ॥ जाणूनि जाति युवती यमुनावनाला ॥ १२४॥

॥ अथवा–

"॥ तारेश भानुसम तो व्रजराज रानीं ॥ येतां असा निरखिला गगनीं सुरांनीं ॥
॥ टाकी किरीट कटकांगद हार राया ॥ घेतो **वसंततिलकांस** शिरीं धराया ॥१॥"
"॥ जो देइ भोजन जयास जगीं मिळेना॥ सद्बुद्धि त्या शिकवि ज्यास मुळीं कळेना ॥
॥ सन्मार्ग चालवितसे न धरी भयास॥ तो देव **सन्ततिलका** न ह्मणूं तयास ॥२॥"
"॥ तार्टक भूषण जिला न जरी तरी ती ॥ पाहूनियाच हरिच्याहि मना हरीती ॥'
॥ जीचा नितंब उर थोर कृशत्व माजीं॥'सिंहोन्नता' दिसतसे युवतीसमाजीं॥ ३॥

**॥ ३ ॥ न न र स ल गुरू स्वरीं अपराजिता ॥ १२५ ॥**

॥ कुपित सुरपती जरी बहु वर्षला ॥ तरि नाचि मनिं भी परी विभु हर्षला ॥
॥ धरि गिरि करिं तै तळीं व्रजराजिता॥ हरितनु नमिली सुरीं **अपराजिता**॥१२५॥

**॥ ४ ॥ न न भ न ल ग ती प्रहरणकलिता ॥ १२६ ॥**

॥ आजि रतिपतिचें **प्रहरण कलिका**[7] ॥ मधुभव[8] शिरते उरिं जणुं गुळिका ॥
॥ करि लवकरि या प्रशमन हृदया ॥ हरि असुं त्यजितां नचि उचित दया१२६ ॥

**॥ ५ ॥ मा ता ना मा गा गहि ह्मणती वासन्ती ती ॥१२७॥**

॥ टाकी धंदा ते अनुसरली गोविंदातें ॥ धाके नंदातें नाचि भरली आनंदातें ॥
॥इंदूची कांती[9] बहु पडली जैं दिक्प्रांतीं॥ चित्तीं तैं चिंती व्रजवनिता **श्री वासन्ती**[10]१२७

**॥ ६ ॥ लोला ते म स मा भा गा गा सप्तविरामा ॥ १२८ ॥**

॥ बोलाहो मुखि लीला ईशाची गुणमाला ॥ केला लोभ न घाला गुंतूनी भवजाला ॥

---

१ जिथें गर्दी नाहीं अशी. २ वसन्ततिलकावृत्तासच मतभेदानें 'उद्धर्षिणी' 'सिंहोन्नता' व 'मधुमाधवी' हीं नांवें आहेत. उद्धर्षिणी=हर्षदायक ३ तीन ठिकाणीं–कटाक्ष, भिवया, व वाणी, यांत जी वक्र. ४ केशप्रांत. ५मनास. ६ वृक्षविशेष. ७ आयुध. ८ प्राग. ९ शोभा. १० वसंतऋतूची.

॥ गेला काळ न आला मृत्यु नित्य उशाला ॥ ठेला, सत्पथिं चाला लक्ष्मी ही अतिलोला ॥ १२८ ॥

॥ ७ ॥ स्वरयति[2] न न ता ता ग **नांदीमुखी गा** ॥ १२९ ॥

॥ नवल भवमयी नाटिका हे शतांकी[3] ॥ अनुभवसमयीं बूडवी मोहपंकीं ॥
॥ जरि म्हणसि इचा अंत व्हावा सुखीं गा ॥ तरि यदुपतिची नाम**नांदी[4] मुखीं** गा ॥ १२९

॥ ८ ॥ भा ज स न **इन्दुवदना** गुरु युगें[5] ती ॥ १३० ॥

॥ इंदु पसरी नव सुधा नभसगीं ता ॥ वेणु अधरीं यदुकुल[6] दुहि धरी तों ॥
॥ **इन्दुवदना** समदना मधुवनातें ॥ शीघ्र धरुनी मनिं निघे निधुवनातें[7] ॥ १३० ॥

॥ ९ ॥ न न स ज ग ग ते सप्तवती **नदी** ती ॥ १३१ ॥

॥ सतत तुह्मि भजा श्रीहरिनामनौका ॥ मनिं निगमगिरा '**तत्त्वमसी**ति'[8] घोका ॥
॥ क्षुधित तृषित त्या सोदक अन्न दीजे ॥ तरि सुतर घडे संसृति हे **नदी** जे ॥ १३१ ॥

॥ १० ॥ **लक्ष्मी** पादविरामा मा स ता भ ग गा नीं ॥ १३२ ॥

॥ वागीशा[9] वदनीं ती ज्याचिया स्थिर राहे ॥ तैशी ती त्द्दयान्ती संविती[10] वसताहे ॥
॥ **लक्ष्मी** राहुनि वक्षीं ज्यासि निश्चळ लक्षी ॥ लक्ष्मीकान्त विभू तो चिंतितों मतिसाक्षी ॥ १३२ ॥

॥ ११ ॥ न न न न वसुरस[11] ग ग **सुपवित्र** ॥ १३३ ॥

॥ निगममथित मत विवरुनि राहे ॥ स्थिरचरिं सम हरि जरि मनिं पाहे ॥
॥ भ्रम समजुनि जग विविध विचित्र ॥ धरि शम मुनिवर तरि **सुपवित्र** ॥ १३३ ॥

॥ १२ ॥ **मध्यक्षामा** मभनय ग ग चारीं दाहीं ॥ १३४ ॥

॥ स्वर्लोकींचें सुमें[12] सुरमुनि भावें देतां ॥ तें भैष्मीतें[13] हरि निरखुनि दे एकांता ॥
॥ ज्ञातोदन्ता[14] मग बहुमत मेघश्यामा ॥ वामी[15] भामा मनिं नचि मनि **मध्यक्षामा**[16] ॥ १३४ ॥

॥ १३ ॥ चहुंदाहीं **कुटिल** स भ न या गा गांहीं ॥ १३५ ॥

॥ हरि वाटे जरिहि सरळ तो बाहेरीं ॥ तरि आहे त्द्ददयिं **कुटिल**[17] तूं बा हेरीं ॥
॥ द्रुत[18] येतो म्हणुनि कितव[19] तो कीं गेला ॥ परि नाहीं अझुनि परतला रंगेला ॥ १३५ ॥

॥ १४ ॥ न ज भ ज ला गुरु हि म्हणती **प्रमदा** ॥ १३६ ॥

॥ जरि सकला दिगतिं भ्रमलां भ्रमलां ॥ तुह्मिं अपुला अमूल्य समय क्रमिला ॥
॥ तरि कुटिलाचि सर्व तरलां[20] श्रमदा ॥ बहु विरला जगांत सरळा **प्रमदा**[21] ॥ १३६ ॥

॥ १५ ॥ स ज सा य ला गुरु शरग्रहीं[22] **मंजरी** ॥ १३७ ॥

॥ मणिशेखरां[23] राहुनि मयूरपिच्छावलि ॥ हरिच्या मना बहु सुखावहा भावली ॥
॥ मिरवे गळां रुचिर रत्नमाला जरी ॥ धरि तो तरी तुळसिची उरीं **मंजरी** ॥ १३७ ॥

॥ १६ ॥ न ज भ ज गा गुरुहि गजेंद्र[24] **कुमारी** ॥ १३८ ॥

---

१ अतिचंचळ. २ सातांवर जिचा विराम आहे ती. ३ दोष, पक्षीं नाटकाचे भाग. ४ मंगलाचरण. ५ हृदय. ६ श्रीकृष्ण. ७ सुरत. ८ हें उपनिषदांतील महावाक्य आहे. ९ सरस्वती. १० ज्ञान. ११ आठ व सहा. ( यति. ) १२ पुष्प ( पारिजातकाचें ) १३ रुक्मिणीस. १४ जिला तो वृत्तांत समजला आहे ती. १५ वक्र. १६ कृशकटि. १७ वक्र, कपटी. १८ शीघ्र. १९ धूर्त, शठ. २० चंचल. २१ स्त्री. २२ पांच आणि नवांनीं ( यति ) २३ रत्नमुकुट. २४ आठ तहा

॥ मधु[1] विपिनीं स्वकांति बहु तो उभारी ॥ मधुर गमे मनास विधु[2]कांतिही भारी
॥मधुरिपु[3] वेणुनादें तयिं हांक मारी॥मधुवनिं तैंचि जाति व्रजिच्या कुमारी॥१३८॥

॥ १७ ॥ न र न र लघू गुरुहि ते **सुकेसरी** ॥ १३९ ॥
॥ रुचिर अंगु निचय[4] पल्लवांपरी ॥ किरण ज्या **सुकेसर**[5]समान अंतरीं ॥
॥ हरिपदाब्ज जें विकसलें सदंतरीं ॥ सतत तें असो मम सुमानसांतरीं॥१३९॥

॥ १८ ॥ जाणा जेथें **म भ न य ल ग चंद्रौरसा**[6] ॥ १४० ॥
॥ आधीं आहे कुटिलाचे[7] प्रतिपक्षीं[8] असा ॥ पावे राग[9] क्षय उदयहि त्याचा तसा ॥
॥ जो कीं दोषाकरं[10] हिमकरें[11] लोकीं रसा॥ दे त्या आह्मी समजुं हरिस **चंद्रौरसा**[12] ॥१४०॥

॥ १९ ॥ **वासन्ती** जीतें **म त न य** गणीं **गा गा ते** ॥ १४१ ॥
॥ भव्याही नव्या दलतति[13] वनाशोकांतें ॥ मल्ली[14] संफुल्ला हरिति सकला शोकातें॥
॥ इंदूची कान्ती विलसत असे दिक्प्रान्तीं ॥ शोभा **वासन्ती**[15] अजि भुवानें या
दे शांति ॥ १४१ ॥

॥ २० ॥ **चक्रपद** जरि **भ न न न ल गुरूही** ॥ १४२ ॥
॥ वक्र असुरिं करिं धरि खल शमना ॥ **चक्रपद**– विनत विबुधसमवना[16] ॥
॥ चक्रधरचि मनिं धरिं दृढ हरि तो ॥ चक्र सकल भवमय परिहरितो॥१४२॥

---

# अतिशक्करी. (३२७६८)

(पंचदशाक्षरी वृत्तें १८.)

॥ १ ॥ श्रुतिमित[17] **नगण स** चरम[18] **शशिकला** ॥ १४३ ॥
॥ गुज तुज वदुं अजि दिससि विकसला ॥ खरवर दिनकर जरि निज असला॥
॥ प्रतिपदिभव तरि निरखि **शशिकला** ॥ प्रतिपदिं शुभ यश मिळविसि सुकला॥१४५॥
"निशिदिनिं भजन करिन परिस तरी ॥ तुजविण कवण सुमते[19] मज दुसरी ॥
सुतनु नयन मुख कुच भुलवि मला ॥ प्रतिदिवसिं जासि उगवालि **शशिकला**"॥

॥ २ ॥ वसुमुनि यति तरि **मणिगुणनिकर** ॥ १४४ ॥
॥ श्रुतिशतगत मत सुमत तरि करा ॥ श्रवणिं सतत यदुं[20]**मणिगुणनिकरा**[21] ॥
॥ सकल[22] इषित गति मग अति सुकरा॥ विफल शिणानि जनिं गिरिवर नुकरा॥१४४॥

॥ ३ ॥ **स्रकाहि** ह्मणति जरि रसनवि विरतीं ॥ १४५ ॥
॥ सुकसि उगिंच सुतें[23] विघडिसि जडलें ॥ वद तव मनिं किमपि विकृत घडलें ॥
॥ **स्रगु**[24]पम रम सुरुचिर उरिं हरिच्या ॥ तरि पुरतिल रुचि **सकळाहि** मनिंच्या॥१४५॥

---

१ वसंत. २ चंद्र. ३ कृष्ण. ४ समूह. ५ पराग, पुष्परज. ६ रस, प्रेम. ७ वक्र, कपटी. ८ प्रत्येक पंधरवड्यांत, व शत्रूचे ठिकाणीं. ९ तांबडेपणा व प्रीति. १० रात्रीं ज्याचे किरण आहेत तो, व दोषांची खाण. ११ किरण, हात. १२ चंद्राचा औरस पुत्र, पक्षीं एकवृत्त. १३ पत्रसमूह. १४ मोगरी. १५ वसंतासंबंधी. १६ देवांच्या रक्षणास. १७ चार. १८ शेवटला. १९ मान्य. २० कृष्ण. २१ समूहे. २२ इष्ट. २३ सूत पक्षीं प्रेम. २४ माळेसारखी.

॥ ४ ॥ **न न म य य** युता ती **मालिनी** आठ–सातीं ॥ १४६ ॥

॥ समचरणसरोजा सांद्रनीलांबुदाभा[1] ॥ कटिधृतकर[2]कंजा भूषणां देइ शोभा ॥
॥ तनु बहुतर शोभे नित्य जी चिंत्य साची ॥ तरुण तुलसिमाला-**मालिनी** विठ्ठलाची॥१४६॥
" नयनिं निरखि माला होय जो कायधारी॥ निजजनसुखकारी कंसदासी सुधारी
॥ सहज निरसि ज्याचें नाम सर्वाघराशि॥मधुपुरिं हार गेला **मालिनी**च्या घराशीं"॥१॥

॥ ५ ॥ पांचा **मांचा** सांचा जेथें बोला त्या **लीलाखेला** ॥ १४७ ॥

॥ पूजाभंगामर्षे वर्षे गोष्ठातें[3] भंगायाला ॥ स्वर्गस्वामी[4] व्योमीं हर्षें मेघां ये सांगायाला ॥
॥ त्या आसारीं तैं कंसारी ध्वंसाया तद्दर्पाला ॥ माळाधारी शैलोद्धारीं दावी तो **लीलाखेला** ॥ १४७ ॥

॥ ६ ॥ **विपिनतिलका न स न** रेफयुग्मीं गणीं ॥ १४८ ॥

॥ तरणितनया मृदुतटीं उभा सैकतीं[5] ॥ निरखि हरि जी वदु अजीं वनश्री किती॥
॥ **विपिनतिलकां**[6] बघुनिया प्रसूनाकुलें[7] ॥ भुवनतिलकां प्रमर्द माधवा जाहला॥१४८॥

॥ ७ ॥ **रा ज रा ज रा** जरी गणाचि **तूणका** तया ॥ १४९ ॥

॥ ती विकाशि भृंगपूरिता सुवर्णकेतका ॥ पंचबाण-बाण-जालपूर्ण हेम **तूणकें** ॥
॥ राधिका गणूनि माधवाख्य[11] मासिं माधवा॥ मूढ होय तूजवीण पूर्ण जाण बांधवा॥१४९॥

॥ ८ ॥ सप्ताष्टीं **चंद्रलेखा कीं मा र मा या य** जीतें ॥ १५० ॥

॥ **जो भक्तां केरवातें**[12] **उत्फुल्लता दे अवक्रां ॥ स्वाकाशीं**[13] **स्वोदयानें जो वीघडी दोषचक्रां**[14] ॥
॥ **दे आल्हादा अशेषा जो मान्य सर्वांहि लेखां**[15] ॥ **आनंदें आजि देखा तो हा हरी चंद्रलेखा** ॥ १५० ॥

॥ ९ ॥ **चित्रा** जाणा च्छंदश्चित्रा तीन **मा दो य** कारीं ॥ १५१ ॥

॥ जी पाहातां येतें ह्राता मर्म तें योगियांचें॥ध्यानें जीचें वेदान्तींचें लाधतें तत्व साचें॥
॥ नित्या चित्या शुद्धा प्रज्ञासाक्षिणी ती पवित्रा॥ सद्विश्रामा मेघश्यामा आठवू मूर्ति **चित्रा** ॥ १५१ ॥

॥ १० ॥ गणिति **न जा भ जा रगण** ज्या **प्रभद्रका** ॥ १५२ ॥

॥ व्रज भुवनीं वनीं रविसुतातटावनीं ॥ रुचिर करी हरी विरहति[16] विश्वपावनी ॥
॥ ह्मणवि सखे सुखें करुनि खेळ सांद्र कीं॥ व्रजकुमरां सुरांसहि न तें **प्रभद्रकीं**[17]॥१५२॥

॥ ११ ॥ **स ज ना न या** शर दश यति तरि **एला** ॥ १५३ ॥

॥ यमुनावनीं हरिसह रति करि राधा ॥ अतिपावनीं लवहि न धरिच विरोधा॥
॥ जासि तांबुला समुचित रुचिकर एलें[18]॥ताशि राधिका हरिप्रति हरिहि तियेला[19]॥१५३॥

---

१ मेघ. २ कमल. ३ गोकुळ. ४ इंद्र. ५ वाळवंटांत ६ एक वृक्ष. ७ पुष्पयुक्त. ८ हर्ष. ९ मदन. १० सुवर्णाचा भाता. ११ वैशाख. १२ चंद्रकमळ. १३ सु–आकाश, पक्षीं स्व–आकाश (त्द्हृदयाकाश.) १४ दोषांचें चक्र ( समूह ) व दोष हेच चक्र– ( चक्रवाक ) यांस १५ देवास. १६ क्रीडा. १७ मोठें भाग्य. १८ वेलचि. १९ विलायची.

॥ १२ ॥ न ज भ ज रीं विराजित जरी सुखेलक ॥ १५४ ॥

॥ व्रजविपिनीं विराजित हरी स्ववत्सकीं ॥ समवय गोप बालकहि सर्व अन्ति[1]कीं ॥
॥ तृणचर गुंतवूनिच तृणासि कौतुकीं॥विसरुनि देह गेह रमती सुखेल[2]कीं॥१५४॥

॥ १३ ॥ चंद्रकांता स्वराष्टीं रा रा म या या गणांहीं ॥ १५५ ॥

॥ फुलवी स्वोदयानें जी कैरवां सज्जनांसी ॥ चिंतनें भक्तमोहध्वा[3]न्ताचिया सज्ज नाशीं ॥
॥ सच्चकोरान्तरींची जी काय! मूर्ती रसाची ॥ चंद्रकान्ती हरीची शोभे तनू फार साची ॥ १५५ ॥

( १४ ) ग[4]जमुनि न न ता भा र ही उपमालिनी॥ १५६ ॥

॥ न न[5]तें उरिं धरितें भ[6]रासहि घेतसे ॥ श्रवण-कथनकाळीं सुतोषहि देतसे ॥
॥ धरि विरति[7] गजार्थी रती व्रजपालनी ॥ सुखद तनु हरीची जशी उपमालिनी॥१५६॥

( १५ ) ऋषभाख्य वृत्त ह्मणती स-ज-सा-स-यांसी ॥ १५७ ॥

॥ सुविरक्त योगिजन चिंतिति नित्य ज्यासी ॥ अनुरक्त तो हरि रमे व्रजिन्यास्त्रियांशीं॥
॥ बहु नम्र होउनि जया सुरवृंद वंदी॥वृषभांसि पाळि विबुधर्षभ[8] धेनुवृंदीं॥१५७॥

( १६ ) स ज जा भरा तरि जाण मानसंहस तें ॥ १५८ ॥

॥ अमला दलांपरि गोपबाळक शोभती ॥ वनिं पंगती धरुनी उभेचि सभोंवतीं ॥
॥ अजि त्यांमधी हरि साधुमानसहंस[9] तो॥कलिकेपरी गुणसिंधु माधव भासतो ॥१५८॥

( १७ ) शिव-वक्त्रमितीं सगणीं ह्मणती नलिनी ॥ १५९ ॥

॥ मुरवैरिमुखाबुंरुहीं[10] जणुं ही अलिनी[11] ॥ विभुनेत्रमिलिन्दयुगाप्रति जी नलिनी[12] ॥
॥ वृषभानुसुता[13] आजि भानुसुतापुलिनीं[14] ॥ हरिशीं करि केलि[15] अलभ्य सुरावलिनीं॥१५९॥

( १८ ) जाण निशिपालक तया भ ज स ना र ज्या ॥ १६० ॥

॥ सर्व त्यजिलें धन मुलें सदन गोकुलें ॥ दृष्टि न दिली, मळविली उभयही कुलें ॥
॥ बुद्धि न धरी धृति[16] हरी कुशल[17] भाविना ॥ कोण निशिपालक कृपानिधि तुझ्या विना ॥ १६० ॥

आष्टि. ( ६५५३६ )

( षोडशाक्षरी वृत्तें. १४ )

( १ ) चित्र वृत्त मानिती समानिकापदद्वयास ॥ १६१ ॥

॥ गोपवेष शेषशायि घेइ गोष्ठि सृष्टिदूर ॥
॥ पूतनास्तनासु[18]र्ने जो करूनि निर्विकार ॥
॥ हस्ति घे विशाल शैल बाल मारि राक्षसांहि ॥
॥ 'चित्र' वृत्त हें पवित्र तोत्रपा[19]णि दावि पाहें ॥ १६१ ॥

---

१ समीपभागीं २ उत्तम खेळांत. ३ अंधकार. ४ आठ व सात. ५ नम्र पक्षी, गुणविशेष. ६ भार प. गण. ७ अप्रीति प. यति. ८ देवांत श्रेष्ठ. ९ साधूचें मन हेंच मानस-सरोवर-त्यांतील हंस-कृष्ण १० कमल. ११ भ्रमरी. १२ कमलिनी १३ राधा. १४ यमुनातटीं १५ क्रीडा. १६ धैर्य. १७ कल्याण क्षेम. १८ प्राण. १९ चाबूक ज्याच्या हाती आहे असा कृष्ण.

